# नामदार गोखले चरित्र



# नामदार गोखले-चरित्र



साने गुरुजी



व्हीनस प्रकाशन : पुणे

आवृत्ती पहिली : फेब्रुवारी १९२५
आवृत्ती दुसरी : मार्च १९६६

*



*



चित्रकार : अनंत सालकर

ब्लॉक्स : धारगळकर प्रोसेस प्रा. लिमिटेड

*

प्रकाशक :
स. कृ. पाध्ये
व्हीनस प्रकाशन
तपश्चर्या
३८१ क, शनिवार पेठ : पुणे २

*

मुद्रक :
वि. नी. पटवर्धन
साधना प्रेस
४३०-३१ शनिवार पेठ : पुणे २

# प्रकाशकाचे चार शब्द

सांप्रतचा काळ ग्रंथकार, प्रकाशक व बुकसेलर या तिघांसही अत्यंत अडचणीचा असा भासत आहे. ग्रंथकार म्हणतात की, आमची व्यर्थ उपासमार होत आहे; बुकसेलरांचीही हीच तक्रार आहे. यांचे परस्परसंबंध काय असावे हे अजून निश्चित झालेले नाही. पण लवकरच हे संबंध परस्परांस हितकर असे होतील असा रंग दिसत आहे. आणि हे झाल्या-शिवाय मराठी वाङ्मयाची वाढ योग्य दिशेने होणार नाही. हे संबंध ठरताना काही फिर्यादीअर्यादी होणे अपरिहार्यच आहे.

पुस्तकावर छापलेल्या किंमतीपेक्षा कमी किंमतीस पुस्तके घेण्याची हल्ली एक सुशिक्षित टूम निघाली आहे. या घातक प्रवृत्तीस आळा घालण्याचे काम प्रकाशकांचे आहे व तसा प्रयत्न प्रकाशकांकडून लवकरच होणार आहे असे समजते. बुकसेलरांस सव्वासहा टक्के, पाच टक्के व कधी कधी शून्य कमिशने देण्याचे प्रकार आमचे नजरेस येत आहेत तेही अनिष्ट होत.

आम्हांस तर असे वाटते की, ग्रंथकारांनी रोख किंमत घेऊन पुस्तक कायम हक्काने विकण्यापेक्षा ते त्यांनी प्रकाशकांस होणाऱ्या फायद्याचा काही नियमित नफा घेण्याचे ठरवून कायम प्रकाशनाच्या हक्कासह प्रका-शकांस द्यावे हे बरे. त्यामुळे उभयतांचे हितसंबंध निगडित होणार असून ग्रंथ-कारांचे विशेष नुकसान न होता पुस्तकाच्या भरभराटीबरोबर त्यांचीही भरभराट होऊ शकेल व अमुक प्रकाशकाने एवढ्या थोड्या रकमेत आमचे पुस्तक घेतले अशी निष्कारण व अनाठायी तक्रार करण्याचे त्यांस कारणच उरणार नाही. रा. साने यांनाही आम्ही ही पद्धत सुचविली होती; पण ती त्यांस पसंत पडली नाही. कोणी कोणती पद्धत स्वीकारावयाची हा ज्याच्या त्याच्या मर्जीचा प्रश्न आहे. पण एकदा एक गोष्ट मान्य केल्यावर त्या पद्धतीविरुद्ध तक्रार करणे हे केव्हाही इष्ट नव्हे. हे विचार

आमच्यापुढे येण्याचे कारण निरनिराळ्या पुस्तकांना ग्रंथकारांनी लिहिलेल्या प्रस्तावना होत. आम्ही तर असे म्हणतो की, प्रत्येक प्रकाशकाने पुस्तकाबद्दल ठरलेल्या अटी त्या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीबरोबर प्रसिद्ध कराव्या म्हणजे मागाहून वकिलांची भर करण्याचे कारण पडणार नाही.

सदर चरित्राला सुप्रसिद्ध वाङ्मयभक्त प्रो. दत्तो वामन पोतदार यांनी प्रस्तावना लिहून आम्हांस ऋणी केल्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहो. या चरित्रात घालण्यास लेख लिहून दिल्याबद्दल रानडे चरित्राचे लेखक श्रीयुत न. र. फाटक यांचे किती व कसे आभार मानावे हे आम्हांस कळत नाही. उत्तरोत्तर उपरिनिर्दिष्ट उभय वाङ्मयभक्तांनी नवीन नवीन प्रकाशनकार्य अंगावर घेण्यास उत्तेजन देऊन आम्हास ऋणी करावे अशी आमची त्यांस विनंती आहे. या चरित्रात घातलेले सूचीपत्र इतिहासभक्त श्रीयुत आबा चांदोरकर यांनी तयार केले आहे. या पुस्तकाची मुद्रिते येथील '**टिळक राष्ट्रीय पाठशाळे**'चे मुख्य अध्यापक खादीभक्त रा. रा. वा. वि. साठे, वाङ्मयविशारद, यांनी तपासली असून प्रत्येक पानाला हेडिंग देण्याचे श्रेयही त्यांनाच आहे. ह्या उभयतांचे आम्ही आभारी आहो. पुस्तकात घातलेला नामदारांचा फोटो व हस्ताक्षर आर्यभूषणचे चालक श्रीयुत वामनरावजी पटवर्धन व व्यवस्थापक केशवरावजी बाळ यांनी आम्हांस दिल्याबद्दल त्यांचे जाहीर आभार मानण्यास आम्हांला फार आनंद होत आहे. या चरित्राला योग्य तो आश्रय देऊन आम्हांस पुढील चरित्रे प्रसिद्ध करण्यास लोकांनी उत्तेजन द्यावे अशी विनंती करून आम्ही हे चार शब्द पुरे करतो.

ता. २७–२–२५

**विश्वनाथ गणेश ताम्हनकर**

# दुसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने

कै. साने गुरुजी यांनी लिहिलेल्या कै. नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांच्या चरित्र-ग्रंथाची दुसरी आवृत्ती आम्हास प्रकाशित करण्यास आनंद वाटत आहे. या चरित्र-ग्रंथाची पहिली आवृत्ती सन १९२५ साली प्रसिद्ध झाली होती. ती बरीच वर्षे दुर्मिळ होती. कै० गोखले यांची जन्म-शताब्दी या वर्षीं येत आहे. या सुयोगावर हा ग्रंथ प्रकाशित करावा असे आम्ही योजिले व त्याप्रमाणे ही नवी आवृत्ती वाचकास उपलब्ध होत आहे.

पहिल्या आवृत्तीस महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांनी लिहिलेली प्रस्तावना, तसेच प्रा. नरहर रघुनाथ फाटक यांनी केलेले विहंगावलोकन, ही उत्कृष्ट असल्यामुळे जशीच्या तशीच आम्ही छापली आहेत. पूर्वीच्या आवृत्तीत प्रत्येक पानावर नवा मथळा दिला होता. या आवृत्तीत तसे न करता प्रकरणांचे मथळेच फक्त दिलेले आहेत. हा चरित्र-ग्रंथ सानेगुरुजींच्या इतर पुस्तकाप्रमाणेच वाचकांना आवडेल असा विश्वास वाटतो.

स. कृ. पाध्ये
प्रकाशक

१ मार्च १९६६

## प्रस्तावना

# ग्रंथ आणि ग्रंथकार

## यांचा अल्प परिचय

**कांहीं एक उत्कटेंविण । कीर्ति कदापि नव्हे जाण ।।**

—श्रीसमर्थ

कै. नामदार गोपाळ कृष्ण गोखले या थोर देशभक्ताचे मराठी चरित्र त्यांच्या दहाव्या श्राद्धतिथीच्या शुभप्रसंगी रा. ताम्हनकर हे प्रसिद्ध करीत आहेत ही अभिनंदनीय गोष्ट आहे. यापूर्वी गोखले यांची एक दोन बऱ्यापैकी चरित्रे मराठीत प्रसिद्ध झालेली आहेत. सांप्रत माझे मित्र रा. नरहरि रघुनाथ फाटक बी. ए. रानडे-चरित्रकर्ते हे गोपाळरावजींचे विस्तृत चरित्र लिहीत आहेत आणि ते निदान पुढील श्राद्धदिनी वाचकांच्या हाती पडेल अशी आशा आहे. प्रस्तुत प्रसिद्ध होत असलेले हे गोखलेचरित्र अगदी त्रोटकही नाही आणि अगदी सविस्तरही नाही, तर मध्यम आहे; आणि या दृष्टीने पाहता अशा मध्यम ग्रंथाची जरूरी सहज कळून येईल.

गोखले यांचे असे मध्यम चरित्र आपण प्रसिद्ध करावे अशी रा. ताम्हनकर यांस विशेष इच्छा होती. जेव्हा रा. फाटक यांचा ग्रंथ यंदाच्या श्राद्धतिथीला प्रसिद्ध होत नाही असे कळले तेव्हा ही त्यांची आतुरता वाढली. परंतु यावेळी श्राद्धतिथीला उणापुरा एक महिना सुद्धा उरला नव्हता. एवढ्या अत्यल्प अवधीत चरित्र लिहून प्रसिद्ध कसे व्हावे ही अडचण होती. गोष्टीत गोष्ट निघताना मी रा. पां. स. साने, एम्. ए.

यांच्या एतद्विषयक हस्तलिखिताची माहिती रा. ताम्हनकर यांस दिली. मुंबई युनिव्हर्सिटीने गोखले–चरित्रावर मराठीत निबंध लिहून पाठविणारास बक्षीस लाविले आहे. आणि त्यासाठी दुसऱ्या एक दोन होतकरू लेखकांप्रमाणे रा. साने हेही प्रयत्न करीत होते असे मला ठाऊक होते. ठराविक मुदतीत रा. साने यांजला आपले काम संपविता आले नाही, तेव्हा त्यांचा चरित्रप्रबंध त्यांजवळ पडूनच राहिला होता. पूर्वी कॉलेजात मराठी शिकत असता स्वभाषेत लेख लिहिण्याच्या कामी रा. साने यांचा हात फार चांगला चालत असे, असा प्रत्यय मजला आलेला होता. आणि पुढे पुण्याच्या डेक्कन व्हरनॅक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीने लोकहितवादींचे मराठी चरित्र बक्षीस लावून मागितले असता रा. साने यांनी ते तयार करून मजला दाखवून सदरहू सोसायटीकडे धाडले होते. त्यावरून त्यांच्या लेखनकौशल्याविषयीचा माझा अनुकूल ग्रह दृढतरच झाला. अखेर या लोकहितवादी चरित्राबद्दल त्यांस दुसऱ्या एका विद्वानाच्या बरोबरीने बक्षिसाचा वाटा मिळाला. तेव्हा ते चरित्र छापविण्याविषयी मी त्यांस आग्रह केला होता. इतक्यात त्यांनी गोखले–चरित्राकडे आपले लक्ष लावले. रा. साने हे आमच्या न्यू पूना कॉलेजातील उत्कृष्ट विद्यार्थी म्हणून सर्वमान्य झालेले होते. त्यांची बुद्धी कुशाग्र होती. तसेच त्यांचे मन अत्यंत सुविनीत होते. असा विद्यार्थी, मराठी भाषेसाठी विद्यापीठाने थोडीशी वाव कोपऱ्यात दिली असता मायभाषेवरील प्रेमाने तिच्या स्वागतार्थ पुढे आला याचे मजला त्या वेळी कौतुक वाटले व आज या चरित्रग्रंथाचा पुरस्कार करताना प्रेम आणि अभिमान यांची त्या कौतुकात भर पडली आहे. किंबहुना ग्रंथपरिचयाचे हे दोन शब्द लिहिण्याचे पत्करण्यास हा ओढाच सर्वांशी कारण झाला आहे.

महाराष्ट्रातील थोर पुरुषांची चरित्रे लिहिण्याकडे व वाचण्याकडे लोकांची प्रवृत्ती सांप्रत बरीच वळलेली दिसते. रा. नरसोपंत केळकर यांनी टिळकचरित्राचा एक सुंदर व मोठा खंड नुकताच प्रसिद्ध करून आपणावरील जबाबदारी निम्मी पार पाडली आहे. रा. फाटक यांनी रानडेचरित्रावर एक विस्तृत ग्रंथ प्रसिद्ध केला आहे, व द्वितीयावृत्तीच्या समयी ती दुप्पट मोठी होईल असे दिसते. विष्णुशास्त्री चिपळूणकर

यांचे चटकदार चरित्र पूर्वीच त्यांच्या बंधूंनी लिहिलेले लोकप्रिय झाले आहे. आगरकर यांचे मात्र चांगले सविस्तर चरित्र अद्यापि झाले नाही. परंतु तीही उणीव तरुण पिढीतील एक विद्वान् लेखक भरून काढण्याच्या विचारात आहेत असे परवा ऐकण्यात आले. सार्वजनिक काकांचे चरित्रही एका साक्षेपी लेखकाने लिहून तयार केलेले नुकतेच पाहण्यात आले आहे. नाना मोरोजी, जगन्नाथ शंकरशेट, शाहू छत्रपती ह्यांची चरित्रेही आजवर छापून निघाली आहेत. महात्मा गांधी यांची निदान तीन मोठी चरित्रे मराठीत झाली आहेत. बंडुनाना रानडे, नूलकर, विश्राम, कुंटेप्रभृतींची छोटी चरित्रे कै. वामनराव रानडे यांनी लिहिलेली होती. त्यांतील एक चरित्रपंचक हल्ली बहुतेक छापून झाले आहे. देव मामलेदार, केतकर, अण्णा किर्लोस्कर, भाऊराव कोल्हटकर, कीर्तने, राजाराम रामकृष्ण भागवत, गुलाबराव महाराज, बाळशास्त्री जांभेकर, विष्णुपंत छत्रे, बापू मेहेंदळे, अक्कलकोटस्वामी इत्यादिकांचीही काही फुटकळ व काही विस्तृत चरित्रे मराठीत छापलेली आहेत. तेलंग, अण्णासाहेब पटवर्धन यांची चरित्रे लिहिण्याची उचल वर्षातून त्यांची श्राद्धतिथी साजरी करताना एकदा होते; परंतु ती लिहिण्यास कोणी तरी उत्साहाने पुढे येईल असे वाटते.

वरील हकीकतीवरून दिसेल की, अर्वाचीन थोर पुरुषांच्या चरित्रांची भूक महाराष्ट्रात दिवसेदिवस वाढत आहे यात संशय नाही. पूर्वीची चरित्रे अगदी फुटकळ असत. तेव्हा तितकी माहिती नसे व तत्कालीन पुढारी मंडळींचा व्यापही लहान असे असे सापेक्षतेने वाटते. हल्ली कर्तृत्व वाढले आहे, साधने वाढली आहेत व जिज्ञासाही वाढली आहे. ही सर्व सुचिन्हे आहेत व याचेच एक प्रत्यंतर रा. साने यांनी आणून दिले आहे.

थोर पुरुषांची चरित्रे ही राष्ट्राची बहुमोल संपत्ती आहे. त्या भांडवलाच्या बळावर राष्ट्रे आपला भावी संसार चालविताना हिंमतीने पुढे पाऊल टाकतात. तरुण मंडळींच्या बुद्धीस ही चरित्रे म्हणजे एक प्रकारचा खुराकच असतो. तो त्यांस सतत पुरविणे अगत्याचे आहे. थोरांच्या पावलावर पाऊल ठेवून त्यांचा मार्ग चोखाळणे हे जसे पवित्र कर्तव्य आहे; त्याचप्रमाणे त्यांच्या मार्गांचा, हेतूंचा, ध्येयांचा उलगडा करून ती लोकांपुढे ठेवणे ही देखील मोठी राष्ट्रसेवा आहे. कर्त्या पुरुषांची संप्र-

दायगंगा अखंड वाहती ठेवण्यास या चरित्रांचा मोठा उपयोग होत असतो. गोपाळराव गोखले हे रानडे, दादाभाई यांच्या संप्रदायात मोडतात. ब्रिटिश साम्राज्याच्या कक्षेत राहून आपल्या प्रिय भारतभूमीस सुखाचा स्वर्ग गाठता येईल अशी या संप्रदायाची दृढ श्रद्धा आहे. शुद्ध स्वातंत्र्यवादाला या संप्रदायात अवकाश दिलेला नाही.

गोपाळराव किंवा रानडे यांच्या चरित्राचे रहस्य यथावत् उलगडून सांगण्यास जर त्यांच्या वर वर्णिलेल्या संप्रदायातलाच कोणी एकनिष्ठ पाईक मिळेल तर तो त्यांचे जे चरित्र निर्माण करील त्यात त्यांच्या अंतः-करणाचे सूक्ष्म पापुद्रे तो मोकळे करून दाखवील. अंतःकरणाच्या **सामरस्यामुळे** सांप्रदायिकाच्या चरित्रात भक्तिरस ओथंबलेला असतो. थोरल्या नेपोलियनचे धाकट्या नेपोलियनने काढलेले चित्र या भावनेचे द्योतक समजता येईल. गोपाळरावांनी रानडे यांचे चरित्र जर संकल्पा-प्रमाणे लिहिले असते, तर एका सच्छिष्याने आपल्या सद्गुरूचे काढलेले नामी चरित्रचित्र आपणास पाहण्यास सापडते व त्यात भक्तिमत्त्वाचा उद्रेक आपले नजरेत उत्तम भरता. माधवरावांचे जसे गोपाळराव तसे गोपाळरावांचे असल्यास कोण हे सांगणे अमळ कठीणच आहे. परंतु कोणी तसली मूर्ती कल्पिल्यास गोपाळरावांचे भक्तिरसपरिपूर्ण उज्ज्वल व मधुर चरित्र आपणास तिच्याकडून वाचावयास मिळेल. ही **सांप्र-दायिक चरित्रे** जरी एका दृष्टीने आतील भक्तिरसामुळे मोठी रसाळ वठतात तथापि त्यात गुणगौरवाचा अतिरेक झालेला असतो आणि त्यामुळे चरित्रवस्तूचे हीनांग झाकले जाऊन यथार्थ बोध होत नाही, आणि अपूर्ण वस्तुदर्शनाने सत्यही लोपून आपली दिशाभूल होते. एकीकडे रसाळपणाचा उत्कर्ष होतो, तर दुसरीकडे चोखटपणास आपण आचवतो. या जातीच्या चरित्रांचे पर्यवसान चरित्रवस्तूच्या **देवीकरणात** (डीइफिकेशन) होते.

उलट फिशर रोझबरीसारख्या इंग्रजांनी नेपोलियनची काढलेली चरित्रतसबीर घ्या. ती उत्कट भक्तिरसाने तितकी रंगलेली असणार नाही. अथवा जर्मनीची शकले एकत्र सांधून प्रबल जर्मन राष्ट्र निर्माण करणारा महान्

मुत्सद्दी जो बिस्मार्क ह्याचे एखाद्या इंग्रज किंवा फ्रेंच चरित्रकाराने लिहिलेले चरित्र घ्या. त्यात विपरीत दर्शन व्हावयाचाच संभव विशेष. येथे चरित्रवस्तूविषयी चरित्रकाराच्या मनात भक्तिरस उचंबळत नसून भय किंवा अशाच अन्य अनिष्ट विकारांची छाप पडलेली दिसेल. प्रेमाची आर्द्रता येथे न आढळता विरोधाची कठोरता आपणांस प्रत्ययाला येईल. सांप्रदायिक चरित्रकार जर गुणसागरात बुडून वाचकांस बुडवू पाहत असेल तर विरोधी चरित्रकार दोषगर्तेत आपण उडी घेऊन वाचकांसही तीत लोटू पाहील. सांप्रदायिक चरित्रकार जर चरित्रविषयास देव बनवील तर **विरोधी चरित्रकार** त्यास दैत्य ठरवील. परमाणूएवढा गुण पाहिला तर, त्याचा पहिला जर पर्वत करील, तर उलट दुसरा 'कुसळा' एवढा दोष असला, तर तो 'मुसळा' एवढा फुगवील. एकूण काय, पहिल्या पद्धतीत **देवीकरणाचा** तर दुसऱ्या पद्धतीत **दानवीकरणाचा** पण अतिरेकच दृष्टीस पडावयाचा.

आता भक्तीचा आणि विभक्तीचा असे हे दोन्ही चरित्रप्रकार एकांगी किंवा अतिरेकी म्हणून सोडून दिले तर सत्यदर्शनासाठी तिसराच पंथ स्वीकारावा लागतो. तो म्हटला म्हणजे त्रयस्थाने लिहिलेले चरित्र स्वीकारणे हा होय. त्रयस्थाची भूमिकाच वरील भक्तविभक्तांहून भिन्न असते. त्यामुळे तो अतिरेकदोषाने व्याप्त होण्याचा संभवच नसतो. गुण आणि दोष यांची नीट परीक्षा करून सावकाशपणाने व विकारवश न होता तो आपला अभिप्राय प्रगट करतो. भक्तिप्रेमाने तो आंधळा बनत नाही किंवा रागद्वेषाने तो डोळे फाडीत नाही. प्रशांत दृष्टीने आणि प्रसन्न मनाने तो गुण पाहताच लोभून जातो व दोष दिसताच डोळ्याला पदर लावतो. आपल्या वाचकांस **त्रयस्थ** हा गुणांच्या पर्वतांवरच रमवीत नाही अथवा दोषांच्या खाचांतच कुजवीत नाही, तर तो त्यांस पृथ्वीच्या सपाटीवरून चालवितो. याचाच अर्थ असा की देवीकरण अथवा दानवीकरण या दोन्ही अतिरेकी प्रकारांपासून दूर राहून तो **मानवीकरणाची** साधी आणि सत्य भूमिका पत्करतो. तो चरित्रविषयास देवकोटीत चढवीत नाही किंवा दानवकोटीत ढकलीत नाही; तर मानवकोटीतच ठेवतो. पण या योगाने त्याचे चरित्रचित्र जनदृष्टीने तितके परिणामकारक

होत नाही. त्यात भक्तीची दिव्यता आढळावयाची नाही. किंवा विरोधाची क्रूरता दिसावयाची नाही. अर्थात हे असले त्रयस्थकृत चरित्र वाचून बाहू क्वचितच् फुरफुरतील किंवा हात क्वचितच् शिवशिवतील.

ही त्रयस्थाची भूमिका घेणारा कोणी परदेशीय किंवा परधर्मीयच पाहिजे असे मात्र नाही. सांप्रदायिकांत किंवा विरोध्यांत सर्वच काही सारखे अतिरेकी नसतात. पुष्कळ विचारी असतात; आणि जेव्हा जेव्हा आपण घटकाभर मन शांत करून राहतो किंवा तुकोबांनी म्हटल्याप्रमाणे 'बैसोनी निवांत । शुद्ध करोनिया चित्त' असे असतो तेव्हा तेव्हा आपणही एक प्रकारचे त्रयस्थच असतो. भक्तीचे किंवा विभक्तीचे झटके सर्वांसच येतात. परंतु वर वर्णिलेली शांत-निवांत स्थिती थोडेच अनुभवितात. **सत्यदर्शनाचा अपार आनंद भोगावयाचा असल्यास ही त्रयस्थ भूमिका अत्यावश्यक आहे.** काल ही एक अशी शक्ती आहे की तिच्या साहाय्यानेही त्रयस्थपणाकडे माणसांचा व समाजांचा आपोआप कल झुकत जातो. काल लोटला की भक्तीचा पूर ओसरतो, व द्वेषाचे अंगार निवतात. त्यामुळे मागल्या पिढीतील व्यक्तींची किंवा वृत्तांची पुढील पिढीत चर्चा होत असता एक प्रकारचा तटस्थपणा नकळत अंगी येतो. काळ बराच लोटला की भक्तीचा गहिवर उतरत असतो आणि द्वेषाचे व्रण बुजत आलेले असतात. त्यामुळे नवीन पिढीत जुन्या पिढीसंबंधाने त्रयस्थपणाची छटा, आत दडून का होईना, पण असते. आणि काल जसा अधिक लोटेल तशी ती त्रयस्थपणाची कलाही पण वाढत जाईल. ती इतकी की फार पुढे पुढे कदाचित् विस्मरणाचे डोंगर आड येऊन एक निराळीच भूल समाजाला पडलेली कोठे कोठे दिसते.

येथवर आपण सांप्रदायिक, विरोधक आणि त्रयस्थ किंवा तटस्थ यांनी लिहिलेली चरित्रे चरित्रविषयाला अनुक्रमे देव–दानव–मानव पदवीला कशी पोचवितात व त्यांत देव–दानव कोटी ह्या अतिमानुष कोटीपेक्षा मानव कोटी ही आपणा मनुष्यांच्या प्रकृतीला जुळणारी असल्यामुळे ती सत्याला सर्वांत अधिक जवळ कशी आहे इत्यादि मुद्द्यांचे दिग्दर्शन केले.

वरील प्रपंच करण्याचे प्रयोजन एवढेच की, रा. साने यांनी लिहिलेले

प्रस्तुत चरित्र आपणांस या दृष्टीने पाहता यावे. गोपाळरावांच्या चरित्रात खळबळीचे व वादाचे अनेक प्रसंग आहेत. टिळक–गोखले वाद म्हणजे आधुनिक काळातील एक भारतच होईल, आणि या वादातील उभय पक्षांतील मुख्य प्रतिपक्षी दोघेही जरी आज दिवंगत झाले आहेत तरी त्यांच्या भक्तानुयायांत या वादाची ही खणाखणी अद्यापिही चांगलीच होते. टिळकचरित्रकार केळकर आणि रानडेचरित्रकार फाटक यांचा वाद ताजा आहे. ' टिळक–जीवनरहस्य 'ही एका टिळकविरोधी लेखकाकरवी प्रकट करण्यात आले आहे आणि कोणी तसलेच ' गोखले–जीवनरहस्य ' ही लवकरच लिहिणार नाही म्हणून कशावरून? तेव्हा अशा स्थितीत त्रयस्थाच्या भूमिकेला म्हणावा तेवढा वाव अद्यापि झाला आहे असे म्हणता येत नाही, अजून काही काळ गेला पाहिजे.

पण एक चमत्कार मात्र सांगण्याजोगा आहे. गोपाळराव आणि बळवंतराव या दोघा देशभक्तांच्या मृत्यूनंतर त्यांच्या प्रेतयात्रा ज्या निघाल्या त्यांत दोघांनाही राष्ट्राने आपल्या हृदयात केवढे उच्च स्थान दिले आहे याचा स्पष्ट पुरावा आपणांस आणि भावी पिढ्यांस मिळत आहे. आणि चमत्कारांतला चमत्कार असा की, राजनिष्ठ म्हणून गाजलेल्या मुंबईच्या नव्या राजधानीत राजद्रोही म्हणून शिक्षा झालेल्या टिळकांचा देह पडला आणि सरकारविरोधी म्हणून शापलेल्या पुण्याच्या जुन्या राजधानीत सी. आय. ई. म्हणून राजसन्मान मिळवलेल्या गोखल्यांचा अंत झाला! हा एक योगायोगच नव्हे तर काय? यावरून एवढे निर्विवाद होते की, दोघेही थोर लोकसेवक समाजाने वंद्य मानले आहेत. आता तपशिलाच्या मुद्द्यांवर वादीप्रतिवादी केवढेही त्वेषाने तुटून पडून भांडोत! जनतेने स्वयंस्फूर्तीने शिक्कामोर्तब केलेली या दोघा वंद्य पुरुषांची थोरवी कोणासही हिरावून घेता येणार नाही! त्या थोरवीच्या स्वरूपासंबंधानेही जरी मतभेद होईल तरी हे लहानमोठे मतभेदाचे मुद्दे जशी अधिक चर्चा होईल व आपण जरा पुढे जाऊ तसे स्पष्ट होतील. अद्यापि त्रयस्थास त्यासंबंधाने निर्णायक बोलण्याची वेळ आलेली दिसत नाही. मात्र मागे सांगितल्याप्रमाणे या थोर पुरुषांच्या संबंधाने ' आठवणी ', चरित्रे, चर्चा, अधिकाधिक प्रसिद्ध होत आहेत व त्यावरून तो काळ लवकरच येईल अशी आशा वाटते.

देशप्रगतीच्या विविधांगांचे व मूलतत्त्वांचे सम्यग्ज्ञान व त्यांचा आचारात्मक अनुभव अजून आमच्या लोकांस चांगला आलेला नाही पण येत चाललेला आहे आणि म्हणूनच निर्णायक मत देण्यास अनुकूलसा काळही जवळ येत आहे असे वर सुचविण्यात आले आहे.

रा. साने यांचे प्रस्तुत चरित्र हे वरील दिशेने वारा वाहू लागल्याचे एक चिन्ह आहे असे समजण्यास चिंता नाही. रा. साने हे टिळक-गोखल्यांच्या पिढीत वाढले नसून अगदी उदयोन्मुख पिढीतले एक होतकरू पदवीधर आहेत. टिळकांना व कदाचित् गोखल्यांना त्यांनी त्यांच्या कारकीर्दीच्या अखेरीअखेरीला पाहिले असेल. आज या थोर पुरुषांशी समागम करून घेण्यास त्या पुरुषांची भाषणे, लेख व कृती व त्यांच्याविषयी इतरांनी व्यक्त केलेले विचार व प्रगट केलेली माहिती यांवरच अवलंबून राहून रा. साने यांस आपले मत लिहावयास पाहिजे. ही मर्यादा संभाळून निःपक्षपाती दृष्टीने रा. साने यांनी आपले बिकट काम केले आहे. त्यांची त्रयस्थाची भूमिका आहे. आणि अद्यापि जरी या भूमिकेस पूर्णावकाश झालेला दिसत नाही तरी त्या बाजूची पाउलवाट मळलेली आहे आणि रा. साने त्याच वाटेने आपली चाल करीत आहेत.

वरील भूमिकाविशेषाचा मुद्दा सोडला तरीही रा. साने यांचे प्रस्तुत चरित्र आपणांस प्रियच होईल. कारण रा. साने यांची भाषाशैली प्रशंसनीय आहे. तिच्यात तारुण्याचा आवेश जसा चमकतो तसाच तारुण्यातील निर्मळपणाही लकाकत आहे. इंग्रजी, मराठी व संस्कृत या तिन्ही वाङ्मयांशी त्यांचा जो निकट परिचय आहे त्याचेही प्रतिबिंब ग्रंथात जागजागी पडलेले आपणांस दिसून आनंद होतो. देशप्रीती आणि देशसेवार्ती यांचे पाझर रा. साने यांच्या ग्रंथात जागोजाग फुटलेले दिसतात. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथ फार मधुर झाला आहे.

थोर पुरुषांच्या मुख्य दोन कोटि कल्पिता येतात. एक विचारस्रष्ट्यांची व दुसरी कार्यकर्त्यांची. श्रीकृष्ण, शंकराचार्य, कान्ट, स्पेन्सर, रूसो, बुद्ध, माझिनी, रामदास हे पहिल्या कोटीत येतील आणि अर्जुन, शिवाजी, नेपोलियन, वॉशिंग्टन्, कव्हूर वगैरे दुसऱ्या कोटीत पडतील. विचार-स्रष्ट्यांचा मागोवा घेत कार्यकर्ते जर गेले तर होणारे परिणाम फार विशाल

व चिरस्थाई होतात व समाजाची प्रगती फार झपाट्याने व निश्चयाने होते. मानवी प्रगतीच्या दरबारात विचारस्रष्टे आणि कार्यकर्ते या दोघांनाही सर्वोच्च स्थाने दिली पाहिजेत हे जरी खरे आहे तरी त्यातल्या त्यात विचारस्रष्ट्यांचा मान उजव्या बाजूस बसण्याचा आणि कार्यकर्त्यांचा मान डाव्या बाजूस असण्याचा आहे, हा फरक ध्यानात ठेविला पाहिजे.

याप्रमाणे विचार केला तर नामदार गोपाळराव गोखले हे विचार-स्रष्ट्यांच्या उच्च कोटीत बसविता येत नाहीत. त्यांचे गुरु रानडे यांच्या ठायी पहिल्या कोटीची म्हणजे विचारी कोटीची कला निःसंशय होती. तशीच चमक सुप्रसिद्ध आकडेशास्त्री व महापंडित कै. रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी यांच्या ठिकाणी होती. रानडे व जोशी या दोघांचाही निकट सहवास गोपाळराव यांस लाभला होता व त्याचा त्यांनी भरपूर उपयोग करून घेऊन आपली लायकी वाढविली. कॉलेजातले गोपाळ-रावांचे अध्यापन किंवा पुढे उदयकालातील कौन्सिलातील लोकसेवा ही पाहता त्यात सूक्ष्म अभ्यास, दीर्घ दृष्टी, नेमस्तपणा, मुद्देसूदपणा, सफाई-दारपणा, भारदस्तपणा आणि मधुरपणा इत्यादि पुष्कळ प्रशंसनीय गुण दिसले तरी विचारांची अभिनवता किंवा कल्पकता हे भरारीचे गुण आढळत नाहीत. आणि म्हणूनच गोखल्यांचे लिहिणे, बोलणे कधीही 'आर्ष' (क्लासिक) कोटीत पडणार नाही. परवा (ता. १९।२।२५) डॉ. मॅक्निकल् यांनीही गोपाळरावांना 'ऋषी' कोटीत दाखल केले नाही; त्याचे मर्म हेच होय. सीअर, द्रष्टा किंवा ऋषी ह्या कोटीची छटा रानड्यांत होती ती शिष्यांत उतरली नाही. शिष्याचा सर्व काळ 'धकाधकीच्या मामल्यात'च गेला.

या धकाधकीच्या मामल्यात मात्र गोपाळरावांची कामगिरी स्पृहणीय झाली. त्यांच्या मोठेपणाचे बीज सर्व यातच आहे. वयाच्या विशीच्या आत पदवीधर होऊन वयाच्या पन्नाशीच्या आत परकीय सरकाराच्या दरबारी प्रजापक्षाचा खंदा वीर म्हणून त्या सरकारची आदब संभाळून तडाखे देत देत त्याजकडूनही 'धन्य धन्य' असे उद्गार वदविणे ही कामगिरी असा-मान्य कोटीतली आहे यात संदेह नाही.

ही अपूर्व कामगिरी गोपाळरावांनी ज्या गुणांच्या जोरावर बजाविली ते

गुण आपल्या अंगी बाणविण्याचा जर आमच्या देशातील तरुण लोक प्रयत्न करतील तरच त्यांचे चरित्र लिहिल्याचे किंवा वाचल्याचे सार्थक झाले असे होणार आहे. गोपाळरावांचे हे गुण येथे थोडक्यात वर्णितो :—

( १ ) **कष्टाळूपणा**—सर्व थोरपणाचे मुख्य कारण कष्टाळूपणा हे होय. समर्थांनी जागोजागी सांगितले आहे की " रूप लावण्य अभ्यासिता नये । सहज गुणासि न चले उपाये । काही तरी धरावी सोये । आगांतुक गुणांची ॥ " द्रष्टेपणाचा डोळा जिने फुटतो ती प्रतिभा, ही सहज-गुणातली आहे. ते 'ईश्वरी देणे' आहे. पण कष्ट, दीर्घोद्योग हा मनुष्याच्या हातातला आहे. उद्योग किंवा प्रयत्न हा प्रसंगी सहजगुणापेक्षाही कमावला तर प्रभावी ठरतो, इतके याचे महत्त्व आहे. यासाठीच समर्थांनी म्हटले आहे : ' कष्टेवीण फळ नाही । कष्टेवीण राज्य नाही । केल्याविण होत नाही । साध्य जनी ॥ ' हा कष्टाचा आगांतुक गुण गोपाळरावांनी उत्तम प्रकारे कमावून प्रतिभादी सहजगुणांची उणीव भरून काढिली. या गुणाच्या बळावर त्यांनी कौन्सिलातले आपले प्रतिपक्षी चीत केले. इंग्रजी भाषा उणी पडली तर आम्हा नेटिवांना हसतात काय ! फाकडे इंग्रजी बोलणारे म्हणून आपण लौकिक संपादणार अशी ईर्षा धरून त्यांनी कष्ट केले. आकडेशास्त्रातली माहिती कच्ची असली तर सरकारी सभासद आमचा उपहास करतात काय तर आकडे पुस्तकांच्या समुद्रात बुड्या मारमारून व तारवे हाकहाकून ते त्यातील सराईत नावाडीच बनले. असे पडतील ते कष्ट त्यांनी केले. नसते केले तर फर्ग्यूसन कॉलेजातील शिदोरीवर अवलंबून एवढा पल्ला त्यांच्याने खचित गाठवला जाता ना ! पण कष्टाच्या बळावर त्यांनी ' असाध्य ते साध्य ' करून घेतले.

( २ ) **'नेमस्तपणा'**—हाही एक दुसरा महत्त्वाचा गुण गोपाळरावांच्या अंगी होता. आपल्या सर्व भावनांचे लगाम विवेकाच्या हाती देऊन आपला जीवितरथ चालविण्याची सावधगिरी त्यांनी बाळगिली, त्यामुळे त्यांचे आयुष्य इतके यशस्वी झाले. प्रत्यक्ष व्यवहारात काम करताना कल्पनांना मुरड घालावी लागते. कल्पकता हा एक सहजगुण आहे व तो श्रेष्ठ

आहे. भावना आणि कल्पना यांशिवाय हे जीवित निष्फल आणि निःसार होईल यात संशय नाही. पण कल्पनेचा धर्मच असा आहे की, ती नेहमी जोरजोराने उशी घेते. जसा जातिवंत मस्त वारू असावा आणि तो चौफेर उधळला म्हणजे त्याची टाप अस्मानात गेलेली भुईला पुनः केव्हा चिकटली ते दिसतच नाही तसेच कल्पनेचे आहे. कल्पनेचे तारू एकदा भडकले की कोठे जाईल याचा नेम नाही; उतरले तर एखाद्या सुंदर बेटावर उतरेल नाहीपेक्षा खडकावर फुटेल किंवा रेतीत रुतेल ! यासाठी कल्पनेला नेहेमी बांधून चालविली पाहिजे. व्यवहाराच्या जड शृंखला कल्पनेच्या पायात घालून तिला नाचविली म्हणजे तिचा खेळ मनोहर होतो. या कल्पना-गुणाचा उत्कर्ष गोपाळरावांत नव्हता. तथापि प्रत्येक मनुष्यमात्राला अंश-मात्राने सर्वच गुण थोडेफार वाटणीला आलेले असतात. आपल्या वाटणीला आलेल्या भावना उद्दाम होऊ न देता गोपाळरावांनी त्यांना कार्यवश ठेवल्या म्हणून त्यांची नेमस्त अशी ख्याती झाली. राजकारणी पुरुषांना हा नेमस्तपणाचा समर्थांनी स्तविलेला गुण फार उपयोगी पडतो. या गुणाचे उच्च स्वरूप म्हणजे चतुरपणा व मुत्सद्दीपणा आणि याचे अधम स्वरूप म्हणजे नेभळटपणा व दीनपणा होय. गोपाळरावांनी नेमस्तपणाचे उच्च स्वरूप जगापुढे प्रकट केले आणि यात जरी एखाद्या काव्हूरशी त्यांची बरोबरी कल्पिणे ही अतिशयोक्तीच ठरेल तरी एखाद्या बर्कच्या जोडीला त्यांस ठेवण्यास चिंता नाही.

( ३ ) **श्रद्धा**—श्रद्धा हा त्यांचा तिसरा गुण वर्णन करता येईल. रानड्यांचे ठिकाणी श्रद्धा बळकट होती. आणि 'हॅपी आर दे' या बहुपठित उद्गारात त्यांनी ज्या प्रॉमिस्ड लॅंड—म्हणजे भावी स्वर्ग—संबंधीचा आशा—वाद प्रदर्शित केला आहे त्याचाच अनुवाद गोखले यांनी काशी—काँग्रेसच्या अध्यक्षपीठावरूनही केला. यावरून श्रद्धेचे हे वारे गोपाळरावांनाही लागलेले होते. वयाच्या उत्तर काळात गोपाळरावांच्या मनात हा श्रद्धाळू-पणा वाढत गेला असे चरित्रकारांनी सुचविले आहे. हे श्रद्धाबळ हेही सर्व थोर पुरुषांच्या ठिकाणी वसत असलेले आढळून येते. "योयच्छ्रद्धः स एव सः" हा भगवद्गीतेचा सिद्धान्त सत्य आहे आणि मनाला श्रद्धेने काही थोर वेड लावून जीवेभावे झटल्याखेरीज महत्कार्य कधीच होत

नाही. श्रद्धाबळ हे काही गोपाळरावांचे प्रधानबळ नव्हे आणि म्हणून क्रान्तिदर्शित्वाचा लाभ त्यांस कधी घडला नाही. रानड्यांना तो थोडासा घडला व आपल्या गुरूवरच श्रद्धा ठेवून त्यांजकडून मिळालेल्या श्रद्धेच्या ठेवीवरच गोपाळरावांनी आपले काम साधून घेतले.

(४) **सौजन्य**—शिष्टपणाची वागणूक हा चौथा मोठा गुण गोपाळरावांनी संपादिला होता. लहानपणापासूनच तशी त्यांची प्रवृत्ती होती व पुढे तारुण्यात, जेव्हा दृष्टी फाकते त्यावेळीही, त्यांनी आपल्या मनाला आवरून मर्यादेने वागणूक केली; त्यामुळे अखेरपावेतो त्यांच्या ठिकाणी सज्जनपणा कायम राहिला. सार्वजनिक आयुष्यक्रमात बरेवाईट पुष्कळ प्रसंग आले; तथापि त्यांनी निदान स्वतः तरी शिष्टाचाराचा अतिक्रम केलेला दाखविता येणार नाही. मोठ्या पुढाऱ्यांचे क्षुद्र अनुयायी एकमेकांवर भोकतात यात आश्चर्य नाही; पण त्यापासून खुद्द मोठ्यांनी दूर राहावे लागते आणि ही मर्यादा गोपाळरावांनी पाळिली होती. त्यांचे गुरू माधवराव हे तर सौजन्यसागर म्हणूनच प्रसिद्ध होते.

(५) **निःस्वार्थीपणा**—पाचवा गुण गोपाळरावांचा निःस्वार्थीपणा हा सांगता येण्यासारखा आहे. स्वतःकरिता व कुटुंबीयांकरिता कष्ट करणारी 'कुटुंबकाबाडी' उदंड पडली आहेत. पण देशहितासाठी आपली काया झिजवून आणि माया खर्चून मागे कीर्ती उरविणारे गोपाळरावांसारखे विरळाच. फकिरी बाण्याचा निःस्वार्थीपणा हा त्या गुणाचा कडेलोट होय. कडेलोटाचा मार्ग व्यावहारिकांचा नव्हे. व्यावहारिक हे नेमस्तपणाची मर्यादा संभाळूनच चालणार आणि तेच धोरण गोपाळरावांनी आचरिले.

(६) **देशप्रीती**—वरील पाचांपेक्षाही हा सहावा गुण एक प्रकारे फार महत्त्वाचा होय. आपला देश सुखी व्हावा ही तळमळ पोटात गोपाळरावांनी अहोरात्र वागाविली होती. त्यांची शुद्ध व सोज्वळ देशप्रीती त्यांचे प्रतिपक्षी* यांसही निःसंशय मान्य करावी लागे, अशी प्रखर होती.

---

*संयुक्त प्रांतात गोपाळराव गोखले यांनी दौरा काढला. त्या वेळी केसरीकारांनी त्यांजवर टीका करताना पुढील उद्गार काढले आहेत. त्यावरून आमचे वरील म्हणणे वाचकांस पटेल अशी आमची खात्री आहे.

सामान्य जनसमूहाला ती दिसण्याचे प्रसंग तितके येत नसत. तथापि त्यांचा आत्मा देशाच्या भावी हितासाठी तळमळत असे आणि तोच त्यांस आतून निरंतर जागवीत असे. ही देशप्रीतीची आग आत नसती तर त्यांच्या हातून झाला हा उद्योग झाला नसता. त्यांनी चटकन् सरकारी अधिकाऱ्यांची कृपा संपादून एखादी लठ्ठ पगाराची नोकरी मिळवून आणि वर मोठेपणाही मिरविण्याची एखादी युक्ती पसंत केली असती ! पण—

"आपल्या देशाची स्थिती अत्यंत वाईट झालेली आहे व या गोष्टीचा वेळीच जर लोकांनी काही बंदोबस्त केला नाही तर आमचा रोग दुःसाध्य होईल अशी कळकळ ज्यांना मनापासून वाटत आहे अशांमध्ये ना. गोखले यांची गणना केली पाहिजे. देशस्थितीसंबंधाने इतर कोणाला जितके वाईट वाटत असेल व काही तरी उपाय योजणे जरूर आहे याविषयी इतर कोणाला जितकी काळजी वाटत असेल तितकेच वाईट ना. गोखले यांना वाटत असून देशाबद्दल तितकीच काळजी तेही वाहात आहेत. कळकळीच्या कमीजास्तपणामुळे नवीन पक्ष व ना. गोखले यांच्या राजकारणात भेद उत्पन्न झालेला नाही. हा भेद स्वभावाचा व विचारसरणीचा आहे." (केसरी—अग्रलेख ता. १२ फेब्रुवारी १९०७).

असले भिकार मोह त्यांनी आपल्या शुद्ध आत्म्यास कधीही होऊ दिले नाहीत तर देशहिताची शुद्ध, पवित्र आणि थोर चिंताच रात्रंदिवस वाहिली म्हणूनच ते एवढ्या महत्पदाला चढले.

येणेप्रमाणे गोपाळरावांचे आंगच्या अनेक गुणांपैकी निवडक सहा गुणांचे स्वरूप व महत्त्व येथवर वर्णन केले. त्याची ही षड्गुणैश्वर्यसंपन्नता पाहून गोपाळरावांचा कोणालाही हेवा वाटेल आणि जर त्यांचे अनुकरण करण्याचे कोणी मनात आणील तरच हे गुण गोपाळरावांनी वाढीस लावल्याचे चीज झाले असे म्हणता येईल. रा. साने यांनी गोपाळरावांच्या आंगचे हे गुण फार रसाळपणाने व कळकळीने वर्णन केले आहेत व त्याचा ठसा आपल्या मनावर वाचक उठवून घेऊन कृतार्थ होतील अशी आशा आहे.

नामदार गोखले यांचे गुण आपण वर्णिले; परंतु त्यांच्या प्रत्यक्ष कार्याविषयी थोडा विचार केल्याशिवाय ही प्रस्तावना पुरी करता येत नाही. गोपाळराव गोखले यांच्या सर्व कार्यांत आमच्या मते **भारतसेवक समाजा**ची स्थापना ही सर्वांत श्रेष्ठ कामगिरी होय. अशी संस्था अखिल भारतवर्षात दुसरी नाही. ' पोलिटिकल संन्यासी ' निर्माण करावे म्हणून ही संघटना गोपाळरावांनी केली. यासाठी संथपणे खपून व आपले सर्व वजन खर्चून त्यांनी निधी जमविला आणि लायोला किंवा रामदास यांच्याप्रमाणे आद्य सभासद म्हणून सर्व व्यवस्था स्वतः केली. राजकीय व आर्थिक विषयांवरील सर्वोत्कृष्ट ग्रंथसंग्रह येथे करण्यास त्यांनी आरंभ केला होता. आणि ते जर सुदैवाने आणखी बरीच वर्षे जगते तर ही संस्था अत्यंत कार्यकारी करून तिचे नाव जगाच्या इतिहासात बहुत काळ राहील असा तिचा विकास त्यांनी केला असता. पुण्यासारख्या ठिकाणी इंपीरिअल लायब्ररीसारखे ग्रंथालय स्थापावे हा विचार गोखले यांस मानवला होता आणि आज पुण्यास विद्यापीठ स्थापण्याच्या मागणीत त्यांजकडून खात्रीने चांगलीच मदत झाली असती. त्यांच्यामागे त्यांची जी उपदिष्ट मंडळी हल्ली आहे त्यांजवर हा बोजा आहे आणि त्यांनी भोवतालची परिस्थिती कशी झपाट्याने बदलत आहे व या वावटळीत आपण खरोखरच किती पुढे गेलो आहोत याचा नक्की अंदाज करून जर आपली हालचाल ठेविली नाही तर ते मागे पडतील व गोपाळरावांचे कार्य त्या मानाने अपूर्णच राहील. खुद्द गोपाळरावांचेसुद्धा असेच झाले होते की, त्यांचे तोंड सरकाराकडे वळलेले असे; म्हणजे सोसायटी सोडल्यापासून पुढे ते प्रजापक्षातर्फे सरकाराशी वकिली करण्यासाठी सरकारदरबारीच बरेचसे राहिले. तरी पण त्यांचा आत्मा स्वलोकांत वावरत होता. आणि म्हणूनच त्यांनी भारत–सेवक–समाजाची स्थापना केली आणि म्हणूनच दहांपैकी नऊ हिस्से काम स्वदेशातच केले पाहिजे असे त्यांनी बजावून सांगितले. खुद्द लोकांकडे तोंड वळवून त्यांना आपले विचार गोपाळरावांनी क्वचित् वेळीच कळविले. हिंदुस्थानाविषयी विलायतेत त्यांनी जितकी व्याख्याने दिली तितकी हिंदुस्थानात दिली नाहीत. तेथे बरेच बोलणे ते कौन्सिलातून करीत. लोकमत तयार करण्याची अवघड कामगिरी त्यांस कितपत

साधली असती हा प्रश्न मनोरंजक आहे. लोकमत तयार करण्याचे मुख्य साधन म्हणजे लोकभाषा. जोवर सुशिक्षित मंडळी ही मूकजनतेचे प्रतिनिधित्व बिनबोभाट करीत असे व तो त्यांचा हक्क श्रद्धाळूपणे इतर जनतेने मानला होता तोवर इंग्रजीतून चालणाऱ्या काँग्रेसादी सभा इंग्रजीतून पडणारे वक्तृत्वाचे पाऊस उपयोगी पडले. परंतु जशी जागृती झाली, जसा गोपाळरावांसारख्यांनी प्राथमिक शिक्षणाचा टाहो फोडला आणि टिळकांसारख्यांनी केसरी गर्जनांनी देश दणाणून सोडला तसा लोकभाषेचा व्यापार अनावर वाढला. आता भविष्यकाळ एकट्या इंग्रजीचा नाही. इंग्रजीने इंग्रज काबीज करावयाचा तर लोकभाषांनी लोक आवळावयाची कामगिरी यापुढे करावी लागणार. गोपाळरावांनी लोकभाषेचे प्रभावी हत्यार जर वापरले असते तर त्यांची स्थिती आज फार निराळी असती. साउथ आफ्रिकेतून आल्यावर आणि क्वचित् पूर्वींही गोपाळरावांनी तो प्रयोग करून पाहिला होता आणि त्यांच्या नैसर्गिक सामर्थ्यामुळे जरी तो अयशस्वी होत नसे तरी इंग्रजीइतका तो यशस्वी झाला असेही त्यांस वाटत नसावे. गोपाळरावांचे गुरू या प्रयोगातही पंडित होते. परंतु हा प्रयोग जोराने चालविला असता म्हणजे श्रीशिवाजी उत्सवासारख्या लोकप्रिय परंतु नाजूक प्रकरणांची गोपाळरावांना अडचण उत्पन्न झाली असती! असो. गोपाळरावांचे काळी नवयुगाचा उदय होत होता. तेथूनही बरीच मजल आपण आज पुढे चालून गेलो आहो. अशा वेळीं गोपाळरावांचा आपणांस अत्यंत उपयोग झाला असता; परंतु आता आपणां सर्वांवर — केवळ सांप्रदायिकांवरच नव्हे — तो भार आहे. रानडे, चिपळोणकर, आगरकर, टिळक, गोखले-प्रभृति लोकहिताचे 'जागली' आपणात झाले. त्यांची आठवण ठेवून, त्यांचे गुण घेऊन व उपकार आठवून तोच भार आपण पुढिलांवर वाढवून सोपविला पाहिजे.

फाल्गुन शु. ५, १८४६, पुणे. } दत्तो वामन पोतदार

# विहंगावलोकन

ना. गोपाळ कृष्ण गोखले यांचे निधन होऊन आज दहा वर्षें लोटली. या अवधीत आणखी कित्येक लोकाग्रणी दिवंगत झाले. त्यांतल्या एकाचे चरित्र-वाङ्मय महाराष्ट्रामध्ये बरेच बाहेर पडले, परंतु गोखल्यांचे विस्तृत व ज्यामध्ये त्यांच्या अनेकविध कर्तृत्वासंबंधी संकलित माहिती दिलेली आहे असे एकही चरित्र आजवर प्रसिद्ध झाले नव्हते. गोखल्यांची महाराष्ट्रीयांनी लिहिलेली इंग्रजी, मराठी दोन्ही मिळून चार संक्षिप्त चरित्रे उपलब्ध आहेत. त्यांमध्ये चरित्रनायकाच्या चरित्राची रूपरेषा पाहावयास सापडते. याच लहान लहान पुस्तकांनी इतके दिवस जिज्ञासूंचे समाधान केले आहे. मराठीप्रमाणेच अन्य प्रांतांत व अन्य भाषांमध्ये गोखल्यांची बरीच चरित्रे आहेत. ज्या वर्षी गोखले इहलोक सोडून गेले त्या वर्षांतच यांतल्या पुष्कळ चरित्रपुस्तकांचा अवतार झाला असून त्यांच्याच खपानुसार आवृत्त्या निघाल्याची उदाहरणे आहेत. परंतु त्यापेक्षा जास्त मोठ्या प्रमाणावर या बाबतीत झालेला पहिला प्रयत्न म्हणजे रा. साने यांनी लिहिलेले प्रस्तुत चरित्र होय. रा. साने यांचे याविषयी अभिनंदन करणे अवश्य आहेच, पण त्यापेक्षा जास्त अभिनंदनाला खरोखर या पुस्तकाचे प्रकाशक रा. ताम्हनकर हेच पात्र होत, असे एकंदर परिस्थिती लक्षात घेतल्यास प्रत्येकाला कबूल करावे लागेल. त्यांनी मनावर घेतले नसते तर हे चरित्र इतक्या लवकर प्रसिद्धीस येण्याचा संभव नव्हता.

या चरित्रासंबंधात पहिली ध्यानात ठेवण्यासारखी गोष्ट ती ही की, आजवर इतके विस्तृत चरित्र मराठीत झालेले नाही. टिळकांची लहानमोठी बरीच चरित्रे असल्याने त्यांची बाजू समजण्याचे साधन लोकांपुढे आहे. गोखल्यांच्या चरित्राची बाजू समजण्याचे साधन उपलब्ध नव्हते. ही उणीव काही अंशी रा. साने यांनी भरून काढली आहे व त्याबद्दल सत्यान्वेषी तरुण पिढीकडून त्यांना निःसंशय धन्यवाद मिळतील. प्रयत्नशील पुरुष चिकाटीच्या

उद्योगाने उत्कर्षाच्या किती उंचीवर जाऊ शकतो, याचे उत्तम उदाहरण जर कोणते असेल तर तें गोखले यांचेच एक आहे. कोणी म्हणतात गोखल्यांच्या आंगी असामान्य बुद्धिमत्ता नव्हती. कोणी दुसरे एखादे न्यून दाखवून त्यांची महती कमी करता आल्यास पाहतात. पण ही न्यूनेच गोखल्यांच्या चारित्र्याचे महत्त्व सिद्ध करणारी आहेत हे निंदकांच्या ध्यानात राहत नाही. सामान्य बुद्धिमत्तेचे गोखले केवळ अविश्रांत उद्योगाच्या जोरावर असामान्य बुद्धिमंतांना कर्तबगारीने थक्क करू लागले, ही गोष्ट स्फूर्तिदायक नाही असे कोण म्हणेल? निरलस यत्नाच्या बळाने सामान्यत्वाची सरहद्द ओलांडून ज्या पुरुषाने असामान्यत्वाच्या क्षेत्रातले अत्युच्च स्थान पादाक्रांत केले, त्याचा कित्ता गिरवावा अशी प्रेरणा कोणाला होणार नाही? अलौकिक बुद्धिमत्ता, विख्यात कुळ, अपार धनसंचय ही सुद्धा मोठेपणाला नेऊन पोचविणारी साधने आहेत. परंतु ती दैवायत्त असल्यामुळे ज्यांना ती जन्मतः प्राप्त झाली असतील, त्यांचे चरित्र अनुकरणाच्या दृष्टीने आटोक्याबाहेरचे वाटल्यास नवल नाही. गोखल्यांच्या चरित्राची मातब्बरी या दृष्टीने विशेष आहे. देशहिताची तळमळ असल्यास सामान्य बुद्धी, दारिद्र्य वगैरे विघ्ने माणसाच्या कर्तृत्वाला बाधा करू शकत नाहीत, हे गोखल्यांच्या चरित्राचे रहस्य आहे. त्या रहस्याचा तरुण जनतेच्या मनावर ठसा उत्पन्न करणारे जेवढे वाङ्मय उत्पन्न होईल तेवढे थोडेच ठरेल.

गोखल्यांचे चरित्र १८६६ पासून १९१५ पर्यंतच्या म्हणजे ४९ वर्षांच्या कालमर्यादेत पसरलेले होते. परंतु हा काळ महाराष्ट्राच्या व भारतवर्षाच्या इतिहासात अत्यंत महत्त्वाचा गणावा लागतो. याच काळात महाराष्ट्राच्या राजकीय जीविताला वळण लागले. ब्रिटिशांचे हिंदुस्तानातले राज्यकर्तृत्व विजय आणि जिंकलेल्या प्रदेशाचा बंदोबस्त या दोन अवस्थांतून सुटून पुनर्घटनेच्या अवस्थेत १८६१ साली शिरले. १८५७ च्या बंडाने इंग्रजी राज्यकर्तृत्वाची मिठी किती घट्ट बसली आहे, याचा साऱ्या दुनियेला अनुभव आला. पण त्याच वेळी राज्यकर्त्यांनाही समजले की, हिंदी लोकमताची विचारपूस करून आपले प्रभुत्व गाजविण्याची वेळ आली आहे. १८६१ मध्ये कौन्सिले अस्ति-

त्वात आणून इंग्रजांनी पुनर्घटनेला प्रारंभ केला. यानंतर पाच वर्षांनी गोखल्यांचा जन्म होऊन हिंदी लोकमत काँग्रेसच्या रूपाने एकवटून नवीन नवीन आकांक्षा व्यक्त करू लागले. त्याच वेळी गोखले यांनी विद्यार्जन संपवून स्वार्थत्यागपूर्वक विद्यादान करावयास लावणाऱ्या सार्वजनिक कार्यात आपले पाऊल टाकले. नंतर हळूहळू सुधारकाचे संपादक, सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकाचे संपादक व सभेचे चिटणीस, प्रांतिक परिषदेचे चिटणीस, काँग्रेसचे एक प्रतिनिधी अशी निरनिराळ्या कार्यांच्या परंपरेने त्यांनी लोकसेवेचा मार्ग चोखाळण्यास आरंभ केला. वरच्यासारख्या बाहेरच्या स्वयंप्रेरणेने स्वीकारलेल्या कामाचा व्याप वाढत असता त्यांनी ज्या शिक्षणसंस्थेला आयुष्याच्या सुरुवातीस सर्वस्व अर्पण करण्याची दीक्षा घेतली होती, त्या संस्थेच्या कामाचाही बोजा वाढत होता. ही सर्व कामे त्यांनी एकमेकांचा विरोध होऊ न देता सारख्याच उत्साहाने, आस्थेने आणि कळकळीने चालविली. १८९७ साली त्यांची उमेदवारी संपून त्यांचे नाव होतकरू लोकनायक या नात्याने मुख्य मुख्य पुढाऱ्यांबरोबर गोवले जाऊ लागले. मध्यंतरी वर्ष सवा वर्ष लोकापवादामुळे त्यांचे उज्ज्वल कर्तृत्व अस्तप्राय दिसत होते. परंतु ही स्थिती पालटून १८९९ नंतर त्यांची लोकसेवा डोळे दिपवून सोडण्यासारख्या प्रखरतेने चमकू लागली व मग १९१५ पर्यंत तिच्या विलक्षण तेजस्वितेमुळे कोणत्याही अपवादाला डोके वर काढता आले नाही. असे गोखल्यांच्या चरित्राचे स्थूल स्वरूप आहे. त्यांनी आपली कर्तबगारी प्रामुख्याने एकट्या राजकीय विषयाला वाहिली असल्याने सकृद्दर्शनी त्यांचे चरित्र बिनगुंतागुंतीचे व एकतंत्री वाटते. पण त्यांच्या कार्यांचे समग्र व यथोचित आकलन होण्यासाठी–पृथक्करण करू लागले की, त्याची बहुविधता ध्यानात आल्याशिवाय राहत नाही. त्यांच्या कार्याची बहुविधता शेवटपर्यंत कायम होती. पण प्रत्येक महापुरुषाच्या पूर्ववयातल्या कामगिरीला विशेष महत्त्व असते. त्याच्या आयुष्यक्रमाला वळण लागून ते स्थिर होईपर्यंतच्या काळातील कामगिरीचा इतिहास अधिक बोधप्रद समजला जातो. गोखल्यांच्या आयुष्यातली, या दृष्टीने पाहिल्यास, १८८७ ते १८९७ ही दहा वर्षे अत्यंत महत्त्वाची आहेत. त्यांचे राज-

कीय ध्येय याच वर्षात निश्चित झाले. सदर काळात त्यांची हिंदी राजकारणाच्या भिन्न भिन्न अंगांसंबंधी जी मते बनली, त्यांचाच त्यांनी १९०० पासून पुढील पंधरा वर्षांत जोराने पुरस्कार केला व त्यांतली काही सफळ करून दाखविली. ते प्रोफेसर होते, सुधारकाचे व सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकाचे संपादक होते, काँग्रेसमधले व प्रांतिक परिषदेतले एक वक्ते होते वगैरे सामान्य गोष्टी सर्वांच्या परिचयाच्या आहेत; पण त्यांनी कोणती मते प्रतिपादन केली, त्यांमध्ये व पुढच्या मतांमध्ये अंतर पडले का सादृश्य कायम होते, इत्यादी मुद्दयांचा तपशीलवार ऊहापोह केल्याखेरीज त्यांच्या लोकसेवेचे वैशिष्ट्य लक्षात येणे शक्य नाही. प्रस्तुत मुद्द्यांचा अभ्यास करण्याची साधने थोडी दुर्मिळ आहेत. व ती मिळविण्याचा उद्योग न केल्यामुळे जो दोष स्वाभाविकपणे उत्पन्न होतो तो दोष या पुस्तकात राहून गेला आहे.

गोखल्यांचा उदय झाला तेव्हाच महाराष्ट्रात टिळकांचा उदय झाला. परंतु दुर्दैवामुळे या दोघांमध्ये तीव्र मतविरोध उत्पन्न होऊन तो शेवटपर्यंत अखंड टिकला. या कारणामुळे एकाच्या चरित्राचा विचार करताना दुसऱ्याच्या चरित्राचा विचार केल्याखेरीज गत्यंतर राहत नाही. त्यांपैकी टिळक हे अत्यंत लोकप्रिय, अर्थात त्यांच्या बाजूने कसलीही गोष्ट पुढे आली तरी तिचा लोकांत चटकन् आदर होतो. गोखल्यांना लोकप्रियता कधीच लाभली नाही. याचा परिणाम त्यांच्याविषयी लोकांत आढळणाऱ्या अनेक अवास्तव दुष्ट ग्रहांमध्ये दिसून येतो. गोखल्यांविषयी बारीकसारीक गैरसमज तर पुष्कळच आहेत, पण अर्वाचीन हिंदी राजकारणातले कित्येक प्रसिद्ध प्रसंग असे आहेत की, त्यांची पाहणी करताना हटकून बुद्धिभेद होतो. १८९५ मधील पुण्याची काँग्रेसची बैठक व सार्वजनिक सभेतून झालेली रानडे पक्षाची हकालपट्टी, १८९७ सालातली गोखल्यांची माफी, १९०७ सालातली सुरतेची काँग्रेस आणि १९१५ साली गोखले मृत्युशय्येवर असताना माजलेला काँग्रेसच्या समेटाचा वाद, ही बुद्धिभेद करणाऱ्या प्रसंगांची उदाहरणे आहेत. यातली एक बाजू लोकांना थोडी फार माहीत आहे, व तीच प्रिय असल्याने सामान्यतः दुसरी बाजू पाहण्याचा यत्न कोणी करीत नाही. गोखल्यांचे चरित्र

लिहिणाराला ही दुसरी बाजू पाहणे अत्यंत आवश्यक आहे. रा. साने यांनी दोन्ही बाजू पाहून निर्णय देण्याचा यत्न केला आहे. परंतु एका बाजूच्या मताचा त्यांच्या मनावर अतिशय पगडा बसला आहे, म्हणून म्हणा अगर दुसरी बाजू पाहण्याची सगळी साधने त्यांना प्राप्त झाली नाहीत म्हणून म्हणा, त्यांनी नमूद केलेल्या निर्णयात पक्षपाताचा भाग बराच आढळतो. असे पक्षपाताचे मासले येथे थोड्या विस्ताराने दाखल केल्यास अप्रस्तुत होणार नाही.

ना. रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे यांनी लिहिलेल्या गोखले–चरित्रात एका ठिकाणी ' टिळकांना गोखल्यांचा मत्सर वाटत होता, ' असे विधान आहे; हे विधान त्यांनी टिळकांच्या हयातीत केले होते. शिवाय त्यांचा व गोखल्यांचा निकट स्नेहसंबंध होता. या गोष्टी लक्षात ठेवूनच त्यांच्या विधानाचा साधकबाधक विचार करावयास पाहिजे. सदर विधानावर रा. आठल्ये यांनी आपल्या इंग्रजी टिळक–चरित्रात प्रतिकूल टीका लिहून मत्सराच्या आरोपातून टिळकांना दोषमुक्त केले आहे. त्याचाच अनुवाद रा. साने यांनी केला आहे. परंतु थोड्या बारकाईने रा. आठल्ये यांच्या टीकेचा परामर्श घेतल्यास त्यांनी टिळकांच्या तरफदारीसाठी पत्करलेली तर्कपद्धती निर्दोष नसल्याचे दिसून येते. त्यांच्या टीकेचा भावार्थ असा की, १८८६–८७ सालात टिळकांनी गोखल्यांचा मत्सर करण्यासारखे गोखल्यांमध्ये काही विशेष गुण नव्हते. टिळकांनी रानडे–तेलंगांविषयी मत्सर बाळगला असता तर ते शोभणारे होते. गोखल्यांना तेव्हा शाळेत धड शिकविता देखील येत नव्हते; अशा व्यक्तीशी टिळकांची चुरस असणे संभवनीय नाही. ही विचारसरणी बऱ्याच चुकीच्या कल्पनांवर उभारली आहे. अगोदर गोखल्यांना या दिवसांत शिक्षकाचे काम नीट बजावता येत नव्हते, हीच कल्पना चुकीची आहे. त्यांनी मिळकत वाढविण्याकरिता न्यू इंग्लिश स्कुलात शिक्षकाची नोकरी असताना पब्लिक सर्व्हिसच्या परिक्षेचा वर्ग चालविला होता व त्या वर्गाच्या जोरावर त्यांना मनाजोगी किफायत होत असे, ही गोष्ट सर्वमान्य आहे. या गोष्टीमुळे त्यांनी अध्यापनकौशल्य किती जलद संपादन केले याचा अंदाज करणे अशक्य नाही. याबरोबरच टिळकांची तेव्हाची स्थिती जमेस धरावी लागते.

टिळकांची योग्यता तेव्हा सामान्य शिक्षकाहून जास्त नव्हती. सामान्य योग्यतेची माणसे एकमेकांचा मत्सर करतात हा सिद्धांत खरा असल्यास टिळकांनी गोखल्यांचा मत्सर करण्यासारखी परिस्थिती १८८६-८७ सालात होती, असे वरच्या वृत्तांतावरून दिसून येईल. टिळक मत्सर करीत होते का नव्हते हा या स्थळी वादाचा मुद्दा नाही. कोणताही पक्ष ठाम-पणाने स्वीकारताना दोन्ही बाजूंचे सूक्ष्म निरीक्षण का अवश्य हे समजण्या-करिता एवढे विवेचन केले आहे.

१८९५ साली पुण्यास कॉंग्रेसची बैठक भरली, त्यापूर्वी पुण्यास कॉंग्रेसचा मंडप सामाजिक सुधारणेच्या परिषदेला देण्यात यावा की न यावा या संबंधात सुधारणेच्या विरोधकांनी दंगल सुरू ठेवली होती. सुधारणेच्या शत्रुपक्षाचे प्रथम प्रच्छन्न व पुढे उघड धुरीणत्व टिळकांनी अंगिकारले होते. याविषयी मागल्या टिळक-चरित्रातून नानाविध समर्थन लोकांसमोर येऊन गेले आहे. रा. साने यांनीही त्या समर्थनाच्या धोरणाने आपला मजकूर लिहिला आहे. तसे करताना त्यांनी टिळकां-इतकीच गोखल्यांची बाजू पाहावयास हवी होती. गोखल्यांची बाजू त्या वेळी सुधारक, ज्ञानप्रकाश आणि मुंबईची गुजराथी व इंदुप्रकाश ही पत्रे यामध्ये प्रसिद्ध होत असे. ती नजरेखाली घालून वरील धोरण रा. साने यांनी पत्करल्याचे प्रमाण त्यांच्या लिहिण्यात नाही. त्यामुळे गोखल्यांच्या बाबतीत तर अन्याय झाला आहेच, पण आश्चर्य हे की काही विधानांत, टिळकांनी जे म्हटले नाही, ते म्हटल्याचा आरोप केला आहे. सारांश, रा. साने यांना त्या प्रकरणाचा यथार्थ बोध होऊन त्यांनी टिळकांचे मंडन केले असा निष्कर्ष काढता येत नाही. १९१५ मध्ये गोखल्यांच्या मृत्यूपूर्वी सुमारे पंधरा दिवस जी खडाजंगी कॉंग्रेसच्या समेटाबाबत चालली होती तिची हकीगत देताना रा. साने यांनी अन्यायदर्शक वाक्ये लिहून टाकली आहेत. त्यांचा झोक टिळकांचा वाद सत्यास धरून होता असे दाखविणारा आहे. गोखल्यांवर टीका करताना टिळकांनी जे कित्येक सिद्धांत केवळ अनुमानाच्या जोरावर खरे मानले, तेच रा. साने यांनीही खरे धरले आहेत. उदाहरणार्थ, श्री. सुब्बाराव यांनी लिहून काढलेले टिळकांशी झालेल्या संवादाचे टिपण गोखल्यांनी पाहिले होते की नव्हते, हे एकच

उदाहरण घ्या. आपणांस ते भूपेंद्रबाबूंना पत्र लिहिण्याच्या वेळी पाहावयास सापडले नव्हते, असे गोखल्यांनी स्पष्ट म्हटले होते. त्यांनी ते वाचले होते, असे छातीठोक सांगणारा विश्वसनीय साक्षीदार या वादात कोणीच पुढे आलेला नसल्याने, गोखल्यांनी ते टिपण पाहिले होते का नव्हते, याविषयी शक्याशक्यतेच्या आनुमानिक आधाराने शुष्क तर्क काढून गोखल्यांना दोष लावणे केव्हाही उचित ठरणार नाही. परंतु रा. साने यांनी असल्याच तर्कात शिरून गोखल्यांवर शिंतोडे उडविले आहेत.

१९०८ साली टिळकांना राजद्रोहाच्या आरोपावरून शिक्षा झाली तेव्हा गोखले विलायतेत होते. विलायतेस शिक्षेची बातमी पोचल्यावर तेथल्या कित्येक हिंदी रहिवाशांनी टिळकांसंबंधी सहानुभूती व सरकारचा निषेध व्यक्त करण्यासाठी एक सभा भरविली. गोखल्यांनाही पाचारण होते, परंतु गोखले त्या सभेला गेले नाहीत, या गोष्टीवरून गोखल्यांना टिळकांविषयी कोरडी सहानुभूती देखील दाखविणे योग्य वाटले नाही, अशा अर्थाचे एक विधान जाता जाता रा. साने यांनी पुस्तकात घातले आहे. गोखल्यांच्या प्रस्तुत गैरहजेरीवरून याहीपेक्षा जास्त भयंकर तर्क मागे लोक करीत होते. त्याचे प्रत्यंतर १९०८–९ सालात गणेशोत्सवामध्ये गाइल्या गेलेल्या मेळ्यांच्या पदांमधून जिज्ञासूंना पाहावयास सापडेल. रा. साने यांनी आपल्या तर्काची धाव भलत्याच थरापर्यंत जाऊ दिली नाही; पण गोखल्यांना सहानुभूती नव्हती, हा त्यांचा तर्कसुद्धा वस्तु-स्थितीच्या अज्ञानाचा द्योतक आहे. वाटेल त्या सभेत जाऊन भाषणे करावयाची नाहीत, असा एक गोखल्यांचा नियम होता. शिवाय ज्या विषयासंबंधी आपण अगाऊ विचार केला नाही, त्या विषयावर केवळ लोकाग्रहास्तव ते भाषण करीत नसत. या दोन्ही नियमांबद्दल त्यांची नालस्ती झाल्याची उदाहरणे आहेत. विलायतच्या सभेतली गैरहजेरी हे एक अशापैकीच उदाहरण आहे. रा. साने यांनी या बाबतीत जास्त माहिती मिळविली असती तर त्यांनी जो निष्कर्ष सुचविला आहे तो खचित सुचविला नसता. गोखल्यांना टिळकांच्या संबंधात सरकारने चालविलेला अन्याय पाहून प्रत्येक वेळी खेद होत असे व अन्याय दूर होण्यासाठी त्यांनी यथाशक्ती प्रयत्न केल्याची प्रमाणे आहेत. असल्या

प्रयत्नांचे ज्ञान करून घेतल्याखेरीज टिळक आणि गोखले यांची तुलना निःपक्षपातपूर्वक होणे शक्य नाही.

वरच्याप्रमाणे काही ठळक दोष या पुस्तकात असले तरी एकंदर पुस्तकाचा विचार केल्यास त्याबद्दल कोणालाही रा. साने यांची प्रशंसाच करावीशी वाटेल. गोखल्यासंबंधी ज्या गैरसमजुती लोकांत पसरलेल्या आहेत, त्यांपैकी पुष्कळांची बाधा रा. साने यांनी आपल्या विवेचनास होऊ दिलेली नाही. गोखल्यांकरिता १८९७ साली टिळक पुरावा जमवीत होते, असा एक समज आहे. या समजुतीला रा. साने यांनी आपल्या ऊहापोहात मुळीच थारा दिलेला नाही. गोखल्यांनी माफी मागितली, याबद्दल पुष्कळांनी विकारवश होऊन अकांडतांडव केल्याचे दाखले आहेत; परंतु रा. साने यांनी गोखल्यांच्या माफीचा यथार्थ गौरव केला आहे. तुरुंगात जाण्याला धैर्य लागते; माफी मागणे म्हणजे निस्सीम धैर्याभावाचे लक्षण, असल्या समजुतींचे वर्चस्व कमी होऊन गोखल्यांच्या माफीविषयी तरुण सुशिक्षितांची दृष्टी निवळत चालली, हे रा. साने यांच्या विवेचनसरणीवरून ध्यानात येण्यास हरकत नाही. गोखल्यांच्या चरित्राचा जसजसा अधिकाधिक सांगोपांग अभ्यास होत जाईल, तसतसा त्यांच्या संबंधातला गैरसमज निरसन पावेल, याचे एक उदाहरण म्हणजे रा. साने यांचे प्रस्तुत चरित्र होय. भाषेच्या दृष्टीने पाहिल्यासही त्यांचा हा प्रयत्न उत्कृष्ट वठला आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. गोखले–टिळकांची तुलना नाही अशा भागात त्यांनी केलेली गोखल्यांच्या कामगिरीची वर्णने वाचकांना निस्संशय रमणीय वाटतील. मराठी वाङ्मयातील एक उणीव त्यांनी यथासाधन व यथारुची भरून काढली याबद्दल त्यांचे व प्रकाशकांचे पुनः एकवार अभिनंदन करून विहंगावलोकनाची रजा घेतो.

**न. र. फाटक**

# अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| प्रकाशकाचे चार शब्द | ... | पांच |
| प्रस्तावना ... | ... | नऊ |
| विहंगावलोकन ... | ... | चोवीस |
| उपोद्घात ... | ... | १ |
| कुलवृत्तान्त | ... | ५ |
| जन्म, बालपण आणि शिक्षण | ... | ८ |
| अध्यापन-काल ... | ... | २० |
| राजकीय शिक्षणाचा काल | ... | ३३ |
| राजकीय आयुष्यक्रम | ... | ३९ |
| इंग्लंडची पहिली सफर | ... | ५९ |
| माफी-प्रकरण ... | ... | ६९ |
| कौन्सिलातील कामगिरी | ... | ७४ |
| वरिष्ठ कायदे कौन्सिलात प्रवेश | ... | ८६ |
| बंगालची फाळणी व गोखल्यांची शिष्टाई | | १०६ |
| गोखल्यांचा देशभर व्याख्यानांचा दौरा | | १३४ |
| कौन्सिलातील कामगिरी | ... | १४१ |
| भारत-सेवक समाज | ... | १४८ |
| सुरत काँग्रेसनंतर ... | ... | १७३ |
| गोखल्यांची आफ्रिकेतील कामगिरी | | १८९ |
| अखेर ... | ... | २१० |
| स्वभाव व गुणदोषमीमांसा | ... | २१६ |
| धार्मिक व सामाजिक मते | ... | २५७ |
| गोखल्यांची कुंडली | ... | २७६ |
| Appendix I | ... | २७७ |
| सूची ... | ... | २९१ |

# उपोद्घात

" Hope, faith and charity-these are the three graces. We must all cultivate, and if we keep them ever in mind and hold steadily by them we may be sure that we may still regain our lost position and become a potent factor in the world's history. "

M. G. RANADE
*1894, Madras*

कोणतीही परिस्थिती फार वेळ टिकत नसते. काळ हा बहुरूपी आहे. तो क्षणात उग्र रूप धारण करितो तर क्षणात फुलाप्रमाणे हसतो. काही राष्ट्रे अवनतीच्या खोल दरीत लोटून देतो तर दुसरी राष्ट्रे उन्नतीच्या उत्तुंग शिखरांवर चढवितो. त्याचा हा नेहमीचा खेळ आहे. त्याची ही लीला अगम्य व अगाध आहे. त्याची स्वतःची एकरूपता असली तरी त्यास इतरांची पाहवत नाही. कोणतीही वस्तू एकाच स्थितीत ठेवणे हे त्याच्या जिवावर येते. लोकांस रडविणे वा खुलविणे, दोन्ही कामात त्यास सारखाच आनंद वाटतो; दोन्ही कृत्यांत तो रमतो. परंतु काळ हा स्वतः निर्विकार असला, त्याला सुखदुःख वाटत नसले तरी राष्ट्रांची स्थिती

तशी नाही. राष्ट्रे सुखदुःखातीत नसून तदधीनच असतात. जे राष्ट्र पदतली तुडविले जाते ते दुःखाचे सुस्कारे सोडीत असते. आपली खाली झालेली मान पुनः वर कधी येईल, सध्या ज्या हालअपेष्टा आपण निमूटपणे भोगीत आहो, जे अपमान गिळून बसत आहो, त्या सर्वांचे परिमार्जन होऊन आपली नैसर्गिक योग्यता कशी प्राप्त होईल या विचारात जित राष्ट्र गुंग होऊन जाते. परंतु जेत्या राष्ट्राची गोष्ट निराळी असते. जित राष्ट्राला निर्जीव कसे करता येईल, त्याची धुगधुगी साफ मारता कशी येईल, त्याची वरखाली होणारी नांगी कशी मोडता येईल, त्याचे विषारी दात पाडून निर्विष सर्पाप्रमाणे गतमद होत्साते आपल्या कह्यात ते अखंड कसे राहील या प्रश्नाकडे जेत्या राष्ट्राचे मुत्सद्दी लक्ष घालून असतात. काळ हा कलिपुरुष आहे. अशा जित-जेत्यांच्या लढाया लावण्यात त्यास मौज वाटते; या कामात तो तरबेज असतो. या लढायांत ज्याची धमक अधिक, धैर्य अप्रतिहत, स्वार्थत्याग दांडगा व इच्छा दुर्दमनीय, प्रयत्न अखंड व न मरणारी आशा, त्यासच विजयश्री माळ घालते.

हे जित-जेत्यांचे सामने फार उद्बोधक असतात. प्रत्येक देशाचा इतिहास मुक्तरवाने हेच सांगतो की, ' बाबारे, मी असाच तुडविला जात होतो, परंतु धीराने आणि शौर्याने धीर खचू न देता आम्ही स्वातंत्र्याची पुनरपि प्राप्ती करून घेतली आहे. ' अमेरिका, इटली, नेदर्लंड या सर्व राष्ट्रांचा इतिहास हीच गोष्ट शिकवितो. कित्येक राष्ट्रांनी झगडून, रक्त शिंपडून, पवित्र स्वातंत्र्य, ईश्वरदत्त हक्क पैदा केले खरे, परंतु आपली पूर्वीची स्थिती पार विसरून दुसऱ्या गरीब राष्ट्रांवर जेव्हा ही राष्ट्रे गुरगुरू लागतात तेव्हा मन खिन्न होते व आशा मरून जाते. ज्या जपानने आपली सर्वांगीण उन्नती करून घेतली तेच जपान आज कोरियात धांगडधिंगा घालीत आहे. त्यास जर अमेरिकेने मज्जाव केला तर त्यास वाईट वाटण्याचे काय कारण ? मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाही. आपणावर बेतल्याखेरीज दुसऱ्याची वेदना समजत नाही. आपला पाय विस्तवावर पडून भाजला म्हणजे ज्यास मी विस्तवावरून ओढीत आणीत होतो त्याचीही माझ्यासारखी दशा झाली असेल असे लक्षात येते. परंतु ही जाणीव सुज्ञ असेल त्यास होईल. ज्या अमेरिकेने इंग्लंडबरोबर युद्ध

पुकारून अभंग चिकाटीने स्वातंत्र्य मिळविले, ज्याचे वॉशिंग्टन सारख्यांनी संगोपन केले, लिंकन सारख्यांनी वर्धन केले तीच अमेरिका नीग्रोंवर जुल्म करिते आणि परकी देशांस मज्जाव करिते. ज्या इंग्लडने स्वातंत्र्यासाठी विष्णुस्वरूप राजाची आहुती दिली तेच इंग्लंड दुसऱ्या राष्ट्रावर सत्ता गाजवून दडपशाही व दंडेली चालविते याची उपपत्ती काय? उपपत्ती हीच की, मनुष्यमात्र स्वार्थी आहे. थोडेफार महात्मे सोडून दिले तर प्रत्येकजण दुसऱ्यास लुबाडू पाहणार. हीच वृत्ती जगाच्या इतिहासात आपणास दिसते. लुबाडणारा सवाई चोराकडून जेव्हा स्वतः लुबाडला जाऊ लागतो तेव्हा मग त्यास ब्रह्मज्ञानाची उकळी फुटते. तो मोठमोठी गहन तत्त्वे सांगू लागतो. लुटला जाणारा लुटारूस विरोध करू लागतो, परंतु नागवला जाणारा जेव्हा असहाय्य व निःशस्त्र असतो तेव्हा खरी कसोटी असते. या असमान सामन्यात लुटले जाणाऱ्यांचे जे पुढारी असतात त्यांच्या परीक्षेची वेळ असते. त्यांना निराळेच मार्ग आखावे लागतात. शस्त्रास्त्रे बाजूस ठेवून आपली सर्वांगीण उन्नती करून लुटारूस सांगावयाचे : 'मी तुझ्या बरोबरीचा आहे; माझे हक्क मला मिळाले पाहिजेत.' ज्यांची आज हिंदुस्थानावर सत्ता आहे त्यांची विद्या, त्यांचे उद्योग हे आपण आपलेसे केले पाहिजेत. ज्यांस सर्व साधने अनुकूल त्यांच्याबरोबर आपणांस झगडावयाचे आहे. आपल्यांतील शक्य त्या उणिवा आपण नाहीशा करण्याच्या प्रयत्नास लागणे हे प्रथम कर्तव्य आहे. आपणांस कष्टप्रद स्थिती आली आहे तिचे नुसते वाईट वाटून काय बरे फायदा? आपण फार श्रीमंत होतो; आज दुबळे झालो आहो. सुख भोगून मग दारिद्र्य येणे फार वाईट. आमचा देश वैभवाच्या शिखरावर होता तो आज खोल दरीत आहे. ज्या आमच्या देशात सतत सुबत्ता असावयाची, त्या आमच्या सुंदर देशास आज अर्धपोटी राहावे लागते अशी हलाखीची स्थिती आली आहे खरी. परंतु अंतरी तळमळून फायदा नाही. डोळ्यांत अश्रू आणून आणि ढोपरात मान घालून आलेली स्थिती थोडीच पालटणार आहे? रडावयास वेळ नाही. डोळ्यांतील अश्रू डोळ्यांतच आटू द्या. परिस्थितीचा विचार करून तिला बदलण्यासाठी, जेथे स्मशान आहे तेथे नंदनवन निर्माण

करू या आत्मप्रत्ययाने, कामास लागा. देशाची सध्याची स्थिती ही सत्त्वपरीक्षा आहे. या सत्त्वपरीक्षेत सोज्ज्वलपणे आपण उत्तीर्ण झाले पाहिजे. शिवाळशैब्यांचे आपण वंशज, ज्ञानेश्वर–नामदेवांचे वारसदार आहो. आपण डगमगून चालणार नाही, आणि उतावीळपणाने अहितकारक गोष्ट करता कामा नये. वाइटातून चांगले बाहेर पडते. आपली परकीयांशी गाठ पडली यात परमेश्वरी सूत्र आहे; काही तरी हेतू आहे. नवीन प्रकाश आपणास मिळावा, नवीन दृष्टी आपणास यावी म्हणून ही ईश्वरी घटना आहे. तो प्रकाश आपलासा करू या. धीर सोडता कामा नये. धीर कोण सोडतो? ज्याला काही करावयाचे नसते तो. आपण सर्व बाजूंनी उचल केली पाहिजे. सर्व बाजूंनी खुंट्या मारीत जाऊन जागा व्यापून टाकिली पाहिजे. हा धडा ज्याने राष्ट्रास शिकविला, निराश झालेल्यास आशेचा घोट पाजला-किरण दाखविला, विगलित व हत-बल झालेल्यांस हात देऊन उठण्यास लाविले, मृतांस चैतन्य दिले, सचेतनास स्फूर्ती दिली, स्फूर्तियुक्तांस कृती करावयास लाविले, त्या न्या. रानड्यांचे देशावर किती उपकार आहेत ते सांगतां येत नाही. त्यांचेच उदाहरण हरहमेश डोळ्यांसमोर ठेवून, त्यांची शिकवणूक हृदयात ठसवून, मुरवून, ज्यांनी आपला सर्व जन्म मायभूमीच्या उद्धारासाठी खर्च केला, सुखाची कास धरिली नाही, दुःखाची पर्वा केली नाही, जे स्तुतीने मोहित झाले नाहीत, ज्यांनी निंदेमुळे प्रारब्ध-कार्य सोडून दिले नाही, दुसऱ्याच्या अंत-रास धक्का न लावता, परंतु स्वकर्तव्य न सोडता ज्यांनी जनता–जनार्दनाची आमरण सेवा केली त्या चिरंजीव भारतसेवक गोपाळराव गोखल्यांची आयुष्य–कथा पुढील लेखात निरूपण करावयाची आहे. या कथेला सर्वांच्या लिखाणाचा आधार घेतला आहे, मनोरंजन अंक, अभ्यंकर–चरित्र, फर्ग्युसन कॉलेज त्रैमासिक, वाच्छांनी लिहिलेल्या आठवणी, केसरी-तील लेख, गोखल्यांचे लेख व व्याख्याने या सर्वांचा आधार घेतला आहे. याशिवाय श्री. मोदी यांनी लिहिलेल्या सर फेरोजशहा मेथा यांच्या चरित्रातील माहिती, मॉडर्न रिव्ह्यू, इंडियन रिव्ह्यू, यांचाही ठिकठिकाणी उपयोग केला आहे. त्या सर्वांचा प्रस्तुत लेखक ऋणी आहे.

---

नामदार

# गोपाळ कृष्ण गोखले यांचे चरित्र

## कुलवृत्तांत

रत्नागिरी जिल्ह्यात चिपळूण तालुका आहे. तालुका चिपळूण, पेटा गुहागर या भागात वेळणेश्वर नावाचे एक लहानसे खेडे आहे. सर्व गोखले मंडळींचे हेच मूळ ठिकाण होय. येथूनच सर्व महाराष्ट्रभर गोखले मंडळी पसरली. गोखले मंडळी महाराष्ट्राच्या इतिहासात प्रसिद्ध आहे, 'रास्ते' घराणे मूळचे गोखले घराण्यापैकीच, त्यांच्या रास्त वर्तणुकीमुळे शाहू महाराज त्यांस 'रास्ते' म्हणू लागले. पेशवाईच्या पडत्या काळात अतुल पराक्रमाने तिचे रक्षण करणाऱ्या बापू गोखल्यांचे नाव कोणास माहीत नाही ? या गोखले मंडळींची एक शाखा चिपळुणापासून दहा मैलांवर ताम्हनमळा म्हणून गाव आहे तेथे बाळाजी महादेव गोखले यानी प्रथम आणिली. पूर्वी कोकणात पुष्कळ उद्योगी लोक स्वकष्टाने पडीत जमिनी मशागतीस आणीत. दगडधोंडा बाजूस काढून, जंगल वगैरे तोडून तेथे गाव वसवीत. मग त्यास तेथील गावचे खोती वगैरेचे अधिकार मिळत. हे अधिकार ते मग प्राण गेला तरी सोडीत नसत. मानहानी ही कोकणातील माणसास कधीच सहन होत नसते. गोपाळरावांचे निपणजे बाळाजी महादेव यांनी आपला मूळचा गाव सोडून हा नवीन गाव वसविला आणि आपला नवीन संसार थाटला. त्यांचा मुलगा भास्कर आणि भास्कररावांचे

चिरंजीव श्रीधरपंत. श्रीधरपंत हे गोपाळरावांचे आजोबा होत. यांस प्रथम-कुटुंबापासून अंताजीपंत आणि कृष्णराव हे दोन मुलगे झाले. कृष्णराव दोनचार महिन्यांचेच असतांना त्यांची मातुश्री निवर्तली आणि श्रीधरपंतांनी द्वितीय विवाह केला. या द्वितीय विवाहापासून त्यांस दोन मुलगे झाले. त्यांची नावे अनुक्रमे जयरामपंत व माधवराव, अंताजीपंत आणि कृष्णराव हे लहानपणीच पोरके झाले होते. आईवेगळ्या लहान मुलांची किती आबाळ होते हे सर्वांस माहीतच आहे. हे दोघे भाऊ अगदी एकचित्ताने राहत. अंताजीपंतांचे कृष्णरावांवर फार प्रेम असे. गोपाळरावास त्यांच्याबद्दल अत्यंत पूज्यभाव वाटत असे.

कृष्णरावांचा स्वभाव जात्या फार हूड होता. त्यांस गावात वाघोबा असे म्हणत असत. त्यांचा विवाह त्या काळास अनुसरून लहानपणीच झाला होता. चिपळुणापासून जवळच असलेल्या कोतळूक गावचे खोत भास्करपंत ओक यांची मुलगी वाळूबाई हिच्याबरोबर त्यांचा विवाह झाला. वाळू-बाईचे नाव सत्यभामाबाई असे सासरी ठेवण्यात आले होते.

कृष्णराव हे शिकण्यासाठी कोल्हापूरला गेले. कोल्हापुराला त्यांचे चुलते मामलतीच्या अधिकारावर होते. कृष्णराव कोल्हापुरास ज्या शाळेत शिकत होते त्याच शाळेत माधवराव रानडे हेही शिकत होते. कृष्णराव व माधवराव हे एकाच वर्गात होते. हे माधवराव पुढे न्याय-मूर्ती होऊन अखिल हिंदुस्थानच्या सर्वांगीण उन्नतीचा मार्ग दाखवितील आणि ते आपल्या मुलाचे आध्यात्मिक आणि राजकीय गुरू होतील हे या वेळेस कृष्णरावांस कोणी सांगितले असते तर त्यांस काय वाटले असते? माधवरावांसही 'कृष्णरावांच्या मुलास तुम्ही राजकीय पुढारी होण्यास सर्वतोपरी पात्र कराल' असे जर कोणी सांगितले असते तर ते हसले असते. काहीही असले तरी हा योगायोग पाहून मनास आश्चर्य वाटते खरे. कृष्णराव हे फारसे अभ्यासू नव्हते. घरची सांपत्तिक स्थितीही हलाखीची, यामुळे लवकरच त्यांस शाळेस रामराम ठोकावा लागला. व चुलत्याच्या वशिल्याने त्यांस कागल संस्थानात कारकुनीची जागा मिळाली.

कारकुनाची जागा मिळाल्यावर कृष्णराव सहकुटुंब कागलासच राहू लागले. त्यांची पत्नी फार सुशील व देवभोळी होती. असेल त्यात

सुखाने संसार करून देवांब्राह्मणांस संतुष्ट करण्यात तिचे सदैव लक्ष असे. सर्वांशी मिळते घेऊन वागण्याच्या तिच्या स्वभावामुळे घरात सदैव शांततेचे साम्राज्य असे. तिची पतिभक्ती इतकी सोज्ज्वळ होती की, ती पाहून कौतुक वाटते व आदर दुणावतो. पतिनिधनानंतर दुःखाकुल अशा या साध्वीने आपल्या पतीचे नेसावयाचे एक धोतर मरेपर्यंत आपणाजवळ ठेविले होते. कृष्णरावांस या पत्नीच्या सहवासाने सुख झाले. त्यांचीही नौकरी अत्यंत नेकीची. त्यांचा बाणेदारपणा पाहून त्यांच्या वरचे अधिकारी त्यांचे कौतुकच करीत. त्यांच्या गुणांमुळे त्यांची बढती झाली व ते फौजदार झाले. त्यांचा बहुतेक काळ कागल येथे संसार करण्यात गेला.

# जन्म, बालपण आणि शिक्षण

**शुद्ध बीजा पोटी । फळे रसाळ गोमटी ।**

— तुकाराम.

रत्नागिरी जिल्हा हा अन्वर्थक आहे. खरोखरच त्याने अनेक रत्ने गेल्या शतकांत आपणास दिली. न्या. रानडे, लो. टिळक, भारत–सेवक गोखले, गणित–विशारद प्रि. परांजपे, कर्मवीर कर्वे यांच्या सारखे सर्व महाराष्ट्रास किंबहुना हिंदुस्थानास ललामभूत झालेले थोर पुरुष आपणांस रत्नागिरीनेच दिले. गोपाळ कृष्ण गोखले यांचा जन्म ९ मे १८६६ रोजी कोतळूक मुक्कामी झाला. सत्यभामाबाई या वेळेस माहेरी बाळंतपणासाठी गेल्या होत्या. माहेरी दोन–तीन महिने झाल्यावर बाळबाळंतीण ताम्हन-मळ्यास आली. तेथे दोन तीन महिने सत्यभामाबाई होत्या. कोकणांतील निसर्गाच्या मांडीवर गोपाळ खेळत होता–लोळत होता. कोकणच्या हवेचा शुद्धपणा त्याच्या रोमरोमात भरत होता. कोकणातील डोंगरांची भव्यता त्याच्या अजाण हृदयावर परिणाम करीत होती. आई आपल्या तान्ह्या बाळासह लवकरच कागलास आपल्या पतीकडे आली.

गोपाळचा वडील भाऊ गोविंद. तो शाळेत जात असे. गोपाळही मोठा झाल्यावर शाळेत जाऊ लागला. त्याच्या बुद्धिमत्तेच्या गोष्टी ऐकिवात नाहीत. परंतु त्याच्या मनाची प्रामाणिकता तेव्हाही होती. एके दिवशी गुरुजींनी घराहून गणित करून आणण्यास सांगितले होते. वर्गात फक्त गोपाळाचे गणित बरोबर ! गुरुजींनी त्यास शाबासकी

दिली. परंतु काय? गोपाळ ओक्साबोक्शी रडू लागला. आनंद व सुख होण्याऐवजी गोपाळाचे डोळे पाण्याने भरले? गुरुजी बुचकळ्यात पडले आणि मुले चकित झाली. 'गोपाळ तू का रडतोस?' गुरुजींनी विचारले. 'माझे गणित बरोबर असले तरी ते मी स्वतः सोडविले नाही. मी ते दुसऱ्यांच्या मदतीने केले. मला पहिला नंबर नको.' गोपाळाच्या मनाला सत्य प्यार वाटे. रानडे हेही याप्रमाणेच सत्यप्रिय होते. मनाचा हाच सूक्ष्म तराजू गोपाळजवळ मरेपर्यंत होता. पुढे पुढे तर तो जास्तच सूक्ष्म झाला. दुसरी एक गोष्ट आहे ती खेळतांना झाली. आट्यापाट्यांचा खेळ रंगात आला होता. गोविंद व गोपाळ विरुद्ध होते. गोविंद गोपाळास म्हणतो, 'गोपाळ, मला सोडून दे. मला धरू नको.' 'छे भाऊ, असे कसे म्हणतोस? मी पाहिजे तर खेळ सोडून जातो. परंतु खोटे करून माझ्या बाजूच्या गड्यांचे मी नुकसान करणार नाही.' लहानपणीचा खरे बोलणारा गोपाळ मरेपर्यंत तसाच होता. 'जे गुण बाळा, ते जन्म काळा' म्हणतात ते यथार्थ आहे. या प्रकारे कागलास मनाची व शरीराची प्राथमिक तयारी—पहिला विकास चालू होता.

गोपाळ दहा वर्षांचा होईपर्यंत कागलासच होता. त्याचे मराठी शिक्षण येथेच झाले. मराठी शिक्षणानंतर त्यास वडील भावासह कोल्हापुरास इंग्रजी शिकण्यासाठी पाठविण्यात आले. 'गोविंद गोपाळ हे दोघे बंधु' एकमेकांवर फार प्रेम करीत. त्यांचा इंग्रजीचा अभ्यास जोराने चालला होता. या वेळेस लोकहितवादी किंवा रानडे यांच्या वेळी असणारा इंग्रजी-विरुद्ध कटाक्ष नव्हता. आता जगात पुढे येण्यास इंग्रजीची फार जरूर होती. मुसलमानी अमदानीत ब्राह्मण जसे फारसी पंडित होऊन मोठमोठ्या सन्मान्य नोकऱ्या पटकावीत त्याप्रमाणे मोठ्या पगाराची जागा मिळण्यासाठी आता इंग्रजीशिवाय गत्यंतर नव्हते. गोविंद गोपाळ सुट्टीत वगैरे घरी जात असत.

याप्रमाणे दोघां भावांचे शिक्षण चालले असता अकस्मात् संकट ओढवले. कोणालाही न चुकणारा, कधी तरी येणारा मृत्यूचा हल्ला गोपाळरावांच्या वडिलांवर आला. मुले अद्यापि शिकत होती. घरात मिळ-

विते कोणी नाही अशा वेळी कुटुंबवत्सल माणसाची एकाएकी मृत्यूने उचलबांगडी करावी हे कठोर वाटते. कर्ता माणूस मृत्युमुखी पडला असता घरातील इतर मंडळीची जी दुःखप्रद व अनुकंपनीय स्थिती होते तीच या भावांची झाली. गोपाळाची आई अंताजीपंतांकडे गेली आणि गोपाळाच्या वडील भावास नौकरी शोधावी लागली. शिक्षणाची कायमची रजा गोविंदास घेणे भाग पडले. परिस्थितीला तोंड देणे जरूर होते आणि ते धैर्याने व निःस्वार्थ बुद्धीने गोविंदाने दिलेही. चुलत्याकडे आई गेली होती, परंतु ती पुनः लवकरच परत आली. कागल संस्थानचे अधिकारी रावसाहेब विष्णु परशुराम वैद्य यांच्या मध्यस्थीने गोविंदास कारकुनीची जागा मिळाली. या वेळेस गोविंदाचे वय आठरा वर्षांचे होते आणि गोपाळ तेरा वर्षांचा होता. सेवाधर्माचा भुंगा गोविंदास लावून घेणे भाग पडले. परंतु कुटुंबाच्या पोषणासाठी व आपल्या भावाच्या शिक्षणासाठी त्यास तसे करणे प्राप्त होते. आपले शिक्षण पुरे झाले नाही तरी आपल्या भावाचे शिक्षण पुरे व्हावे ही सदिच्छा त्यांच्या अंतरंगी वसत होती. या रोपट्यास आज पाणी घातले तर त्याचा वृक्ष होऊन त्याच्या शीतल छायेत आपणास बसावयास मिळेल आणि आपले पांग गोपाळ फेडील या भावी आशेने आज गोपाळासाठी ते झीज सोशीत होते. परंतु हे कार्य करण्यांत गोविंदराव हे अनपेक्षित रीतीने देशावर महदुपकार करीत होते. हा वृक्ष त्यांनाच सुखविणार नव्हता तर नोकरशाहीने संतापविलेल्या आपल्या देशबांधवांसही शांतविणार होता. असो.

गोपाळाच्या शिक्षणासाठी ते दरमहा १० रुपये पाठवीत असत. कारकुनाचा पगार तो केवढा असणार आणि त्यात संस्थान ! परंतु गोविंदरावांनी आपल्या भावाची आबाळ होऊ दिली नाही. स्वतःच्या पोटास त्यांनी वेळ—वखत चिमटा घेतला. परंतु गोपाळाचे अडू दिले नाही. गोपाळानेही आपल्या भावाच्या पैशाचे चीज केले. उधळपट्टी ही त्याला माहीतच नव्हती. हल्ली आपण याच्या विपरीत देखावे किती तरी पाहतो. मुलाच्या भावी वैभवाच्या मनोराज्यात दंग होऊन बाप मुलाला पैसे पाठवीत असतो. स्वतः ढोंपरपंचा नेसून हाडाची काडे करून मुलाच्या गरजा भागवितो. परंतु बापाकडे बेट्याचे लक्ष असते काय ? ऐट

करावी, कपड्याच्या झोकात असावे, सुंदरशी यष्टि हस्त–करकमलात धारण करावी, आणि सिनेमा, नाटकगृहे यांस आपल्या पदधुलीने पावन करावे हा याचा स्तुत्य कार्यक्रम असतो ! कोटबुटांत पैसा उडतो आणि बापास व बेस्यास अंती कपाळास हात लावावा लागतो ! गोपाळाची वागणूक चोख. सत्याचा अपलाप मरण आले तरी गोपाळ करावयाचा नाही. या गुणाचा गोपाळास भावी आयुष्यात उपयोग झाला. या बोटावरची थुंकी त्या बोटावर करून वेळ मारून नेता आली असती असे प्रसंग पुढील जीवनक्रमांत त्याच्यावर आले. परंतु त्याने सत्यालाच श्रेष्ठ मानले. सत्याचेच सिंहासन बसावयास पसंत केले. आपला भाऊ आपणास किती दगदगीने मिळवून पैसा पाठवितो याची जाणीव त्याच्या कर्तव्योन्मुख मनात सदैव जागृत असे. तो भावास दरमहा हिशोब पाठवीत असे.

परंतु गरीबीने दिवस काढीत असतानाही त्याने स्वाभिमान सोडला नाही. कोणाजवळ याचना केली नाही. कोणाची खुशामत केली नाही. स्वाभिमान त्याने कसा राखिला याची एक गोष्ट येथे देतो. गोपाळ खानावळीत जात असे. एकदा त्याने सहज वाढप्याजवळ दही मागितले. तो म्हणाला, ‘ महिना आठ आणे जास्त द्यावे लागतील. उगीच नाही फुकट दही मिळत ! ’ ‘ मला रोज दही वाढीत जा ’ असे गोपाळाने सांगितले. अर्थात् आठ आणे जास्त द्यावे लागणार ते कोठून आणावयाचे ? ठरीव पैशात तर उरकले पाहिजे. स्वाभिमान आणि आपली मिळकत यांची संगती राहील अशी त्याने युक्ती काढिली. खानावळीत खाडे पडावे म्हणून दर शनिवारी तो उपवास करू लागला. अशा प्रकारे आपला मान त्याने राखून घेतला. गैरवाजवी खर्च चुकीमुळे जरी झाला तरी तो आपल्या भावास लिहावयास त्यास भीती वाटे. आपण अनाठायी खर्च करतो हे पाहून आपला भाऊ काय बरे म्हणेल ? तो तिकडे मोठ्या मिनतवारीने दिवस काढीत असता आपण असा खर्च कसा केला असे त्यास वाटे. अर्थातच तो अपव्यय कधी करीतच नसे. परंतु एकदा एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. त्याच्या एका स्नेह्याने त्यास तो नको नको म्हणत असता नाटकास नेले. होता होईतो कोणाचे मन मोडावयाचे नाही हा गोपाळाचा स्वभाव. तो नाटकास गेला. त्याचे तिकीट त्याच्या मित्रानेच काढले.

नाटक संपले; सर्व काही झाले. पुढे काही दिवसांनी हा स्नेही गोपाळाकडे येऊन तिकिटाचे पैसे मागू लागला. गोपाळ चकित झाला. त्यास ही कल्पनाही नव्हती. आपण नको म्हणत असता आपला स्नेही आपणास नाटकास नेत आहे त्या अर्थी तोच पैसे खर्च करील असे त्यास वाटले होते. परंतु तोच मित्र प्रत्यक्ष जेव्हा पैसे मागू लागला तेव्हा स्वाभिमानी गोपाळाच्याने नाही कसे म्हणवणार ? त्याने आठ आणे काढून दिले आणि पुनश्च असल्या फंदात पडावयाचे नाही असा कानास खडा लावून घेतला. परंतु हे आठ आणे भरून कसे काढावयाचे ? एक सुंदर युक्ती त्याच्या कल्पक डोक्यास सुचली. रात्रीचा दिवा बंद करावयाचा व महिन्यास आठ आणे बत्तीचा खर्च होई तो म्युनिसिपल दिव्यावर अभ्यास करून वाचवावयाचा. म्हणजे जास्त आठ आणे खर्ची पडणार नाहीत असे त्याने ठरविले. गरीबीमुळे असे दिवस काढावे लागतात. रा. ब. सीताराम विश्वनाथ पटवर्धनांची अशीच गोष्ट सांगतात की, त्यांनी म्युनिसिपालिटीच्या दिव्याजवळ अभ्यास केला. हा म्यु. दिव्याजवळ अभ्यास करणारा विद्यार्थी पुढे देशास उजेड दाखवील असे त्या वेळेस कोणास वाटले असेल काय ? विशाल काळाच्या उदरातील घडामोड कोणास समजणार ? अभ्यासात तर गोपाळाची कधीच कुरकुर नसे. गोपाळाची आई जरी शिकलेली नव्हती तरी तिची स्मरणशक्ती फार तीव्र असे. हा स्मरणशक्तिगुण गोपाळाच्या अंगात पूर्णपणे उतरला होता. त्यामुळे त्याच्या लक्षात फार राहत असे. मॅट्रिकच्या परीक्षेची वेळ आली आणि गोपाळ परीक्षेस मोठ्या उत्साहाने बसला. परीक्षा झाल्यावर सुटी असल्यामुळे गोपाळ घरी गेला.

आनंदात दिवस चालले होते. खेळण्यात, हिंडण्यात काळ सुखाने चालला होता, आपण परीक्षेत खात्रीने पास होणार असा गोपाळास भरंवसा होता. त्याच्या एका मुंबइच्या मित्राने त्यास तार करीन असे सांगितले होते. निकालाचा दिवस उजाडला. आज गोपाळाचे मन खाली-वर होत होते. इतक्या दिवस केलेल्या श्रमाचे चीज होणार की नाही हा प्रश्न त्याच्या मनापुढे होता. ठरलेली वेळ झाली आणि तार आली नाही. गापाळ उदासीन झाला. आपला भाऊ आपणास काय म्हणेल ? आपण उनाडलो नाही आणि असे का बरे झाले ? सर्व श्रम वाया गेले. मन

खट्टू होऊन गोपाळ एकटाच लांब दूर फिरावयास गेला. परंतु लवकरच तार आल्याचे आनंददायक वर्तमान त्यास वाटेत कळले. गोपाळाचा आनंद गगनात मावेना. भावनावश माणसाला आनंदही जास्त होतो. दुःखही जास्त होते. आपल्या भावनांस ताब्यात ठेवण्यास गोपाळ पुढे न्या. रानड्यांच्या उदाहरणाने शिकला. परीक्षा पास होण्याचा आनंद पास होणारेच जाणतात. वर्षांच्या श्रमांचा मोबदला एका क्षणात मिळावयाचा असतो. केलेल्या श्रमांचे सार्थक होऊन जो आनंद—सात्त्विक आनंद भोगावयास मिळतो तो अमोल आहे. मनाला नवीन कार्य करण्यास हुरूप येतो. ' क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ' हेच खरे.

मॅट्रिकची परीक्षा झाली. त्या वेळी गोपाळ फक्त पंधरा वर्षांचा होता. त्याने आपला धरलेला मार्ग तडीस न्यावा असे ठरले आणि गोपाळ पुढील अभ्यासासाठी कोल्हापुरास राजाराम कॉलेजात दाखल झाला. कॉलेजमधील आयुःक्रम आणि शाळेतील आयुःक्रम यात जमीनअस्मानाचा फरक असतो. शाळेमध्ये गुरुजी मुलाची प्रत्यक्ष चौकशी करितात. विद्यार्थ्यांच्या प्रगतीकडे लक्ष देतात. प्रत्येकास समजले न समजले विचारून सर्व स्पष्ट करितात. शाळेमध्ये अभ्यासाव्यतिरिक्त मुलगा विशेष काही पाहत नाही आणि शिक्षकाची साधारण शिकवणूक संकुचितच असते. कॉलेजमध्ये विद्यार्थ्यांच्या अंगावर सर्व जबाबदारी पडते. प्रोफेसर वर्गात विषय विशद करून निघून जातात. तदनुरोधाने विद्यार्थ्यास विषय घरी तयार करावा लागतो. प्रोफेसरांची शिकविण्याची पद्धतिही व्यापक असते. कोणताही विषय सांगोपांग त्यांस शिकवावयाचा असतो. नाना प्रकारचे दृष्टान्त, नाना नवलकथा ते सांगतात. ते टीका करितात. चांगले व वाईट यांची फोड करितात. रोज निरनिराळ्या व्यक्ती, निरनिराळी पुस्तके कानावरून जातात. आज नेपोलियनने मनास वेडे करावे तर दुसऱ्या वेळेस बायरनने चटका लावावा. आज इंग्लंडचा इतिहास आवडावा तर परवा इटलीच्या उद्धारकांचे कौतुक करावेसे वाटावे, आपल्याही मनांत महत्त्वाकांक्षा डोकावू लागते. आज मोठे भीमासारखे शूर व्हावेसे वाटते. तर दुसऱ्या दिवशी शंकराचार्यांसारखे तत्त्वज्ञ होण्याची स्फूर्ती होते. कधी न्यूटन हृदयात घुसतो तर कधी रस्किन किंवा कार्लाइल डोळ्यांपुढून हलत नाही. हे

संक्रमणाचे दिवस असतात. मनाचा आखाडा येथे असतो. त्यात मन पुष्ट होत असते. त्याप्रमाणेच कॉलेजमधील मोकळे वातावरण, वादविवादोत्तेजक सभा, जिमखाना, लायब्ररी, वाचनालय यांची सर्व व्यवस्था मुलेच करितात. मुलांमुलांच्या दाट व जन्माच्या ओळखी येथे पडतात. गोपाळरावांचे सहाध्यायी प्रो. विजापूरकर हे होते. गोखल्यांच्या गुप्त गोष्टी पुढे विजापुरकरांजवळ उघड होत असत. हा कॉलेजचा आयुष्यक्रम गोपाळास लाभला हे त्याचे व म्हणून आम्हां सर्वांचे भाग्य होय. नाही तर परिस्थिती-मुळे मोठ्या होतकरू मंडळीसही जसे कारकुनीच्या रामरगाड्यात भरडले जावे लागते तशीच स्थिती याही मोहऱ्याची झाली असती.

गोपाळ हा काही अलौकिक बुद्धीचा मनुष्य नव्हता, किंवा अगदी 'ढ' ही नव्हता. या जगाच्या रंगणांत असेच पुरुष जास्त दिसतात. ज्यांच्या जवळ लोकोत्तर बुद्धिमत्ता असते ते घमेंडीत जातात आणि प्रयत्न करीतनासे होतात. उत्तम तलवार जवळ असून तिचा उपयोग न केल्यामुळे ती गंजून जाऊन निरुपयोगी मात्र होते. जे 'ढ' असतात ते म्हणतात आम्ही प्रयत्न केला तरी विफळच होणार. मग कशास करा? परंतु जे मध्यम स्थितीतले असतात त्यांस आतून भरंवसा वाटतो की, जर आपण हातपाय हलवले, आपण यत्नांची सीमा केली, तर यशःशिखर आपणांस गाठता येईल. टिळकांनी न्यू पूना कॉलेजमध्ये १९१९ मध्ये हेच उद्गार काढले होते. मध्यम स्थितीतील माणूस यत्नवादी असतो. ठोठावले तर उघडेल ही धमक त्याला असते. तो हुरळून जात नाही किंवा होरपळून जात नाही. तर वस्तुस्थितीचे पर्यालोचन करून 'यत्नदेवो भव' हे सूत्र पुढे ठेवितो; गोपाळ या मध्यम वर्गातील होता; आपला पाठ नीट तयार करण्यास जे कधी कसूर करीत नाहीत, त्यांसच परीक्षेत यश येते. गोपाळाचा अभ्यास तयार असे. त्याची पाठशक्ती दांडगी होती, आणि य पाठशक्तीचे अजब चमत्कार तो करून दाखवीत असे. त्यास अभ्यासास नेमलेले इंग्लिश काव्य तोंडपाठ येत असे. त्याचे सहाध्यायी त्यास 'पाठ्या,' 'घोट्या' असे म्हणून चिडवावयाचे; परंतु गोपाळास यामुळे संताप न येता उलट 'इतरांस जे करिता येत नाही ते आपण करितो' असे वाटून त्यास समाधान वाटे. आपण इतरांच्याहून कमी आहो हा

विचार त्यास खपत नसे. खेळातही आपणास सर्व खेळ, क्रिकेट, पत्ते, बुद्धिबळे, सोंगट्या, गंजिफा, बिलियर्ड, सर्व काही आले पाहिजे असे त्यास वाटावयाचे आणि नुसते मनात वाटूनच तो थांबत नसे तर तदनुरूप प्रयत्नही करावयास लागावयाचा. हा त्याचा गुण अगदी मरेपर्यंत होता. बोटीवर खेळाची सवय करीत असता त्यास एकाने विचारले : ' येवढे त्या खेळात लक्ष देण्यासारखे काय आहे ? ' गोपाळ म्हणाला, " खेळांमध्ये सुद्धा आम्ही युरोपियनांची बरोबरी करू शकतो हे आम्ही दाखविले पाहिजे. आमचा देश कशातही मागे नाही, हे जगास दाखविले पाहिजे. जो उत्तम क्रिकेट खेळून देशाची कीर्ती वाढवितो तोही देशभक्तच आहे. " जी पुढे देशाविषयीची भावना होती ती प्रथम पिंडात्मक होती, स्वतः-भोवती होती. आपणामध्येही काही तरी पाणी आहे, करामत आहे, अगदीच काही नादान, टाकाऊ आपण नाही हे दाखवावेसे त्यास वाटे. यामुळे मुलांच्या थट्टेकडे त्याचे लक्षही नसे. मुले ' घोक्या ' म्हणाली तर जास्तच पेटून गोपाळ आणखी जोराजोराने पाठ करून यावयाचा. अशा रीतीने कॉलेजातील क्रम चालला होता.

ज्या वेळेस गोपाळ कोल्हापुरास शिकत होता त्या वेळेस महाराष्ट्रांत जी धामधूम उडाली होती, जो धूमधडाका चालला होता त्याचा प्रति-ध्वनी कोल्हापुरासही ऐकू आल्याविना कसा राहील ? विष्णुशास्त्री चिपळूण-कर यांच्या निबंधमालेने एक प्रकारचे नवचैतन्य मृत राष्ट्राच्या देहात ओतण्यास आरंभ केला होता. रानड्यांचे कार्य जास्त व्यापकपणे परंतु धिमेपणाने चालले होते. शास्त्रीबोवांनी त्यावेळच्या कित्येक पुढाऱ्यांनी चालविलेले आत्मनिंदेचे कार्य बंद पाडले आणि लोकात तेज आणि आत्मविश्वास उत्पन्न केला. राष्ट्राचा तेजोभंग करून राष्ट्र मेलेले असले तर ते कायमचे मरावे या आत्मनिंदेला आळा घालून आत्मविश्वास अंतरा जागवा आणि त्यास निश्चयाचे पाणी घाला असे शास्त्रीबोवांनी आपल्या तेजोमयी लेखणीने राष्ट्रास पटाविले. आत्मनिंदा करून आपणच आपले पाय खच्ची करून घेण्यात, आपण पंगु आहो असा जप करण्यात काय पुरुषार्थ आहे ? हातपाय तुटल्यावर मनुष्य धावणार कसा ? पुढे घुसणार कसा ? दुसरे आपले हातपाय तोडतील तर त्यास अटकाव

केला पाहिजे. निदान आपण तरी आपलाच घात करू नये, आपल्याच पायावर स्वतःच्या हातून धोंडा पाडू नये हे तत्त्व शास्त्रीबोवांनी नवीन तरुणांस उपदेशिले. आत्मस्तुती करणे जर वाईट तर आत्मनिंदाही वाईट. सर्व काही प्रमाणात असले पाहिजे. परंतु शास्त्रीबोवा तत्त्वच उपदेशून राहिले नाहीत तर तत्त्वाप्रमाणे कृती करण्यासही ते लागले. रुपेरी शृंखलात निगडित होऊन स्वजनहित उत्तम रीतीने पार पाडता येणार नाही, म्हणून ती तोडून हा नरसिंह रणांगणांत आला. पुण्यास नवीन शाळा उघडण्याचा त्यांनी विचार केला. त्यांचा विचार ऐकून, आधीच त्यांच्या लेखांनी देशकार्यार्थ उद्युक्त झालेले टिळक आणि आगरकर त्यांस येऊन मिळाले. रानडयांनी त्यांस नामजोशांची सुंदर जोड दिली. आगरकर आणि टिळक यांचे कॉलेजमध्ये वादविवाद होत आणि ज्यावर त्यांचे मतैक्य झाले तो प्रश्न म्हणजे शिक्षण हा होय. लोकांस आधी सुशिक्षित केले पाहिजे आणि ते शिक्षण आपल्या हातांत पाहिजे, हा त्यांचा विचार ठाम झाला होता. आगरकर अठरा विश्वे दारिद्र्यात वाढलेले, स्वजनांनी टाकलेले आणि लोकांनी हेटाळलेले. रा. ब. महाजनींनी वर्गात कटू बोल उद्गारले, त्या वेळेस तुमच्याप्रमाणेच एम्. ए. होईन असे स्वच्छ सांगून चिकाटीने आणि धैर्याने ते एम्. ए. झाले. तर्क, न्याय आणि नीतिशास्त्र हे त्यांचे विषय होते. देवाधर्मावरचा त्यांचा विश्वास उडाला असला तरी स्वजनहिताचा नवा मार्ग त्यांस दिसला होता. त्यांस वाढत्या पगाराची सरकारी नोकरी मिळाली असती, परंतु त्यांनी आपल्या आईला लिहिले की 'आई, मी मोठी नोकरी करणार नाही, मी देशकार्यास वाहून घेणार आहे.' असला लोकोत्तर स्वार्थत्याग लोकांस जागे केल्याशिवाय कसा राहील? लोकांची दृष्टी या तरुणाकडे गेली. त्यास पुढे प्रख्यात संस्कृतज्ञ आपटे मिळाले. जास्त तरुण मिळत चालले. शाळा भरभराटत चालली, चिपळूणकर शाळाच काढून थांबले नाहीत तर त्यांनी केसरी आणि मराठा ही दोन साप्ताहिके पण सुरू केली. अलीकडच्या काळांत लोकांस परिस्थितीचे सम्यक् ज्ञान करून देण्यास वृत्तपत्रां-शिवाय अन्य सुंदर साधन नाही. केसरीची गर्जना आणि मराठ्याचा हरहर महादेव घुमू लागला. तरुणांची अंतःकरणे थरारून जाऊ लागली.

या वेळेस केसरीचे संपादक आगरकर होते. आणि मराठ्याचे टिळक होते. टीका करण्यास उभयतांही भीत नसत. गोरे अधिकारी किंवा काळे या दोघांचाही खरपूस समाचार घेण्यास ते कचरत नसत. १८८० पासून टिळकांचे कोल्हापूरकरांच्या राज्याकडे लक्ष होते. १८८० मध्ये पहिले राजे निवर्तले. त्यांच्या दोन राण्या होत्या. वडील राणीस दत्तक देऊन कारभार सुरू झाला. परंतु या नवीन राजास नीट वागविण्यात येत नाही अशी ओरड ऐकू येऊ लागली. त्यास सक्तीने दारू वगैरे पाजतात आणि त्यास वेडा ठरवून नवीन दत्तक गादीवर बसवावयाचे कारभाऱ्यांच्या मनात आहे, अशीही दाट वदंता महाराष्ट्रात उठली. १८८१ च्या २४ नोव्हेंबर रोजी रा. ब. गोपाळराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली पुण्यास जाहीर सभा भरून निषेध व्यक्त करण्यात आला. पुढे टिळक व आगरकर यांस तीन पत्रे उपलब्ध झाली. आणि कारभारी बर्वे यांच्यावर विष घालण्याचा आरोप त्यांनी केसरी व मराठ्यातून प्रसिद्ध केला. कारभारी बर्वे यांनी फिर्याद केली. ही पत्रे नाना भिडे नांवाच्या गृहस्थाने आकसाने लिहिली होती असे सिद्ध झाले. टिळक व आगरकर यांची बाजू तेलंग आणि मेथा यांनी मांडिली होती. टिळक व आगरकर यांनी माफी मागितली, परंतु बर्व्यांचे समाधान तेवढ्याने होईना. शेवटी १७ जुलै रोजी त्यांस १०१ दिवसांची शिक्षा झाली. त्यांच्यावर दोष इतकाच ठेविला होता की, त्यांनी सदरहू पत्रे विचार न करिता छापिली. या संपादकद्वयास शिक्षा झालेली ऐकून प्रत्येकास सहानुभूती वाटली. सातारच्या वंशासाठी ते झगडले; कारागृहात गेले. त्यांस काही स्वतःचा फायदा मिळवावयाचा नव्हता. त्यांचे ठिकठिकाणी अभिनंदन करण्यात आले आणि त्यांच्यासाठी फंड सुरू झाला. कोल्हापूरकरांचा या बाबतीत जास्तच जिव्हाळ्याचा संबंध. तेथील राजाची तरफदारी या स्वार्थत्यागी वीरांनी केली होती. राजाराम कॉलेजातील विद्यार्थ्यांनी फंडासाठी नाटक करावयाचे ठरविले. गोपाळ गरीब असल्यामुळे त्यास स्वतः खिशातून पैसा काढून देणे अशक्य होते. त्याने या नाही त्या हाताने मदत करावी म्हणून नाटकात स्त्रीची भूमिका केली होती. त्या

टिळक-आगरकरांजवळ त्यास पुढे जावयाचे होते, त्यांची ही अशी प्रस्तावना आहे.

१८८२ चे अखेरीस गोपाळाची परीक्षा झाली आणि तो तीमध्ये यशस्वी झाला. कोल्हापुरास त्यावेळी बी. ए. चा वर्ग नव्हता म्हणून गोपाळ डेक्कन कॉलेजमध्ये शिकण्यास गेला. परंतु लवकरच खुद्द कोल्हापुरास हा वर्ग निघाल्यामुळे दुसऱ्या टर्मला गोपाळ पुनः कोल्हापुरास आला. या वेळेस गोपाळच्या अभ्यासक्रमात विख्यात एडमंड बर्कचे जगप्रसिद्ध 'फ्रेंच क्रांतीवरील विचार' हे पुस्तक नेमलेले होते. बर्कची गंभीर आणि भारदस्त विचारसरणी व तदनुरूप सुंदर भाषा या रमणीय योगाने हे पुस्तक लोकोत्तर झाले आहे. या पुस्तकावर 'पेन' ने टीकाही केली आहे. राजकीय तत्त्वज्ञानावरचे हे ग्रंथ गोपाळास नीट अभ्यासावे लागले हे फार चांगले झाले. ज्याचा पुढील जन्म राजकीय झगड्यात जावयाचा होता त्याला प्रथमतःच ही पुस्तके शिकावी लागली हा एक योगायोगच म्हणावयाचा. नेहमीच्या पद्धतीप्रमाणे गोपाळाने यातील उत्तमोत्तम उतारे पाठ केले, आणि आपल्या स्मृतिपटलावर कायमचे खोदून ठेविले. १८८३ मध्ये गोपाळ पहिली बी. ए. ची परीक्षा पास झाला. दुसऱ्या बी. ए. मध्ये तो ऐच्छिक विषय गणित घेणार होता, आणि यासाठी त्यास मुंबईस जाणे इष्ट वाटले. १८८४ च्या जानेवारीमध्ये तो मुंबईस दाखल झाला. या वर्षी त्याची शेवटची परीक्षा होती. हॅर्थान्वेट हे एक नामांकित शिक्षक होते. येथे धोंडोपंत कर्वे हे त्यांचे सहाध्यायी होते. गोपाळ हा हॅर्थान्वेट साहेबांचा एक आवडता शिष्य होता येवढेच कळते. बी. ए. ची परीक्षा गोपाळराव दुसऱ्या वर्गात पास झाले. त्यांस आनंद झाला. संकल्प केल्याप्रमाणे आतापर्यंतचा पल्ला निर्वेधपणे गाठला. यावेळी त्यांचे वय फक्त १८ वर्षांचे होते. अजूनही आपण शिकावे असे त्यांस वाटण्याचे दिवस होते व त्यांस तसे वाटतही होते. देशभक्तीचा उमाळा अद्याप आला नव्हता. व्यापक विचार हृदयाकाशात डोकावू लागले नव्हते. त्यांस क्वचित् वाटे की, विलायतेस जावे व आय्. सी. एस्. होऊन यावे, कारण त्यांचे अद्याप शिकण्याचे वय होते. परंतु या गोष्टीस पैशाची जोड अवश्य पाहिजे. एंजिनिअर झाले तर ? का वकीलच व्हावे ? असे अनेक विचार त्यांच्या

मनात घोळत होते, पण निश्चय होत नव्हता. अखेर ते इंजिनिअरिंग कॉलेजमध्ये जाऊ लागले. परंतु इतक्यात पुण्यास ज्यूरिस्प्रूडन्सचा वर्ग उघडण्यात आला. तेव्हा कॉलेज सोडून देऊन ते या क्लासात जाऊ लागले. आणि न्यू इंग्लिश स्कूलमध्ये त्यांनी दरमहा ३५ रुपयांची नौकरी धारिली. याशिवाय त्यांचे दुसरे एक मित्र आणि ते दोघांनी मिळून पब्लिक सर्व्हिसचा एक क्लास काढिला. या क्लासामुळे त्यांस ३०–३५ रुपये प्राप्ति होत असे. स्वतःसाठी पंधरा वीस रुपये खर्च करून बाकी उरलेले सर्व पैसे ते आपल्या भावाकडे पाठवीत. गोविंदरावांनी किती कष्ट करून आपली विद्या शेवटास नेली हे गोपाळराव जाणून असत. शिवाय वहिनीची प्रेमळ मूर्तिही त्यांच्या डोळ्यांसमोर उभी राहत असे. ‘ पुरे झाले तुझे शिकणे; आता कोठे तरी नौकरी करून संसारास मदत करू लाग ’ असे जर कधी गोविंदराव बोलले तर ती माउली म्हणावयाची, ‘ शिका हो भाऊजी तुम्ही; माझे किडुक मिडुक मोडून देईन, तुम्ही आपली शिकण्याची हौस पुरी करून घ्या. ’ आपल्या वहिनीला पुन्हा तिचे अलंकार मिळावे ही त्यांची इच्छा होती. या सदिच्छेने जेवढे म्हणून पैसे उरत तेवढे ते वहिनीला पाठवून देत.

गोपाळराव शाळेत इंग्रजी शिकवीत. पाचव्या इयत्तेला ग्रे कवीचे जगन्मान्य स्मशानगीत शिकविताना ‘ किती सुंदर विचार, किती गंभीर भाषा ’ असे उद्गार ते काढावयाचे. पांचव्या इयत्तेतील मुलांना ते समजत नसे. ते मनापासून शिकवीत परंतु मुलांना ते कठिण वाटे. ते घरीही इंग्रजीचा जोराने अभ्यास करीत. इंग्रजी भाषा आपलीशी करावी ही त्यांची महत्त्वाकांक्षा. कोठे उत्तम विचार, उत्तम वाक्य दिसले की, गोपाळरावांनी ते आत्मसात केलेच. वर्तमानपत्रांचाही त्यांस नाद लागला. त्यांतील इंग्लिश उतारे ते पाठ करीत आणि पुढे पुढे त्यांनी एकदा वाचले की, त्यांच्या लक्षात राही. टिळक–आगरकरांच्या सहवासाने ते केसरीत वर्तमानसार देत. पुढे १८८६–८७ साली मराठ्याच्या अंकात ते लिहू लागले. त्यांचा स्वभावतःच इंग्रजीकडे ओढा असे. ते इंग्रजी उत्तम लिहीत. प्रथम प्रथम त्यात शब्दावडंबर असे. ‘ General war in Europe ’ ही त्यांची लेखमाला लोकप्रिय झाली होती असे सांगतात.

# अध्यापन-काल

परंतु अद्याप गोपाळरावांचे ध्येय निश्चित झाले नव्हते. त्यांची ज्यूरिस्प्रूडन्सची परीक्षा उतरली. १८८६ साली ते व वासुदेवराव केळकर फक्त वर्गाच्या दिवशी मुंबईस जात; हजिरी पुण्यास राहूनच ते भरीत. आपण नामांकित, फर्डे इंग्लिश बोलणारा वकील व्हावे हीच त्यांच्या मनातली इच्छा दिसते. परंतु देवाची इच्छा दुसरीच होती. त्याचे विचार कोणास आकळता येतात ? गोपाळरावांच्या हातून सर्व देशाची वकिली व्हावयाची होती. ते टिळक-आगरकरांच्या सहवासात होते. विशेषतः आगरकरांच्या मध्ये आणि त्यांच्या मध्ये साम्य होते. कष्टदशेतून, दारिद्र्याच्या पंकातून आगरकररूपी सुंदर कमल देशास लाभले होते. गोपाळरावांची स्थितिही गरीबीचीच होती. आगरकरांनी पैशाचा व सरकारी मानमरातबाचा मार्ग झिडकारून जनसेवेस वाहून घेतले या गोष्टीचा न कळत परिणाम गोपाळरावांच्या गुणग्राही अंतःकरणावर झाल्याशिवाय राहिला नसेल. आमरण गरीबीतच जन्म कंठून अध्यापक-वृत्तीने पुरातन ऋषींप्रमाणे व्रताचरण करावयाचे हा आगरकरांचा उज्ज्वल मार्ग अनुसरण्याची अंधुक स्फूर्ति त्यांस झाली असेल. आगरकरांचे अकपट वर्तन, निर्व्याजमनोहर उदार स्वभाव, कुटिल विचारांची चीड, पतित व अज्ञानांधःकारात पडलेल्यांचा उद्धार करण्याची तळमळ, मनाची धीरता, शिव्याशापांस न जुमानता आपला दृढ निश्चय राखण्याचा बाणा या सर्व गुणांचा गोखल्यांच्या कोमल मनावर काहीच परिणाम झाला नसेल का ? टिळक, आगरकर अत्यंत बुद्धिमान्-परंतु त्यांनी आपले बुद्धिवैभव देशास वाहिले. तोच धडा

आपण गिरवावा, असे विचार त्यांच्या मनात येऊ लागले असतील; परंतु अद्याप गोपाळरावांस महत्त्वाकांक्षा होती. आपण पैसे मिळवावे, सुखाचा संसार करावा हीच वृत्ती अद्याप होती. मुंबईस त्यांचे मित्र पटवर्धन या वर्षी राहावयास गेले. तेथे कायमचा शिक्षक घेण्याचा प्रश्न निघे, आणि 'You will drive in carriages while I shall walk on foot' असे गोखले म्हणत. आपणही हाच सुखाचा रुळलेला मार्ग स्वीकारावा असे त्यांस वाटे. परंतु भवितव्यतेच्या मनात तसे नव्हते. समाजात मानमान्यता मिळवावयाच्या गोपाळरावांच्या कल्पना बदलत चालल्या. सरकारी नौकरी करूनच मान्यता मिळत नाही; आज आगरकर, टिळक यांस समाजात किती लोकोत्तर मान मिळत आहे; आपणासही तोच मान सोसायटीत राहून मिळविता येईल, हा विचार त्यांच्या मनात येऊ लागला. या विचाराबरोबर स्वार्थत्यागाची वृत्ती पण उद्भवू लागली. आगरकर, टिळक यांनी किती स्वार्थत्याग केला असे विचार मनात येत जात असता सोसायटीच्या काही चालकांनी गोखले यांस 'आता आमच्याच मंडळीला मिळा' असे सांगितले. सोसायटीला आता कॉलेज संपूर्ण अभ्यासक्रम शिकविणारे करावयाचे होते. गोपाळरावांचा इंग्रजीचा अभ्यास—व्यासंग दांडगा होता. तेव्हा त्यास पहिल्या वर्षाचे इंग्रजी शिकविण्यास देण्यात येणार होते. गोखल्यांस मोठा प्रश्न पडला. आपला वडील भाऊ काय म्हणेल? जीव गेला तरी त्याचा शब्द आपण मोडणार नाही असा गोपाळरावांचा निश्चय. शेवटी परभारे त्यांच्या भावाची परवानगी मिळाली आणि १८८६ च्या अखेरीस गोपाळराव सोसायटीचे तहाहयात सभासद झाले. आपणांस आगरकर, टिळक यांच्या मांडीशी मांडी लावून बसण्याचा मान मिळाला याचे गोपाळरावांस सानंद कौतुक वाटे. संकुचित वातावरणातून ते आता बाहेर पडले. स्वतःचे हित आता मागे पडून संस्थेचे हित समोर आले. स्वार्थत्यागाचा पहिला धडा त्यांनी गिरविला. बुद्धिमंत व उद्योगी गोपाळरावांच्या आयुष्याला निराळे वळण लागेल. कॉलेजात ते अध्यापकाचे काम करू लागले.

आता थोडे गोपाळरावांच्या घरगुती स्थितीकडे वळू या. गोपाळराव तेरा वर्षांचे असताच त्यांचे वडील वारले होते. वडील वारल्यानंतर लग्नाची

वगैरे जबाबदारी चुलते अंताजीपंत यांच्यावर पडली. वडील असतानाच चुलत्यांनी विवाहाचा प्रश्न काढला होता. परंतु 'शिकतो आहे येवढ्यातच कशाला घाई ? अजून काही वय गेले नाही.' असे शब्द त्यांचे वडील बोलले. वडील निवर्तल्यावर अंताजीपंतांनी एक वर्षातच १८८० साली गोपाळाचा विवाह केला. कारण, नाही तर मग रूढीप्रमाणे तीन वर्षे विवाह करता आला नसता. गोपाळाचे वडील १८७९ मध्ये वारले. गोपाळरावांच्या घराण्यातली मंडळी दीर्घायुषी होती, परंतु कृष्णराव त्या मानाने अल्पवयीच ठरले. गोपाळास हे लग्न अगदी निरुपायाने करून घ्यावे लागले. वडिलांचा शब्द मोडावयाचा नाही यासाठीच ते लग्नास उभे राहिले, परंतु त्याचा परिणाम—जसा व्हावयाचा तसाच—अनिष्ट झाला. गोपाळरावांस ही लग्नाची गोष्ट कोणी काढिली तर अगदी खपत नसे. ते वस्कन् अंगावर यावयाचे. त्यांनी बायकोचे नाव टाकले. तिने आपल्या गुणांनी कदाचित् गोपाळरावांस प्रसन्न केले असते, परंतु त्यांतच तिला पंडुरोग झाला. आधीच मनाविरुद्ध झालेले लग्न आणि त्यांत बायको पंडुरोगी. गोपाळरावांनी सावित्राबाईंचे नाव सोडून दिले. याचे त्यांस पुढे फार वाईट वाटे व पश्चात्ताप होई. गोपाळराव पुण्यास कायम झाल्यावर आता यांचे दुसरे तरी लग्न करून द्यावे असा गोविंदरावांच्या बायकोने प्रश्न काढला आणि गोपाळरावांचा द्वितीय विवाह १८८७ साली झाला. आता ते बायको, आई व आणखी काही मंडळीसह शनवारात तांब्यांच्या बिऱ्हाडी राहत असत. येथेच टिळक आणि आगरकरही राहत असत. त्या वेळेस त्यांचे इतके प्रेम होते ! पुढे गोखले शनवारातील भाटवडेकरांच्या वाड्यात राहू लागले. कॉलेजमध्ये शिकवावे व घरचा संसार चालवावा असे चालले होते.

गोपाळरावांचे कॉलेजांतील काम जोराने चालू झाले. त्यांस प्रीव्हियसचे इंग्लिश शिकवावयास दिले. त्या वर्षी सौदेचे लोकप्रिय नेल्सनचे चरित्र अभ्यासासाठी होते. नेल्सन दर्यावर्दी अधिकारी. या पुस्तकात गलबतांच्या नाना प्रकारच्या भागांचे वर्णन आले आहे. देशावरच्या पुष्कळ विद्यार्थ्यांनी समुद्र पाहिलेला सुद्धा नसतो. त्यास प्रचंड गलबतांची कल्पना नसते. गोपाळराव या गलबतांचे यथार्थ स्वरूप समजण्यासाठी

स्वतः मुंबईस जाऊन ही माहिती मिळवून येत आणि मग विद्यार्थ्यांस सांगत. कोणतेही काम अंगावर पडले म्हणजे ते कायावाचामनाने करणे हे आपले कर्तव्य आहे असे समजणारे लोक थोडेच असतात. कामाची वेळ मारणारेच पुष्कळ; परंतु गोपाळरावांचे हे ब्रीद नव्हते. मुलांस ते मनापासून शिकवीत. शिकविण्यासाठी घरी तयारी करीत. त्यांचा सकाळचा ७॥ ते १०॥ हा वेळ घरी सिद्धता करण्यात जात असे. आपली जबाबदारी ओळखून काम करणारे असे मेहनती शिक्षक विरळा. परंतु उत्तम शिक्षक सर्वांनाच होता येत नाही. सर्व विषय सारख्याच मनोरंजकतेने शिकविणे एकाद्यासच साधते. गोपाळराव जरी इंग्रजी शिकविताना पुष्कळ मेहनत घेत तरी मुलांच्या मनावर विषय उत्तम रीतीने त्यांस ठसविता येत नसे. आगरकर न्यायासारखाच बुद्धी आणि तर्कप्रधान विषय सुद्धा रसाळ करून सांगत. टिळकांना गणितातील तत्त्व विद्यार्थ्यांस सहज पटतील अशा रीतीने सांगता येत. तसे गोपाळरावांचे इंग्रजीविषयी नव्हते. ते सफाईदार व भरभर न अडखळता बोलत. परंतु वाङ्मय शिकविताना जी एक प्रकारची सहृदयता लागते ती व ग्रंथकाराचे मनोगताशी समरस होता येण्याची कला ही गोपाळरावांत नव्हती ! केळकर हे इंग्रजीचे त्यावेळचे नामांकित शिक्षक. ते इंग्रजी विषय इतका उत्कृष्टपणे व सहजपणे विशद करीत की, मुले डोलू लागत. एखाद्या दृष्टांतानेच ग्रंथकाराचे हृद्गत ते मुलांस समजावून देत, व एखादी मार्मिक कोटी करून मुलांची मने उचंबळवून सोडीत. विषयाशी शिक्षक तन्मय व्हावा लागतो, आणि मगच सहजोद्गार त्याच्या मुखावाटे बाहेर पडू लागतात. प्रो. केळकरांसारखे शिक्षक खुद्द इंग्लिशातही थोडेच मिळतील असा त्यांचा लौकिक होता. परंतु अवघड भागावरच केळकर वेळ दवडावयाचे; सोपा भाग आला की, तासतास तीनतीनशे कवितेच्या ओळी व्हावयाच्या. गोखले असे कधी करीत नसत. त्यांचे काम प्रमाणशुद्ध आणि नेमस्त. टंगळमंगळ कशातही नाही. अगदी सोपा भाग आला तरी तोही विवरण करावयाचा. सर्वच भाग त्यांच्या दृष्टीने महत्त्वाचा. हे महत्त्वाचे वाक्य, खुणा करा वगैरे ते सांगावयाचे नाहीत. विद्यार्थ्यांना वाटावयाचे, सर्वच परीक्षेस करावयाचे की काय ? परीक्षेसाठी अमुक अमुक

मुद्दाम वाचा असे आपणांस शिक्षक सांगतील तर बरे असे विद्यार्थ्यांस वाटत असते, परंतु गोपाळरावांचे तसे नव्हते. तसेच जेथे जेथे संदर्भ असेल–विशेषतः ऐतिहासिक संदर्भ–तेथे तो स्पष्ट करावयाचा, यामुळे त्यांची शिकवणूक परीक्षेसाठी जास्त उपयोगाची नसे. तसेच वाङ्मया-बद्दल मनात प्रेम किंवा भक्ती उत्पन्न करणे गोखल्यांस शक्य नसे. ते काम केळकरांनीच करावे; असो १८८६–८७ मध्ये गोपाळरावांनी दुसरा एक उद्योग आरंभिला होता. शाळांमधून उपयोग व्हावा म्हणून ते अंकगणितावर एक इंग्रजी पुस्तक लिहीत होते. ते पुरे झाल्यावर त्या त्या विषयांतील पंडितांना त्यांनी ते दाखविले. टिळकांची गणितात मती सूक्ष्म व दांडगी. त्यांनी हे पुस्तक छापवा असे उत्तेजन दिले. गोखले फक्त २१ वर्षांचे होते. त्यांस आनंद झाला व ते पुस्तक प्रसिद्ध झाले. प्रथम ते रहाळकर आणि मंडळी यांच्याकडे दिले होते. पुढे ते मॅकमिलन् कंपनीकडे जाऊन या उपयुक्त पुस्तकाचा हिंदुस्थानभर प्रसार झाला. दरमहा १२५ रुपये या पुस्तकाबद्दल मॅकमिलन् कंपनीकडून त्यांस पुढे मिळत असत. हे एक त्यांस कायमचे उत्पन्न झाले. त्यांच्या पाठीमागे त्यांच्या मुलीस ते मिळते. नुकतीच या पुस्तकाची सुधारून वाढविलेली आवृत्ती प्रो. नाईक यांच्या-कडून मॅकमिलन् कंपनीने प्रसिद्ध केली आहे.

चांगल्या गोष्टीस लवकरच दृष्ट लागते. लहान मुलाला न्हाऊ माखू घालून आई त्याच्या पाणीदार डोळ्यांत काजळ लावते. तो सुंदर दिसू लागतो. आईला वाटते, माझ्या सोनुल्यावर दृष्ट पडेल; आणि ती त्यास गालबोट लाविते. डेक्कन एज्युकेशन सोसायटी भरभराटत चालली होती. चिपळूणकर जरी गेले तरी त्यांच्या पाठीमागे, टिळक, आगरकर, आपटे, गोळे, धारप, नामजोशी, गोखले, भानू–यांसारख्या विद्वानांनी संस्था अल्पावकाशातच नावारूपास आणिली. संस्थेचे कॉलेज निघून ते आता सर्व विषय शिकविण्यास समर्थ झाले होते, संस्थेचे पैशाचे काम नामजोशी करीत होते. लोकांचा संस्थेवर लोभ जडला. पुण्यास संस्था भूषणभूत झाली. न्यू इंग्लिश स्कूलसारखी शाळा हिंदुस्थानात अन्यत्र क्वचित्च असेल असे शेरेबुकात शाळा पाहणाऱ्या अधिकाऱ्यांनी लिहून ठेविले. परंतु सर्व काळ सारखाच नसतो. या जोमाने वाढणाऱ्या रोप्याला

कीड लागत चालली. दोन भांडी एकत्र आली की त्यांचा आवाज व्हावयाचा. दोन फांद्या एकावर एक घासल्या तर त्यातून अग्नी बाहेर पडावयाचा. चार माणसे एकत्र होऊन काही दिवस गुण्या-गोविंदाने राहताना दिसतात, परंतु अखेर स्फोट व्हावयाचा हे निदान आम्हा लोकांत तरी ठरलेलेच आहे. 'आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः' नाना प्रकारच्या कल्पना आम्ही पुढे मांडू—त्या पार पाडण्यासाठी कंबर बांधू, परंतु मध्येच काही तरी विघ्ने उत्पन्न होऊन हे हेतू जागच्या जागी राहतात. या कल्पना बुडबुड्याप्रमाणे विरून जातात. तडीस पोचविणारा एखादाच आमच्यात निघावयाचा असा लौकिक—दुर्लौकिक—आमचा फारा दिवसांचा आहे. डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे असेच होणार अशी चिन्हे दिसू लागली. वाढत्या चंद्रास आजच ग्रहण लागणार, फोफावणाऱ्या वृक्षास कीड लागणार असे वाटू लागले. प्रथम या संकटाचा उद्‌भव मतामतांच्या गलबल्यात झाला. आगरकर व टिळक १८८२ च्या जुलै महिन्यात कारागृहात गेले. त्यांना १०१ दिवस एकत्र सहवास झाला. "मनुष्य पहावा बसून आणि जमीन पहावी कसून' अशी आपल्यामध्ये एक सुंदर म्हण आहे. आपण जेव्हा मनुष्याच्या जवळ पुष्कळ दिवस राहतो तेव्हाच त्याच्या स्वभावाचे सम्यक् व यथार्थ ज्ञान आपणास होते. वरवर होणारे ज्ञान, येता जाता होणारा बोध हा निर्विकल्प असतो; परंतु आपण त्या मनुष्याच्या सहवासात राहू लागलो कीं, त्याच्या सर्व मताचे सविकल्पक ज्ञान आपणांस होऊ लागते. आगरकर व टिळक यांचे कॉलेजमधील वादविवाद आता तुरुंगाच्या दारात सुरू झाले. शिक्षणाच्या झिरझिरीत वस्त्राखाली क्षणभर झाकून गेलेली त्यांची परस्परविरोधी मते येथे पुनः स्पष्ट बाहेर येऊ लागली आणि याचा परिणाम असा झाला की, ज्या वेळेस हे दोघे नरवीर कारागृहातून मुक्त झाले त्या वेळेस एकमेकाविरुद्ध मने होऊन बाहेर पडले.

कॉलेजमध्ये मधली सुट्टी झाली आणि अध्यापक वर्ग एकत्र जमला की वादविवादास सुरुवात होऊन त्यास ऊत यावयाचा. प्रो. भानू यांनी टिळकांच्या आठवणीत यांचे हुबेहूब वर्णन केले आहे. ते म्हणतात, 'पुष्कळ वेळा यांचे वाद केवळ 'जितं मया' यासाठीच होत. त्यात

तत्त्वशोधन असे क्वचित्‌च होई' अशा रीतीने कॉलेजमध्ये दोन पक्ष झाले. आगरकर पक्ष आणि टिळक पक्ष : गोखल्यांच्या मनाचा ओढा आगरकरांकडे असे.

परंतु शेवटची फाटाफूट जी झाली ती केवळ मतभिन्नत्वामुळे झाली असे आम्हांस वाटत नाही. मतभिन्नत्व होते ते कॉलेजमध्ये असल्या वेळेपासूनच होते, परंतु शिक्षण हे त्यांनी समान ध्येय ठरविले होते; आणि त्याच्यासाठी ते तळमळत होते; आजवर खटपट करीत होते. १८८८ च्या दसऱ्याला गोपाळराव आगरकरांनी सुधारक हे स्वतंत्र साप्ताहिक काढले. ज्याप्रमाणे आपले मराठे शिलेदार दसऱ्याच्या दिवशी आपल्या शृंगारलेल्या घोड्यावर स्वार होऊन हातात तरवारी घेऊन शत्रुखंडनार्थ मोठ्या ऐटीने आणि उमेदीने बाहेर पडत, त्याप्रमाणेच हा नरवीर आपल्या सुंदर तेजस्वी आणि दृढ अशा विचारवारूवर आरूढ होऊन, आपली तेजस्वी लेखणी हीच झळकणारी असिलता हातात सरसावून, समाजात माजलेल्या रूढींचे, दुराचारांचे निर्मूलन करण्यास या दसऱ्याच्या शुभ प्रसंगी सज्ज झाला. मरेपर्यंत ते लढले, धीराने लढले. सुधारकांत इंग्रजी भाग काही वर्षे गोपाळराव गोखले लिहीत असत, यामुळे आगरकरांस मोठी मदत होई. सुधारकातील मतांवर केसरीत प्रखर टीका होई आणि या टीकेवर सुधारक प्रतिटीका करी. ही भांडणे कॉलेजमध्येही घुसत व भांडणे मिटता मिटता मारामार पडे. इतके झाले तरी टिळकांनी कॉलेज सोडण्याचे मनात आणले नाही. कॉलेजचे काम चाललेच होते. या भांडणामुळे कॉलेजच्या कामात म्हणण्यासारखा व्यत्यय येत नसावा. नामजोशी द्रव्यनिधि गोळा करीतच होते. ते नेहमी टिळकांच्या पक्षाचे असत. परंतु या वादांनी नामजोशी यांनी आपले स्वीकृत कार्य कधी सोडिले नाही. पुष्कळ लोक टिळक कॉलेजमधून निघाले याचे कारण या वादविवादावर सोपवितात; परंतु हे मुख्य कारण नव्हे. मुख्य कारण म्हणजे पगारवाढ, इतर बाजूंनी पैसा मिळवावा की नाही वगैरेच मुद्द्यांवर मतभेद झाले हे होय. आणि जेसुइट मतावर निघालेल्या या संस्थेने आपले ध्येय ढकलून दिले हे पाहून टिळकांनी संबंध सोडला. टिळक तेवढे स्वार्थत्यागी आणि बाकी सर्व पैशासाठी हपापलेले, असे आम्ही म्हणत नाही. ते पैशासाठी हपापलेले नसतील. त्यांना त्या वेळेस कुटुंबाच्या

केवळ खर्चासाठी जास्त पैसे पाहिजे असतील. टिळक म्हणत की, असे नियम करू नका. ज्यास जरूरी आहे त्यास त्याची स्थिती लक्षात घेऊन द्या जास्त पगार. आगरकरांची अडचण लक्षात घेऊन त्यांस जास्त पगार द्यावा असे टिळक म्हणत होते. परंतु आता संस्थेची स्थिती चांगली आहे तर सर्वांचीच बढती व्हावी या मताचा टिळकांना तिटकारा आला. एका टीकाकाराने तर टिळकांस त्यांच्या वडिलांनी २००० रुपये ठेविले होते, तेव्हा त्यांस आगरकरांसारख्या इतर विपन्न माणसांची जरूर काय समजणार असे लिहिले आहे; परंतु ते कुत्सित आहे. टिळकांच्या घरी पुष्कळ पैसा असेल; तो दुसऱ्यास अडचणीच्या वेळी त्यांनी दिलाही असेल, परंतु म्हणून आपल्या नियमात फरक करावा असे थोडेच आहे. टिळक निघून जाण्यास हेच मुख्य कारण असावे. कारण यात इतर मतांस जागा नसून, ज्या हेतूने ही शिक्षणसंस्था काढिली तिच्या मूलभूत तत्त्वांवरच गदा येत होती. टिळक हे तत्त्वाचे भुकेले असत, व्यक्तींचे नसत. व्यक्ती—मग ती कितीही थोर, विद्वान्, स्वार्थत्यागी असो—त्या व्यक्तीस आपल्या मतांसाठीच टिळकांना दुखवावे लागले; यासाठीच त्यांस आमरण झगडावे लागले. गोखले हे प्रोफेसर झाल्यामुळे टिळकांस त्यांचा हेवा वाटू लागला, गोखले हे आपले प्रतिस्पर्धी आहेत असे टिळकांना वाटले आणि ते गोखल्यांचा हेवा करू लागले, पुढे मागे हा आपल्यावर ताण करील आणि आपला लौकिक मागे पडेल असे टिळकांस भय पडले असे प्रि. परांजपे आपल्या छोटेखानी इंग्रजी चरित्रात लिहितात : "Mr. Tilak saw soon after Gokhale's admission to the Society that here was a man likely to be his formidable rival." परंतु या लिहिण्यात काही अर्थ नाही. या वेळेस गोखले इंग्रजी शिकवीत असत ते सुद्धा त्यांस मुलांना मनोरंजक करून शिकविता येत नसे. इतिहास व अर्थशास्त्र टिळक सोडून गेल्यावर ते शिकवू लागले. आणि १८९७ नंतर त्या विषयावर ते अधिकारी या नात्याने सांगत. परंतु आज १८८७ च्या सुमारास टिळकांस हेवा वाटण्यासारखे गोखल्यांजवळ काही एक नव्हते. टिळकचरित्रकार रा. आठल्ये लिहितात :—

"Mr. Tilak jealous ! Mr. Tilak unable to work with his equals.—Mr. Tilak, who during eleven years of his life in the D. E. Society never once cared to obtain the post of a Principal, Head Master or Superintendent ! And pray jealous of whom ? Not of Ranade or Telang–his intellectual peers; but of Apte, Agarkar and Gokhale !! Mr. Paranjpye is here speaking of the Gokhale not of 1905 or 1908, not of 1897 even; the Gokhale of 1885 or 1887 was, according to his own biographers, regarded by his own friends and Mr. Tilak's opponents as nothing better than a clever student. Apte was a Sanskritist and nothing more ; Mr. Tilak's versatile genius could beat Apte on his own ground. As regards Agarkar, his title to fame rests more on his great sacrifice, his championship of reform of every kind and his eloquent style, rather than on his genious and learning. In point of intellectual equipment, Mr. Tilak far surpassed all his colleagues ; and if there was any jealousy at work, it must have been rather in the minds of those who, accustomed to regard Mr. Tilak as an equal ever since the College days, could not now hear with equanimity his enormous superiority."

हा लांबलचक उतारा देण्याचे कारण येवढेच की, टिळकांस इतरांचा द्वेष वाटे, त्यांस आपल्याहून दुसरा अधिक चांगला प्रोफेसर होईल ही भीती वाटे हे आक्षेप अत्यंत दुष्ट व फोल आहेत, हे आमच्याप्रमाणेच इतरांसही वाटते हे दाखविणे; असो, टिळकांनी अखेर डिसेंबर १८९० मध्ये आपला कायमचा राजीनामा दिला आणि ज्या बाळसेदार बाळाला आपल्या अंगाखांद्यावर खेळविले, ज्याच्यासाठी ११ वर्षे जिवापाड श्रम केले ते बालक इतरांच्या स्वाधीन करून, मोठ्या कष्टाने परंतु धीराने आपल्या तत्त्वासाठी ते बाहेर पडले. ते बाहेर पडले हेच बरे झाले.

कारण हा नरसिंह शाळेतच कोंडला गेला नाही हे देशाचे भाग्यच समजावयाचे. त्यांनी आपल्या केसरीने महाराष्ट्र खडबडविला आणि देशाबद्दलचे विचार सुप्तांतःकरणांत जागे केले. ' टिळकांनी पहा आपला आजन्म सेवेचा करार न मानता कॉलेज सोडले, उभारलेली संस्था ते टाकून गेले, आपल्या मागे संस्थेचे काय होईल याची त्यांस फिकीरही वाटली नाही, असे उद्‌गार पुष्कळांच्या लेखणीतून आणि तोंडातून ऐकू येतात. परंतु तत्त्वाचा खून करून संस्था चालविण्यापेक्षा ती संस्था समजा, मेली तरी तिच्याबद्दल टिळकांना तितके वाईट वाटले नसते. स्वामिभक्तीसाठी पन्नेला स्वपुत्राचा बळी द्यावा लागला. तत्त्वनिष्ठेसाठी टिळकांस स्वतःचे गोजिरवाणे अपत्य टाकणे भाग पडले. ही कठोरता म्हणजे कर्तव्यनिष्ठुरता. कर्तव्य कठोर असते; फुलांवर निजणे नव्हे किंवा हत्तीवर झुलणे नव्हे. याशिवाय संस्थेचा संबंध तोडून जर संस्थेच्या चालकांनी त्यांस एखादा विषय शिकवा, आमची अडचण आहे असे म्हटले असते तर त्यांनी कधी नाकारले नसते. त्यांच्या आठवणीत अशी गोष्ट दिली आहे : " टिळकांनी जेसुइट तत्त्वाचा पुरस्कार करून स्वतःच वर्तमानपत्र चालवून खूप पैसा मिळविला " असाही एक आक्षेप आहे. परंतु जेसुइट तत्त्व संस्थेला बंधक होते; संस्थेबाहेर नव्हते. संस्थेबाहेर जेसुइट राहीन असे टिळक म्हणत नव्हते. तर संस्थेत राहिलो तर जेसुइटच राहीन आणि सर्वांनी राहिले पाहिजे असे त्यांचे म्हणणे असे. ' संस्थेच्या बाहेर पडल्यावर त्यांच्यावर दुसऱ्या जबाबदाऱ्या, दुसरी कार्ये आली. आता त्यांचा संस्थेशी, तिच्या तत्त्वांशी काय बरे संबंध होता ? तेव्हा याही आक्षेपास जागा आहे असे आम्हांस वाटत नाही. असो.

सोसायटीत आता एकवाक्यता झाली. आता सर्व सुधारकांचा मेळा जमला. काम सुरळीत चालू लागले, वादविवाद थांबले. शांतीचे राज्य झाले. परंतु गोपाळरावांवर आता नवीन जबाबदारी येऊन पडली. टिळक सोडून गेल्यावर टिळकांची बाजू सावरणारे नामजोशी पण सोडून गेले. नामजोशी यांस संस्थेचे ' फॉरिन् सेक्रेटरी ' असे विनोदाने म्हणत असत. त्यांच्या अंगात गुणही तसेच होते. अत्यंत खटपटी. सर्व जगात त्यांच्या ओळखी. समयसूचकता, प्रसंगावधान, कोणाशी कसे

बोलावे व पैसे कसे काढून घ्यावे ही कला पूर्ण साधलेली—यामुळे संस्थेचे वगणी गोळा करण्याचे काम नामजोशांकडे असे. मनुष्यस्वभाव त्यांस फार चांगला कळे. त्यांच्या कामाचा धडाकाही तसाच असे. ते आपल्या पवित्र कार्यासाठी, सरदार, दरकदार, संस्थानिक यांच्याकडे जाण्यासही कचरावयाचे नाहीत. त्यांची छाती दांडगी, आवेश जबरा. सर्वांपासून पैसा त्यांनी गोळा केला, परंतु ते गेल्यावर हे काम गोखल्यांच्या अंगावर पडले. १८९२ साली आपटे स्वर्गवासी झाले. आगरकर त्यांच्या जागेवर गेले. टिळक गेल्यावर गणित, इतिहास व अर्थशास्त्र आणि इंग्रजी हे विषय गोखले शिकवीत. परंतु हे कॉलेजमधील वाढलेले काम संभाळून सुट्टी आली की खास झोळी लावून गोपाळराव वर्गणी गोळा करण्यासाठी फिरत. पडेल ते काम नेटाने करायचे, माघार घ्यावयाची नाही हा त्यांचा स्वभाव, फंड जमविण्याचे काम किती कठिण असते हे ते करणारासच समजते. नाना मतांच्या व नाना दृष्टीच्या लोकांची गाठ पडते. समजूत घालावी लागते. हुजत घालावी लागते. शिक्षणासाठी—या पवित्र कार्यासाठी मदत मागावयास गेले तरी त्यातही वाईट पाहणारे लोक नसतात असे नाही. वाइटाकडेच दृष्टी ठेवणारे लोक असतात. वाईट सापडलेच नाही तर ते शंका प्रदर्शित करतात. कोणी स्तुती करितो तर कोणी निंदा करतो. 'हे आले आता देशाचा उद्धार करणारे! काय ध्वजा लाविल्या आहेत हो यांनी? अक्कल तर पहा यांची, यांची काय कुवत आहे देशास वर आणण्याची?' या प्रकारची निंदाप्रचुर परुषोत्तरे सहन करावी लागतात. कधी गुलाब सुखावितो, तर कधी काटे दुखवितात. असले अनुभव जगाची नीट ओळख करून देतात. मनुष्याशी कसे वागावे हे समजून येते. थोरांच्या ओळखी होतात. निरनिराळे विचारप्रवाह दिसतात, सर्व इलाखाभर त्यांनी वणवण केली, आणि मिळेल ते तुळशीपत्र सोसायटीच्या चरणी वाहिले. १८९५ मध्ये कॉलेजची नवी इमारत झाली; १८९५ मध्ये वसतिगृहे बांधण्यात आली. परंतु वर्गणीरूपाने पुरेसा पैसा गोपाळरावांनी मिळवल्यामुळे संस्था कर्जबाजारी झाली नाही. ती स्वतःच्या पायावर उभी राहिली. त्यांस कॉलेजमधील सर्व काम झेपेना. गणितासाठी ते शिक्षक धुंडाळू लागले, आणि

ुंबईस त्यांच्याबरोबरच बी. ए. झालेले धोंडोपंत कर्वे यांस त्यांनी सोसायटीत
ाणले. १८९५ मध्ये सोसायटीवर फार मोठी आपत्ती कोसळली.
ोसायटीवरच नाही तर सर्व महाराष्ट्रावर कोसळली. प्रथम इंग्रजीचे
ख्यात शिक्षक प्रो. केळकर हे मृत्युमुखी पडले आणि दुःखे येऊ लागली
हणजे एकदम येतात हे दाखविण्यासाठीच जणू काय प्रि. आगरकर यांसही
ाळाने उचलून नेले. उदार हृदयाचा, निष्कलंक आचरणाचा, थोर
नाचा, जबरदस्त लेखणीचा, स्वजनहितासाठी तळमळणारा, दारि-
ाची खिजगणती न करणारा असा महापुरुष—सत्पुरुष कोणाला चटका
ावून जाणार नाही! कोणाच्या डोळ्यांतून टिपे गळणार नाहीत?
ाणाचे हृदय फाटणार नाही? तत्त्वासाठी सर्व सहन करणारे बुद्धिप्रधान
ळक, पण तेही रडले. टिळक बुद्धिप्रधान, तर्ककटोर; आगरकर
ी बुद्धिप्रधान, तर्कप्रधान असले तरी त्यांच्या हृदयात ओलावा
स्त दिसे. टिळकांच्या हृदयात जर आपण डोकावू लागलो तर प्रथम
नाचे बुद्धीचे खडक लागावयाचे आणि त्यांच्यावर आपण आदळा-
ाचे. परंतु एकादा खंबीर गडी जर हे फत्तर फोडून खाली पाहील
त्यास सात्त्विक व कोमल वृत्तीचा झुळझुळ झरा तेथे वाहत असलेला
ढळेल. आगरकरांच्या अंतःकरणात बुद्धीच्या दरीतून प्रेमगंगा
ुत होती किंवा प्रेमाच्या दरीतून बुद्धिगंगा वाहत होती; यामुळे दोन्ही
ी आपणांस ताबडतोब दिसत. आगरकरांच्या मृत्यूने टिळकांची
ी फोडून त्यांच्या अंतरंगाचा ठाव घेतला आणि ही हृदयपाताळा-
ऽ गंगा नयनांमध्ये दिसून आली. दोघे झगडले तरी तत्त्वा-
ी झगडले. त्यांनी एकमेकांवर घुसून एकमेकास जखमी केले तरी ते
र्थासाठी नव्हे तर स्वतःला प्राणाहून प्रिय वाटणाऱ्या विचारांच्या
क्षणासाठी. त्यामुळे प्रेम हे थोडेच सुकून जाणार? प्रेम आहे असे
ाविण्यासाठी सामान्य जनांना देवाणघेवाण करावी लागते, परंतु
माणसांचे तसे नसते. दुसऱ्यावर प्रेम आहे असे त्यास दाखवा-
चे नसते; ते त्यांच्या अंतरी मात्र असते. रामतीर्थांनी आपल्या एका
त लिहिले आहे: "आपले म्हणणे असे असेल की, बाह्य व्यवहार—
ोपचार यथास्थित रीतीने न पाळल्यास त्यामुळे प्रेमात कमतरता

येते, तर हे म्हणणे मला बिलकुल पसंत पडत नाही." "बाह्य सन्मानात किंवा व्यवहारात काही न्यूनता किंवा अपूर्णता राहत असली तर तेवढ्याने आपणावरून माझे मन उडाले आहे, अशा प्रकारचे अनुमान बांधू नये." "प्रेम हा आंतरिक संबंध आहे, मग तो वरवर आपणास न का दिसेना." हेच उद्गार टिळक आणि आगरकर यांच्या बाबतीत आम्हांस आठवतात. इतर सर्वांपेक्षा टिळकांचेच आगरकरांवर प्रेम होते. आणि ते खरे शुद्ध, सात्त्विक व निःस्वार्थी प्रेम होते; असो.

आगरकरांच्या मृत्यूने गोपाळराव गोखले फार खचले. परंतु कार्य तडीस नेणे हे पहिले कर्तव्य असल्यामुळे शोकावेग गिळून नवीन माणसे पडलेले काम उचलावयास मिळविण्यासाठी त्यांस खटपट करावी लागली. आगरकरांची जागा शेल्बीसाहेबांचे पट्टशिष्य गोविंद चिमणाजी भाटे यांस संस्थेत आणून त्यांनी भरून काढली. वासुदेवराव केळकरांची जागा योग्य रीतीने त्यांस लवकर भरून काढता आली नाही. परंतु पुढे एक वर्षाने कराचीच्या कॉलेजातील नाणावलेले प्रो. वैजनाथ काशिनाथ राजवाडे हे फर्ग्युसन कॉलेजास मिळाले. याप्रकारे चिपळूणकरांपासून प्राप्त झालेले लोण गोखल्यांनी पुढे चालू केले, आता ते फक्त इतिहास व अर्थशास्त्र या विषयांचेच प्रोफेसर राहिले. आणि या विषयातच त्यांनी अलौकिक प्राविण्य संपादन केले. ते त्यास कसे प्राप्त झाले हे आता आपण पाहू या.

---

# राजकीय शिक्षणाचा काल

गोपाळरावांचा कॉलेजमधील व्याप जसा वाढत गेला तसा त्यांचा बाहेरील व्यापही वाढला. त्यांचा स्वभाव निरलस आणि काही तरी नवीन शिकण्यासाठी उत्सुक असल्यामुळे संस्थेतील वादविवादांनी त्यांचे मन विषण्ण होत असे. ते उठून दुसरीकडे जात आणि काही तरी वाचीत बसत. असें पुष्कळदा होत असे. आगरकरांविषयी त्यांचा आदर दुणावत होता. त्यांची उभयतांची मते जुळत. एकदा रानड्यांच्याजवळ सहज बोलताना अकपट मन, सरळ हृदय, उल्हास व उत्साह, तरुणपणींचा जोम वगैरे गुण गोखले यांच्यात कसे आहेत याचे आगरकरांनी वर्णन केले. न्या. रानड्यांस या तरुणास पाहण्याची इच्छा झाली. १८७० पासून १९०० पर्यंत महाराष्ट्रात राजकीय, धार्मिक व सामाजिक चळवळ करणारे, आशेस पालवी फोडणारे, निराशेचा नायनाट करणारे न्या. रानडे हे प्रमुख होते. ते सरकारी नोकर असले तरी त्यांच्या कार्यांत–लिहिण्यात, बोलण्यात, कॉंग्रेसला जाण्यात व्यत्यय आला नाही. तरुणांचे ते वाटाड्ये झाले. त्यांना स्वतःस जो मार्ग पटला होता तो त्यांनी इतरांस दाखवून दिला. नोकरीत गुरफटून गेल्यामुळे रानड्यांस तितक्या धडाडीने व जोमाने कार्य करिता येत नसे. यासाठी ते नवीन तरुण मंडळीकडे दृष्टी ठेवीत. रामदास हे ज्याप्रमाणे ‘चलाख आणि हुशार मुलगा दिसेल, त्याचे मन वळवून त्याला मजकडे पाठवा; त्याचा गोवा आम्ही उगवू’ असे आपल्या शिष्यास–मठाधिपतीस लिहीत–त्याप्रमाणेच रानडे हेही नवीन जोमदार, स्वार्थत्यागी, प्रामाणिक व बुद्धिमान तरुणांच्या

शोधात असत. आपल्यामागे देशास नेमस्तपणाचे वळण लावणारा कोणी तरी असावा असे त्यांस वाटे. आगरकरांनी गोखल्यांविषयी सांगितल्या-नंतर त्यांनी ही गोष्ट लक्षात ठेविली. एक दिवस त्यांनी आपले मित्र आबासाहेब साठे यांस गोपाळराव गोखल्यांची भेट घेण्यास सांगितले. आबासाहेबांनी भेट घेतली आणि ठरल्या दिवशी रानडयांची ओळख करून दिली. गुरूस शिष्य मिळाला. शिष्यास गुरू लाभला. 'आंतरः को ऽपि' हेतूची एकमेकांस ओळख झाली. शिष्य आनंदून घरी गेला. गुरूचेही मन प्रसन्न झाले. 'गोखल्यांचे पूर्ववयातील गुरू आगरकर तर भर ज्वानीतले गुरू रानडे.' रानडयांच्या जवळ राजकारणाचे धडे घेण्यास शिष्याने सुरुवात केली. पायरीपायरीने गोखले शिकू लागले. पहिल्यापहिल्याने रानडे निरनिराळ्या उताऱ्यांचा त्यांस सारांश लिहून आणण्यास वगैरे सांगत. थोडयाच दिवसांनी ते सार्वजनिक सभेचे सेक्रेटरी व सभेच्या त्रैमासिकाचे संपादक झाले. ते याबद्दल काही एक वेतन घेत नसत. स्वार्थरहित बुद्धीने त्यांनी हे काम केले. सार्वजनिक सभेचा त्या वेळी सर्वत्र बोलबाला होता. सरकारात तिच्या शब्दास मान असे, वजन असे. देशाचे म्हणणे, रयतेच्या तक्रारी, गाऱ्हाणी, नीटपणे मुद्दे काढून सरकारपुढे मांडावयाचे काम सार्वजनिक सभा जितक्या जबाबदारपणे करी तसे इतरत्र होत नसे. हे काम अर्थात रानड्यांचे असे. सर्व विषयांचा त्यांनी सांगोपांग अभ्यास केलेला; विवेचक दृष्टी, समतोल मन, दुसऱ्याच्या अडचणी डोळ्याआड न करू देण्याचा त्यांचा निश्चय, या सर्व गुणांच्या समन्वयामुळे त्यांच्या लिहिण्यास भारदस्तपणा आणि महत्त्व येई. याशिवाय सरकार अमुक एक कायदा करणार आहे अशी कुणकुण समजताच ते तो साधकबाधक रीतीनेच चव्हाट्यावर आणीत, लोकमत तयार करीत आणि ते वेळीच सरकारच्या नजरेस आणीत. सरकारवरील टीका अशा स्वरूपाची असावयाची की, सरकारास ती कबूल करणे भाग पडे. मग सरकार आपली चूक कबूल करो वा न करो. नैतिक दृष्टया सरकारच्या वर्तनाचे समर्थन होऊ शकत नाही हेच त्यांस मुख्यतः दाखवावयाचे असे. सभेच्या त्रैमासिकाचे संपादकत्व जरी गोखल्यांकडे आले तरी रानडेच बहुतेक मजकूर लिहीत. अद्याप गोपाळराव त्यात

लिहिण्यास धजत नसत. सभेचे चिटणीस झाल्यावर जास्त व्यापक प्रश्न त्यांच्यासमोर येऊ लागले; व त्यांचा मार्मिक अभ्यास त्यांस करावा लागे. असा अभ्यास चालला असता एकदा रानड्यांनी त्रैमासिकाकरिता एक लेख लिहिण्यास गोखल्यांस सांगितले. गोपाळरावांनी नीट काळजी घेऊन लेख लिहिला आणि गुरुजवळ आणून दिला. लेख पाहून 'चालेल; द्या छापावयास' असे माधवराव म्हणाले. रानड्यांच्या या होकारदर्शक शब्दांनी गोपाळरावांस किती आनंद झाला असेल याची बरोबर कल्पना आपणांस येणार नाही. त्यांच्या अंगावर मूठभर मांस चढले असेल. त्यांचे मन आनंदले असेल. रानड्यांसारख्या लोकोत्तर व विशाल बुद्धिमत्तेच्या लोकाग्रणीने आपला लेख 'चालेल' असे म्हणावे, हे आपले केवढे भाग्य असे गोखल्यांसारख्या गुरुभक्तिपरायण शिष्यास वाटले असण्याचा संभव आहे. रानड्यांची शिकवणूक खऱ्या गुरूची शिकवणूक होती. पारमार्थिक ज्ञान होऊन शिष्याचे कल्याण व्हावे अशी सद्गुरूची इच्छा असल्यामुळे तो शिष्याची मनोभूमिका जशी प्रथम साफ करतो, तेथील दुराग्रह व कोते विचार बाहेर काढून लावतो त्याप्रमाणेच रानड्यांनी केले. गोपाळरावांचे अद्याप बाह्यलक्ष होते. शिष्य प्रथम बहिर्दृष्टी असतो. सद्गुरु त्यास अंतर्मुख करितो. त्याप्रमाणे केवळ शब्दांवर भिस्त न ठेवता अर्थाकडे ओढा पाहिजे हे रानड्यांनी गोखल्यांस शिकविले. उच्चारांत गांभीर्य व सौंदर्य असावे; भाषेत नटवेगिरी नसावी, अंतःकरण उदात्त असावे. देहाची फार जोपासना नको, परंतु अंतःकरणासाठी देहाची जरूरी आहे आणि देहरक्षणासाठी देहावर कपडे पाहिजेत. पण देहावर कपड्यांचे फार ओझे घातले तर देह भागेल व अंतःकरण दडपून जाईल. त्याप्रमाणे भाषेवर फार अलंकार—उत्तम पोषाख आपण जर घातला तर अर्थाचा जीव घाबरा होतो. रानडे गोपाळरावांस सांगतात की, 'There must be vigour in thought, not in language.' पहिल्या पहिल्याने गोपाळराव बोजड लिहीत. हळूहळू त्यात सुधारणा होत गेली. त्याप्रमाणे कडक भाषा वापरण्याऐवजी भाषा मृदू ठेवून विचार कडक ठेवण्यास ते शिकू लागले. शब्द हे टरफल आहे; आतला दाणा भरदार पाहिजे. शब्द हा शिंपला आहे;

आतील मोती घोसदार पाहिजे. टरफलाकडे आणि शिंपल्याकडे आपण लक्ष देत नाही; मोती आणि दाणा यांस जवळ करितो. हे तत्त्व रानड्यांनी गोपाळरावांस शिकविले. त्याप्रमाणेच जे कांही आपणांस लिहावयाचे वा बोलावयाचे ते मुद्देसूद, सत्याला धरून लिहावयाचे आणि जबाबदारीने काम पार पाडावयाचे. ज्या गोष्टीवर बोलावयाचे त्या गोष्टीची खडानूखडा माहिती करून घेऊन मग जीभ सैल सोडावयाची. रामकृष्ण परमहंस कलकत्त्यातील धर्मोपदेशकांस म्हणत, "तुम्ही परमेश्वर पाहिला आहे का? त्याचा संदेश तुम्हांला मिळाला आहे का? तसे नसेल तर हा उपदेश करण्यास तुम्ही नालायक आहा." 'तुम्ही राजकारणाचा अभ्यास, मनन, निदिध्यास केला आहे का? जमाबंदीचा विचार केला आहे का? देशातील रेल्वे, पाटबंधारे, दुष्काळाची कामे यांची साग्र माहिती करून घेतली आहे का? जर असेल तर लिहा, तरच बोला' असेच रानड्यांचे सांगणे असे. 'उचलली जीभ, लावली टाळ्याला' म्हणजे केवळ 'मुखमस्तीति वक्तव्यम्' होय. तोंड आहे तर बडबडा. परंतु या बडबडीच्या पाठीमागे बुद्धी व विचार यांचा जोर नसेल तर ती बडबड म्हणजे बुडबुडा आहे—क्षणिक आहे. लोकांस, सुज्ञांस ते पटणार नाही व रुचणार नाही. याच्या उलट सर्व शस्त्रास्त्रांनी सिद्ध होऊन तुम्ही लिहाल, बोलाल तर लोकांस आणि सरकारासही ते निमुटपणे ऐकले पाहिजे, त्याचा विचार केला पाहिजे. लॉर्ड बीकन्सफील्ड म्हणत असे की, 'The only way to acquire mastery of public affairs is to study blue-books.' गोखल्यांस निरनिराळी—ग्रीनबुके, रेडबुके, ब्ल्यूबुके, सर्व सरकारी कामांचे रिपोर्ट, आजपर्यंतच्या सर्व कायद्यांची माहिती, मासिके, वृत्तपत्रे, सभांच्या-बैठकींच्या हकीगती सर्वांचे सार काढण्यास रानडे सांगत आणि गोपाळरावांनी ते लिहून आणले म्हणजे ते जर पसंत पडण्यासारखे असेल तर 'चालेल, बरे आहे' असे म्हणत, नाही तर 'ठेवा तेथे' असे म्हणत. ते फार स्तुति करावयाचे नाहीत, टीकाही करावयाचे नाहीत. मागून स्वतः त्यात ते योग्य तो फेरफार करीत किंवा कधी सर्वच निराळे लिहीत. 'राजनीतीचे परिशीलन खडतर तपश्चर्येप्रमाणे गोखल्यांनी रानड्यांच्या

सेवेत राहून केले. माधवरावांच्या बुद्धीचे सर्वांगीणत्व, व्यापकत्व, कुशाग्रत्व, गोखल्यांच्या बुद्धीत कदाचित् नसेल; पण तिचे सर्वस्व एका प्रवाहात आणिल्यामुळे व तिला अल्प अल्प नाना शाखांत वळू न दिल्यामुळे, तिचा लोट अनिवार होऊन तिने गोखल्यांस प्रथम प्रांतिक, मग अखिल भारतीय व अखेर ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत धुरीणाच्या पदास पोचविले आणि शिष्य गुरूपेक्षाही कांकणभर सरस ठरला. या दिव्य अशा भावी यशासाठी आज ते मन लावून आपल्या गुरूजवळ सर्व प्रश्नांचा अभ्यास करीत होते. टाकीचे घाव सोसल्याविना देवकळा येत नाही; एकदम शिखर गाठणे शक्य नसते; चढत गेले पाहिजे. आज परिश्रम केले, खस्ता खाल्ल्या तर त्याचा रमणीय परिपाक पुढे दिसेल; परंतु आज काहीच न केले तर पुढे काय मिळणार ? रानड्यांबरोबर ते आता सर्व देशाच्या भवितव्यतेबद्दल खल करू लागले. १८८५ साली प. वा. ह्यूम साहेब यांच्या पुरस्काराने राष्ट्रीय सभेची स्थापना झाली होती. ह्यूम साहेबांनी पाहिले की, देशात असंतोष माजत आहे. नवीन सुशिक्षितांमध्ये असमाधान आणि चालू परिस्थितीबद्दल त्वेष उसळत आहे. सरकारविषयी संताप आणि दिवसेंदिवस वाढते दारिद्य या दोहोंच्या दलदलीतून कोणकोणते रोग फैलावतील याचा अंदाज ह्यूम साहेबांनी केला आणि वेळीच सावध होऊन भावी रोगांच्या चिन्हावर आजच आपण उपाय शोधू या, असे देशाची नाडीपरीक्षा करणाऱ्या अन्य भिषग्वर्यांना त्यांनी कळकळीने सांगितले. नवीन तरुणांपुढे देशास सुस्थिती जेणेकरून प्राप्त होईल असा मार्ग आपण ठेवू या असे या उदार मनाच्या पुरुषाचे मत पडले. ‘ वसुधैव कुटुंबकम् ’ असे महात्मे प्रत्येक देशात असतात. त्यांतलेच ह्यूम, वेडरबर्न वगैरे महात्मे होत. देशातील सुशिक्षितांचे लक्ष एका विवक्षित प्रश्नावर खिळविण्याचे श्रेय यांनाच आहे. हतबल राष्ट्राला हाताशी धरून ते आपलेच आहे असे समजून, त्याच्यासाठी खटपट करणे यास किती थोर मन लागेल बरे ? ह्यूम साहेबांनी प्रथम १८८३ च्या मार्चच्या पहिल्या तारखेस कलकत्ता विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांस उद्देशून एक जाहीर पत्रक काढले होते. बंगाली तरुणांना कर्तव्याची जाणीव करून देणारा तो जळजळीत उपदेश होता. संघटना करा, यत्न करा, ही सूत्रे त्यात ग्रथित केली

होती. हा उपदेश, हे आव्हान, स्फूर्तिदायक आहे. पुढे या, मागे जाऊ नका असे त्यात मुक्तकंठाने सांगितले आहे. तो उपदेश खालीलप्रमाणे आहे :

" If you the picked men, the most highly educated of the nation cannot, scorning personal case and selfish objects, make a resolute struggle to secure greater freedom for yourselves and your country, a more impartial administration, a larger share in the administration of your own affairs, then we your friends are wrong and your adversaries right, then are Lord Ripon's noble aspirations for your good fruitless and visionary, than at present at any rate, all hopes of progress, are at an end, and India truly neither lacks nor deserves any better government than what she enjoys at present. "

परंतु हा जाहीरनामा बंगालपुरता होता. विवक्षित प्रांतास आता प्रयत्न करावयास सांगण्याऐवजी सार्वराष्ट्रीय प्रयत्न व्हावा असे ह्यूम यांस वाटू लागले आणि शेवटी १८८५ ला राष्ट्रीय सभा स्थापन झाली. रानडे सरकारी नोकर असल्यामुळे त्यांस प्रत्यक्ष कार्यात भाग घेता येत नसे. परंतु ते सर्व बैठकींस विषयनियामक मंडळीत नेहमी जातीने हजर असत, आणि जेथे त्यांस काही चुकत आहे असे वाटे तेथे ते सांगत असत. आपला सल्ला ते वारंवार देत, आणि त्यांच्या खोल व गंभीर उपदेशाचा पुष्कळ फायदा होई.

# राजकीय आयुष्यक्रम

रानड्यांच्या पाठशाळेत गेल्यावर गोखल्यांस हे नवीन धडे शिकावे लागले. राष्ट्रीय सभेची त्यांस ओळख झाली. नवीन बैठकीस कोणते प्रश्न सोडवावे लागतील त्यांचा रानड्यांबरोबर त्यांस विचारविनिमय करावा लागे. १८८५ सालापर्यंत गोखल्यांना सार्वजनिक काम म्हणजे काय व कशाशी खातात हे माहीत नव्हते. १८८५ साली पुण्यात असताना सुद्धा त्यांस रानडे कोण हे माहीत नव्हते. हिराबागेतील सभेच्या वेळी रानड्यांस तिकीट नाही म्हणून त्यांनी अडविले होते. तेच गोखले १८८९ सालच्या कॉंग्रेसमधील पुष्कळ कामाचा बोजा अंगावर घेते झाले. ही बैठक मुंबईस झाली व फार महत्त्वाची अशी झाली. रानड्यांच्या सहवासात असल्यामुळे या सभेचे बरेचसे काम गोखल्यांस करावे लागले. या सभेस प्रख्यात प. वा. चार्लस ब्रॅड्लॉ हे आले होते. ब्रॅडलॉ साहेब हे उदारमतवादी होते. त्यांचे भाषण फार स्फूर्तिदायक झाले. त्यातील एक-दोन वाक्ये येथे दिल्याशिवाय राहवत नाही.

" Those who first enterprised them, were called seditious and sometimes sent to jail as criminals, but the speech and thought live on. No imprisonment can crush a truth, it may hinder it for a moment, it may delay it for an hour but it gets an electric elasticity inside the dungeon walls and it grows and moves the whole world when it comes out. "

जे देशासाठी प्रथम झगडतात त्यांस सरकार द्रोही ठरवील तर ठरवो; परंतु त्यांचे कार्य शेवटी यशस्वी होतेच. हा दिव्य संदेश त्यांनी येथील लोकांस सांगितला. असेच स्फूर्तिदायक उद्गार पुढे टिळकांस शिक्षा झाली तेव्हां त्यांनी काढिले. अशा प्रकारे राष्ट्रीय सभेच्या प्रांगणात १८८९ साली गोखल्यांचा प्रवेश झाला. १८९० साली त्यांनी अर्थ-शास्त्राचा अभ्यास जोराने सुरू केला. अर्थशास्त्रात आकडेशास्त्र फार महत्त्वाचे असते. महाराष्ट्रात रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी हे एक नावाजलेले आकडेशास्त्रज्ञ होते. रानड्यांची व त्यांची मैत्री होती. रानड्यांनी त्यांस लिहिले की, गोखले यांस या विषयाचा अभ्यास करावयाचा आहे. तुम्ही त्यांस मदत करा. १८९० फेब्रुवारी १६ च्या पत्रात रानडे जोशी यांस लिहितात :—

"During the last six Months that he has been working with me. I have formed a very high opinion of his great powers and abilities, his readiness to do his best under all circumstances. He is essentially an honest—intellectually as well as morally—student, and I am sure, you will find in him a worthy collaborator."

रानड्यांच्या सहवासात केवळ राजनीतीचे ज्ञान, अर्थशास्त्राचे अध्ययन, देशाविषयी विचार करण्याची नवीन पद्धती येवढेच त्यांस मिळाले असे नाही तर सर्व गोष्टींस, सर्व गुणांस शिरोभूत जे शील त्याचेही स्वरूप त्यांस कळले. रानड्यांसारखा आत्मनिरीक्षण करणारा दुसरा पुढारी म्हणजे महात्मा गांधी. दुसरा आपणांस उगीच नांवे ठेवणार नाही; तो ज्या अर्थी आपल्यास नांवे ठेवतो आहे त्या अर्थी आपल्यामध्येच उणिवा असल्या पाहिजेत; त्यांचा आपण तलास केला पाहिजे आणि त्या नाहीशा करणे हे आपले प्रथम कर्तव्य होय. दुसऱ्याने नावे ठेविली म्हणून त्याच्यावर जळफळून उपयोग नाही. रानडे हे एकनाथांप्रमाणे खरोखर शांतिसागर होते. गोखले हे स्वभावतः उतावळे, भावनावश, संतापी असे होते. त्यांस लवकर राग येत असे. आपले म्हणणे दुसऱ्याने ऐकले नाही म्हणजे त्यांस संताप यावयाचा.

टीकेने तर ते मृतप्राय व्हावयाचे. कठोर टीका सहन करणारे त्यांचे मन नव्हते. ते करपून जात असे. परंतु रानड्यांचे मूर्तिमंत शांतीचे स्वरूप पाहून गोपाळरावांचा स्वभाव पालटत चालला. रानडे हे आपली स्तुती कधी पाहावयाचे नाहीत तर ज्यात आपली निंदा, टवाळकी हेटाळणी असेल ते आधी पाहावयाचे. मर्मी झोंबणारी टीका असली तरी आपला गुरू किती गंभीर असतो हे गोखल्यांनी अनेक वेळा पाहिले. अपमान झाले तरी ते मनात गिळून पुनः शांत समुद्रासारखा दिसणारा रानड्यांचा चेहरा गोखल्यांच्या हळुवार व गुणग्राही मनावर परिणाम केल्याविना कसा राहील ? गोपाळरावही टीकेस न भिता आपले कार्य चालू ठेवण्यास शिकू लागले. रानड्यांनी ' आपणासारिखे करिती तात्काळ । नाही काळ वेळ तयांलागी । ' हे खरे करून दाखविले. रानड्यांसारखा योग्य वाटाड्या मिळाल्यामुळे गोपाळराव पुढे सरकले. योग्य मार्गदर्शक नसल्यामुळे किती जणांच्या श्रमांचे, बुद्धीचे, उत्साहाचे व तारुण्यातील ' आम्ही काही तरी करून दाखवू ' या जोमाचे, मातेरे झाले असेल ? समुद्राच्या तळाशी कित्येक मोती रुतलेली असतील, परंतु पाणबुड्याने काही मोती वर काढून राजास अर्पण केली म्हणजे तीच तेवढी राजाच्या वक्षःस्थलावर रुळू लागतात त्याप्रमाणे देशातील उमलती फुले जमा करून त्यांना लागलेली कीड नाहीशी करून ती टवटवीत फुले देशमातेच्या केसांत गुंफणारा कोणी तरी चतुर मालाकार लागतो. या मालाकाराच्या अभावी किती तरी फुले सुकली असतील, किडीने खाल्ली असतील ! परंतु गोपाळरावांचे भाग्य थोर म्हणून हृदयातील गुप्त विचार जागे करणारा गुरू त्यांस मिळाला ! तुमच्यामध्ये—तुमच्या अंतःकरणाच्या व डोक्याच्या खाणीत अनेक रत्ने आहेत, ही कल्पना आणून देणारा गुरू गोखल्यांस लाभला. आपण मनांत आणू तर ही रत्ने देशांस अर्पण करू असे गोखल्यांस वाटले. परंतु सर्वांचेच असे थोर नशीब नसते. देवाच्या लाडक्या मुलांसच सद्गुरू प्राप्त होण्याइतके भाग्य लाभते; असो.

१८९० मध्ये राष्ट्रीय सभा कलकत्त्यास भरली होती. या सभेमध्ये गोखल्यांनी एक लहानच पण चटकदार आणि मुद्देसूद भाषण केले. प्राप्तीचा कर ज्या परिस्थितीत निर्माण करण्यात आला होता, ती परिस्थिती

इतउत्तर नसल्यामुळे हा कर रद्द व्हावा, यावर गोपाळराव बोलले होते. हे भाषण सर्वांस आवडलें. गोखले अद्याप लहान—२४ वर्षांचे होते. राजकारणाच्या क्षितिजावर हा नवीन तेजोमय तारा उदय पावत आहे—हा पुढे मोठा मुत्सद्दी होईल असे उद्गार त्यांच्यासबंधी ऐकण्यात येऊ लागले. गोपाळरावांसही धन्यता वाटली. हळूहळू गोपाळराव देशाच्या कारभारात लक्ष घालू लागले. १८९१ च्या नागपूरच्या सभेतही त्यांनी भाषण केले. जे काय आपणांस बोलावयाचे असेल ते आधी समर्पक लिहून काढून मगच ते बोलत. जबाबदारपणे काम करण्यास प्रथम अशीच शिस्त लावून घ्यावी लागते. गोपाळरावांस ही शिस्त उत्तम लागली आणि ती त्यांनी शेवटपर्यंत पाळली. भाषा कशी असावी, विचार कसे असावेत याचाही रानड्यांजवळ त्यांनी अभ्यास केलाच होता.

आयर्लंड वगैरे देशांनी आपआपल्या पुनरुज्जीवनार्थ अंगीकारिलेले मार्ग हिंदुस्थानात शक्य नाहीत—अडवणूक येथे चालणार नाही; करताच येणार नाही. देशात नाना प्रकारचे, नाना पंथांचे, नाना धर्मांचे, नाना मतांचे व नाना संस्कृतींचे लोक आहेत. आपला देश म्हणजे लहानसे खंड आहे. आयर्लंडसारख्या चिमुकल्या एकजिनसी निर्भेळ राष्ट्रात जे शक्य होत नाही ते या अफाट देशात सुतराम अशक्य आहे असे रानड्यांचे मत होते. आपल्या लोकांस अद्याप नवीन राज्यपद्धती समजलीही नाही. परिस्थितीचे ज्ञान नाही. ज्यांच्याशी आपणांस झगडावयाचे ते प्रवळातील प्रबळ राष्ट्र. एक चतुर्थांश जग आज त्यांच्या सत्तेखाली. तेव्हा बंडाचे, अत्याचाराचे मार्ग मनात आणू तरी ते आत्मघातकीच ठरणार, या सरकारशी त्याच्याच शस्त्रांनी लढले पाहिजे. त्याच्याच पद्धतीने आकडे मांडून, परिस्थिती समजाबून देऊन, लोकांस सुशिक्षित करून, जागे करून, त्यांस वळण देऊन, त्याचे मत सरकारास पटवून देऊन, सरकारला त्याची चूक दाखवावयाची आणि ही चूक सुधारा असे सर्व जनेतच्या पाठिंब्याच्या जोरावर सरकारास सुचवावयाचे. आपण विचार करीत, स्वतःची सुधारणा करीत करीत, लोकांस शिक्षण देत देत, सरकारजवळ मागावयाचे आणि मागत असता सुधारणा चालू ठेवावयाची. लोकांस एकदम क्षुब्ध करून काय होणार ? लेकांत जोम

आहे, धैर्य, धाडस, पराक्रम आहे– ठीक आहे तर. आपण मृत नाही आता काम इतकेच की हा जो जोम आहे त्यास योग्य मार्गास लावावयाचे नाही तर हा जोर ऊतू जाईल आणि निरुपयोगी होईल. लोकांत भावना पाहिजेत परंतु त्या भावनांस वळण लावले पाहिजे. त्या भावनांस वळण न देता पेटविणे म्हणजे सर्वत्र आगडोंब उडून सर्व सुखाची राखरांगोळी करणे होय, असे रानडयांनी शिकविले. ही शिकवण गोखल्यांनी आपलीशी केली आणि हेच धोरण त्यांनी कायम ठेविले. रास्त मार्गाने झगडणे पूर्वापार व दूरवरचा विचार करून झगडणे हेच श्रेयस्कर ठरते. आपल्या गुरूने जो मार्ग दाखविला त्याच रुळलेल्या मार्गाने गोखले गेले आणि आपल्या सर्व शक्ती त्यांनी खर्च केल्या. नेमस्तपणा हे त्यांच्या निशाणावरील वाक्य होते. ' हळूहळू शिकवावे ' हे समर्थांचे सूत्र त्यांनी जास्त आचरणांत आणले. घिसाडघाई नको, जे करावयाचे ते विचाराने, मागेपुढे पाहून करा, हा रानडयांचा उपदेश गोखले विसरले नाहीत. १८९२ मध्ये पहिले राजकीय हक्क हिंदुस्थानास मिळाले, आणि कौन्सिलमध्ये फार अल्प म्हणजे जवळ जवळ नाहीच अशी सुधारणा झाली. १० जुलै १८९२ रोजी आनंदोद्भव नाटकगृहात दादाभाई यांस मानपत्रे देण्यासाठी सभा भरली होती. सभेस रा. ब. गोपाळराव देशमुख, के. एल्. नूलकर वगैरे मंडळी जमली होती. गोखले यांनी मानपत्रे वाचून दाखविली; नंतर ती विलायतेत ददाभाईंकडे पाठविण्यात आली.

१८९३ मध्ये डिग्बीसाहेब पुण्यास आले होते. त्यांसही मानपत्र दिले. ते गोखले यांनी वाचून दाखविले.

दादाभाईंच्या खटपटीने ब्रिटिश पार्लमेंटात मि. हर्बर्ट पाल यांनी २ जून १८९३ मध्ये असा ठराव मांडला की— "That all open competitive examinations heretofore held in England alone for appointment to the civil services of India shall henceforth be held simultaneously both in India and England, such examinations in both countries being identical in their nature and all who compete, being finally classified in one list according to merit." या ठरावास ग्लॅडस्टन यांनी पुष्टी दिली. सभासद थोडेच हजर होते.

८४ विरुद्ध ७६ मते पडून ठराव पास झाला. दादाभाईंचा आनंद गगनात मावेना, परंतु या जाहीरनाम्यामुळे अँग्लोइंडियनांनी एकच कोल्हेकुई उठविली. परंतु या ठरावास पुष्टी देण्यासाठी एतद्देशीयांच्या सभा भरल्या आणि ठराव पास झाले. १५ जुलै १८९३ रोजी मुंबईस प्रेमजी कावसजी इन्स्टिटयूट-मध्ये जाहीर सभा भरली होती. फेरोजशहा हे अध्यक्ष होते. या समयी गोखलेही मुंबईस गेले होते आणि त्यांनी तेथे भाषणही केले. सोसायटी-मधली कामे संभाळून गोखले बाहेरची कामेही करू लागले. १८९४ साली ते रानड्यांबरोबर मद्रासला गेले होते. कॉंग्रेसमध्ये गोखल्यांनी भाषण केले होते. टिळकांनीही त्याच विषयावर भाषण करून गोखल्यांच्या म्हणण्यास पुष्टि दिली. ज्या प्रश्नावर टिळक आणि गोखले कॉंग्रेसमध्ये एकमेकांच्या विरुद्ध नव्हते असा हा अलौकिक प्रसंग होता. परंतु पुढे असा प्रसंग कधीही आला नाही. दोघांचे मार्ग निरनिराळे झाले आणि दोघांस एकमेकांविरुद्ध झगडावे लागले. १८९४ सालीच रानड्यांचा अपमान करणाऱ्या गोऱ्या साहेबाची गोष्ट घडून आली. एका अधिकाऱ्याने रानड्यांचे सामान डब्यातून बाहेर फेकून दिले. त्यास पुढे समजून आले की, आपण ज्यांचे सामान फेकले तो राणीसरकारच्या न्यायमंदिरांतील न्यायाधीश आहे. पुणे स्टेशनवर हा साहेब रानड्यांकडे माफी मागण्यासाठी येत होता. रानड्यांनी हे पाहताक्षणीच आपले तोंड वळविले आणि हा प्रसंग येऊ दिला नाही. गोखल्यांनी या वागणुकीचे मर्म रानड्यांस विचारिले. रानडे गंभीरपणाने व शांत मनाने म्हणाले, "युरोपियन अंमलदाराने अपमान केला तर आपण रागावतो; पण आपण स्वजनांतल्या काही वर्गांशी ब्राह्मण्याच्या तोऱ्यात किती उर्मट-पणाने व अपमानकारक रीतीने वागतो याचा विचार करीत नाही." गोपाळराव या उत्तराने चकित झाले. नेहमी आत्मनिरीक्षण करावयाचे हा रानड्यांचा दैवी गुण किती लोकांच्या मनांत असेल? लोकांस नावे ठेविताना आपले वर्तन धुतल्या तांदळासारखे आहे असे कितीजणांस छातीवर हात ठेवून सांगता येईल? येशूने सांगितले, 'जो निष्पाप असेल, त्यानेच त्या बाईला दगड मारावा.' एकही हात वर झाला नाही; एकाही माणसास दगड मारण्याचे धैर्य झाले नाही. बायबलातील या गोष्टीप्रमाणेच

आपणा सर्वांची स्थिती आहे. लोकोत्तर दानत फारच थोड्यांत सापडावयाची. मानापमानाचे गाटोडे बाजूस ठेवणारा एखादाच. ' आपणास चिमोटा घेतला। तेणे कासावीस झाला। आपणावरून दुसऱ्याला। राखीत जावे ' हा समर्थांचा अमोल उपदेश वाचणारे असतील, परंतु आचरणात आणणारे किती हरीचे लाल सापडतील? अशा गुरूच्या सहवासाने गोखल्यांस किती तरी धडे शिकता आले असतील. त्यांचा स्वभाव रागीट असे. सांगितलेले काम वेळच्या वेळी झाले नाही म्हणजे ते संतापावयाचे. परंतु पुढे पुढे जरी ते संतापले तरी नोकरास बोलावून त्यास पुनः सांगत ' मी बोललो; वाईट केले. परंतु तू मनात वाईट वाटून घेऊ नकोस. ' त्यांच्या डोळ्यांपुढे अशा वेळी रानड्यांचे उदाहरण असे. आपल्या पतित व अस्पृश्य मानलेल्या लोकांचा उद्धार करण्याची स्फूर्ती अशाच उदाहरणावरून त्यांस होई. आणि मी अस्पृश्यांसाठी अखंड प्रयत्न करीन अशी अट भारतसेवक समाजातील सभासदांस मान्य करावी लागे. सर्व लोकांसाठी गोखल्यांचे अंतःकरण हळहळे यास कारण रानडेच होत. रानड्यांस ह्यूम साहेबांसारखे काँग्रेसचे जनक ' महादेव ' ( मोठा देव ) मानीत यास केवळ त्यांची विद्वत्ता व कुशाग्रबुद्धीच कारण नसून त्यांचे ' दया, क्षमा, शांती ' हे लोकोत्तर गुणच विशेष कारणीभूत झाले असतील. रानड्यांची ही थोरवी पाहिली म्हणजे त्यांच्या चरणापाशी बसून ज्याने धडे घेतले त्याच्या भाग्याची कल्पना येते व आपणांस तर हेवा वाटतो. ' It is no exaggeration to say that younger men, who come in personal contact with him felt as in a holy presence, not only uttering ' nothing base ' but afraid even of thinking unworthy thoughts, while in his company. The only other man, who had exercised a similar influence upon me in my experience is Mr. Dadabhai. ' असे उद्गार गोखल्यांनी रानड्यांबद्दल, दादाभाईबद्दल आणि पुढे महात्मा गांधींची भेट झाल्यावर काढले ते उगाच नव्हत. खरोखरच त्या पवित्र वातावरणात गेले की, आपल्या कुत्सित कृपण विचारांचा मागमूस सुद्धा राहत नाही. आपण मुके बनतो आणि त्या थोर पुरुषांच्या चरणांकडे पाहत राहतो.

मनाची आणि बुद्धीची या प्रकारे उन्नती होत होती. आता १८९५ साल उजाडले. या वर्षी कामाचा बोजा संस्थेतही पुष्कळ पडला व बाहेरही कामाने आ पसरला होता. कामास गोपाळराव ना कधीच म्हणावयाचे नाहीत; शरीराकडे सुद्धा पाहावयाचे नाहीत. हे काम रेटण्यास ते पुढे सरसावले.

प्रथम ४ मे १८९५ साली बेळगावास आठवी प्रांतिक परिषद भरली होती. या सभेत फेरोजशहा मेथा यांच्या अभिनंदनासाठी ठराव गोपाळरावांनीच मांडला. मेथा हे हिंदुस्थानात गाजलेले, नावाजलेले पुढारी. मुंबई म्युनिसिपालिटीचे ते जीव की प्राण. हिंदू लोकांस म्युनिसिपल कामे कशी चोख व उत्तम रीतीने करिता येतात हे त्यांनी सरकारास दाखविले. त्याप्रमाणेच ते वरिष्ठ कायदे कौन्सिलात व प्रांतिक कायदे कौन्सिलात खडेतोडपणे आपले म्हणणे मांडीत. ते सरकारास वाकून नसत. या वर्षी विशेषतः त्यांनी कलकत्ता येथील वरिष्ठ कायदे कौन्सिलात हिंदूंची बाजू सावरून धरिली. सिव्हिल सर्व्हंट हेच हिंदुस्थानचे राज्य करण्यास लायक अधिकारी आहेत असे सरकारी गोऱ्या सभासदांनी म्हणताच फेरोजशहांनी सिव्हिल सर्व्हंटांचे सर्व दोष चव्हाट्यावर मांडले. सर जेम्स वेस्टलंड यांच्या अंगाची तर आग उडाली. मेथा हे कौन्सिलमध्ये नवीन धोक्याचे वारे आणीत आहेत अशी त्यांनी तक्रार केली. परंतु असल्या 'गोमायुरुतां'ना 'केसरी' भीक घालीत नसतो. मेथा त्यांस उत्तर देण्याच्या भानगडीतच पडले नाहीत. कौन्सिले ही काही सरकारच्या होयबांसाठी नाहीत हे ह्या सर बहादुरांस समजले पाहिजे होते. कलकत्त्याच्या स्टेट्स्मनने मेथांच्या वर्तनाचा गौरव केला. कलकत्त्यास डब्ल्यू. सी. बानर्जी यांच्या अध्यक्षतेखाली मेथांचे त्यांच्या धैर्याबद्दल अभिनंदन करण्यात आले. मद्रासकडच्या एका वर्तमानपत्रकर्त्याने मेथांच्या भाषणाबद्दल म्हटले आहे की, 'He returned argument for argument, invective for invective, banter for banter and ridicule for ridicule.' सर्व हिंदुस्थानात मेथांचे अभिनंदन झाले. बेळगावासही ते झाले. गोखल्यांचे लहानच पण सुंदर भाषण झाले. गोखल्यांस मेथांबद्दल फार आदर वाटे. ते अद्याप नवशिके होते. निरनिराळ्या राजकारणी

पुरुषांची ते ओळख करून घेत होते; त्यांच्या पद्धती समजून घेत होते. मथांच्या अचूक धोरणाची, निःस्पृहतेची, बाणेदारपणाची, अप्रतिम कोटिक्रमाने प्रतिपक्षास चीत करण्याच्या त्यांच्या कौशल्याची कोण तारीफ करणार नाही? ते राजकारणात नेमस्त पक्षाचे होते. योग्य प्रसंगी सरकारास तडाखा द्यावयास ते माघार घेणार नाहीत अशी लोकांची समजूत होती. अशा पुरुषाचे अभिनंदन गोखल्यांनी गोड व मार्मिक शब्दात केले. ते म्हणतात, ‘ To my mind it has always appeared that Mr. Mehta is to a great extent a happy combination of the independence and strength of character of Mr. Mandlik, the lucidity and culture of Mr. Telang and the originality and wide grasp of Mr. Ranade. ’ फेरोजशहांसारखा उत्कृष्ट वादविवादपटु कौन्सिलमध्ये त्यांच्यानंतर क्वचित्‌च झाला; असो. गोपाळरावांचा प्रांतिक सभेशी संबंध १८८८ पासूनच आला होता. पहिल्या प्रांतिक सभेचे तेच सेक्रेटरी होते. हे काम त्यांनी चार वर्षे केले आणि पुढे ते वाच्छांबरोबर राष्ट्रीय सभेचे सेक्रेटरी झाले. १८९५ च्या राष्ट्रीय सभेचे ते एक सेक्रेटरी होते. वाच्छा हे जनरल सेक्रेटरी होते. स्थानिक सेक्रेटरी १८९५ मध्ये टिळक आणि गोखले होते. सभा त्या वर्षी पुण्यास भरावयाची होती. ही राष्ट्रीय सभा पुण्यास भरवून पुण्याचा लौकिक वाढवावा, सभा उत्कृष्ट रीतीने पार पडावी असे रानड्यांना वाटत होते. परंतु भवितव्यतेच्या मनात निराळेच विचार घोळत होते. पुण्यात वादविवादाने, भांडणांनी एकच रणधुमाळी माजली आणि याच्या कारणाच्या शोधनार्थ आपणांस थोडे पाठीमागे गेले पाहिजे.

आजपर्यंत असे होत असे की, जेथे राष्ट्रीय सभा भरत असे त्याच ठिकाणी सामाजिक परिषदही भरे. सामाजिक परिषदेसाठी निराळा मंडप वगैरे घालावा लागत नसे. यंदा पुण्यास राष्ट्रीय सभा भरावयाची होती, तेव्हा सामाजिक परिषदही राष्ट्रीय सभेच्या मंडपातच भरणार असे बहुतेक निश्चित झाले होते. राष्ट्रीय सभा म्हणजे सर्व राष्ट्राची सभा होय. सर्व राष्ट्राचे त्यात मत पाहिजे; मूठभर लोकांची ही मजलस नाही हे सरकारास दाखविले पाहिजे, हा यंदाचे स्थानिक सेक्रेटरी टिळक यांचा

विचार होता. विशेषतः ज्या शहरी सभा भरवावयाची तेथील तरी सर्व लोकांची राष्ट्रीय सभेस सहानुभूती अवश्य पाहिजे असे त्यांचे मत होते.

पुण्याची स्थिती इतर शहरांहून फार निराळी. पुणे ही पेशव्यांची राजधानी. ब्राह्मण्याची पुणे ही आश्रयभूमी. जुन्या परंपरेचे, जुन्या चालीचे, जुन्या धर्मकल्पनांचे भोक्ते येथील बहुतेक लोक. या जुन्या परंपरेतील लोकांचे असे मत पडले की, जर सामाजिक परिषद् ही राष्ट्रीय सभेच्याच मंडपात भरेल तर सर्व राष्ट्रीय सभावाले सामाजिक परिषदेच्या मताचेच आहेत असे जगजाहीर होईल. ' परंतु आम्हांस राजकीय अधिकार पाहिजे आहेत. आमची राजकीय सुधारणा झाली पाहिजे, धार्मिक सुधारणेत लुडबुडण्याचे, जुन्या थोर पूर्वजांनी घालून दिलेल्या धर्माच्या बाबतीत अमुक सुधारणा करा, तमुक सुधारणा करा अशी हुल्लड उठविणारे आणि मनुयाज्ञवल्क्यांच्या पदवीस झोंबू पाहणारे जे लोक आहेत त्यांच्याशी आम्हांस काही एक कर्तव्य नाही; त्यांचा आमचा या विचारात काडीचा संबंध नाही असे जगजाहीर करण्यासाठी दोन्ही सभा निरनिराळ्या ठिकाणी भरवा. ' असे या जुन्या पक्षाच्या लोकांचे म्हणणे पडले. ' आम्ही राष्ट्रीय सभेच्या कार्यासाठी वर्गणी देऊ, सामाजिक परिषदेबद्दल आमची सहानुभूती यत्किंचितही नाही ' असे हा वर्ग स्पष्टपणे म्हणे. याच्या उलट दुसरा सुधारकी पक्ष असे म्हणू लागला की, जर सामाजिक परिषद राष्ट्रीय सभेच्या मंडपात भरू देणार असाल तरच आम्ही वर्गणी देऊ, नाही तर साफ देणार नाही. खरे पाहिले तर राष्ट्रीय सभा सामाजिक परिषदेपेक्षा महत्त्वाची. दोन्ही गोष्टी निरनिराळ्या होत्या. म्हणूनच दोहींची अधिवेशने निरनिराळी भरत. तेव्हा केवळ राष्ट्रीय सभेसाठीच असेल तर आम्ही वर्गणी देणार नाही असे म्हणणाऱ्यांवर टिळक यांनी कॉंग्रेसचे द्रोही असा आरोप ठेविला तो रास्तच होता. जेव्हा टिळकांनी सुधारकी व अतएव सुशिक्षित समजल्या जाणाऱ्या या चमूचे हे मतकृपणत्व पाहिले तेव्हा त्यांनी जुन्या मताच्या लोकांस उचलून धरले. वास्तविक वैयक्तिक दृष्ट्या टिळक भांडले नसते. सामाजिक परिषद कोठेही भरवा; त्याबद्दल त्यांनी येवढा विरोध केला नसता. परंतु आपलेच म्हणणे धरून एका प्रामाणिक पक्षाला धूडकावून लावू

पाहणारा हा जो सुधारकी मेळा त्याचा त्यांना फार राग आला. राष्ट्रीय सभेस सुधारक पाहिजेत तसे जुन्या परंपरेचे लोकहि पाहिजेत. तिच्यासाठी सर्वांनी आधी धावून गेले पाहिजे. असे असता सामाजिक परिषदेबद्दलचा कांगावा करून राष्ट्रीय सभेवर रुसणाऱ्या या सुधारणावाद्यांच्या सोंगावर टिळकांनी कोरडे ओढले. राष्ट्रीय सभा सर्व मतांच्या लोकांची आहे हे स्पष्ट झाले पाहिजे. परंतु कॉंग्रेसची सूत्रे सुधारक पक्षाच्या हातांत; रानडे, गोखले, मुंबईचे मेथा, वाच्छा वगैरे लोक सर्व सुधारक. आपलेच म्हणणे धरून बसणारे हे लोक. रानडयांनी या वेळेस सावध होऊन राष्ट्रीय सभेच्या मतैक्यासाठी हा प्रश्न सोडविण्यास लागले पाहिजे होते. परंतु रानडयांनी कांही एक केले नाही. गोष्टी कोणत्या थरावर जातात याचीच ते वाट पहात बसले. टिळकांनी सेक्रेटरीशिपचा राजिनामा दिला. तेव्हा या विरुद्ध पक्षाच्या लोकांस संशय वाटला. टिळकपक्षाचे लोक कॉंग्रेसच्या मंडपास आगसुद्धा लावण्यास मागेपुढे पाहणार नाहीत अशी कंडी उठली, ती या लोकांनीच उठविली असली पाहिजे. गोखले पडले भोळे. त्यांना ही हूल खरी वाटली आणि उतावीळपणाने त्यांनी वाच्छांस तार केली की असे असे आहे तरी ताबडतोब या. जणू वाच्छा येऊन शहानिशा करणार होते! वाच्छास स्टेशनवर पुष्कळ मंडळी सामोरी गेली आणि वाच्छांस 'हे सर्व खोटे आहे; आपण का येण्याची तसदी घेतली?' असे प्रश्न लोकांनी विचारले. वाच्छांस गोपाळरावांच्या उतावीळपणाची कल्पना आली.

शेवटी हा मंडपाचा वाद नियोजित अध्यक्ष सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्या कानांवर गेला. त्यांनी असे कळविले की, जर पुण्याच्या लोकांचे एकमत होत नसेल तर आपण अध्यक्ष होण्यास तयार नाही. धोंडा बरोबर लागला. रानडे जागे झाले. जी गोष्ट आधीच झाली पाहिजे होती ती दिरंगाईवर व 'पाहू या काय होते ते' अशावर टाकण्यात आली होती. परंतु सोनाराने परस्पर कान टोचले म्हणजे दुखत नाहीत, किंवा नाक दाबले म्हणजे तोंड उघडते तद्वत झाले. सभा व सामाजिक परिषद वेगवेगळ्या ठिकाणी भरण्याचे ठरले. या सुधारकपक्षाने पोलिसांस सुद्धा वर्दी देऊन ठेविली होती की, कदाचित् आम्हांस मदत लागेल! जणूं टिळक बंडच करणार होते. परंतु सभा नीटपणें पार पडली आणि दंग्याधोप्याची भीती अवास्तव ठरली.

पुष्कळ लोक टिळक क्षुल्लक गोष्टीसाठी भांडले असा त्यांच्यावर आरोप करितात. सामाजिक परिषदेसाठी निराळी तयारी करावयाची म्हणजे पुनः आला नवीन खर्च; काँग्रेसचा मंडप मिळता तर त्यातल्या त्यात भागून गेले असते. असाही या लोकांचा एक मुद्दा असतो. परंतु जनमतापेक्षा पैशाची जास्त मातब्बरी नाही. आणि ज्यांस सामाजिक सभा भरवावयाची होती त्यांस जर फार उमाळा होता तर त्यांनी त्यासही निराळी वर्गणी दिली पाहिजे होती. स्वार्थत्यागाशिवाय मत मात्र मिरवावयास पाहिजे हे कसे चालेल ? बहुजन समाजास बरोबर घेऊन जाणे हे राष्ट्रीय सभेचे काम. ती राष्ट्रीय आहे, विवक्षित पंथाची नाही. सर्व लोकांस ज्यांची दरक्षणी जरूर भासते अशा हक्कांसाठी राष्ट्रीय सभा आहे. हजारो वर्षें चालत आलेल्या धर्मांचा विचार करणे हे लोकांस कसेसेच वाटते. 'आपल्या पायाखाली काही जळत आहे' असे लोकांस खरोखरच वाटत नसे. वाटत असते तर त्यांनी विझविण्याचा प्रयत्न केलाच असता. आपल्या डोक्यावर जे आज सरकारचे छत्र आहे त्याने मात्र छाया होत नसून डोक्यावर आगच पाखडली जात आहे हे या जुन्या लोकांसही पटले होते आणि प्रत्यक्ष अनुभवास आले होते. या लोकांस राष्ट्रीय सभेंतच फक्त यावयाचे होते. त्यास वगळून कसे चालणार ? ही विचारसरणी रास्त आहे; न्याय्य आहे. सामाजिक सुधारणेचे स्तोम माजविणाऱ्यांस ती दिसणार नाही व दाखविली तरी पटणार नाही हे आम्ही जाणून आहो. टाइम्समध्ये २ नोव्हेंबर १८९५ रोजी एक पत्र प्रसिद्ध झाले होते. हा पत्रलेखक वरील मताचाच अनुवाद करितो. तो म्हणतो—"The Congress eventually aims at being a congress of the people and the object cannot be achieved unless every year an effort is made to approach more and more the classes that have not taken hitherto much interest in the movement. One party wishes to draw to the Congress as large a portion of the public as it possibly can irrespective of the question of social reform; the other does not wish to go much beyond the circle of the friends of reform." सुधारणावादी लोकांस जनतेस

बरोबर घेऊन जावयास नको होते. ते अलग वागत. डेमॉक्रसीचे महत्त्व त्यांस तात्त्विक दृष्ट्या कळे परंतु ते त्यांस व्यवहारात (पटत नसे) आणता येत नसे. टिळक हे नेहमी लोकांस बरोबर घेऊन जावयाचे. बरोबर नेताना त्यांस शिकवावयाचे व शिकवीत शिकवीत बरोबर न्यावयाचे. यास सवंग लोकप्रियता असे उपहासास्पद नाव कित्येकांनी दिले असले तरी ते वस्तुतः भूषणच आहे. ही गोष्ट २० डिसेंबर रोजी – काँग्रेसच्या आधी ५–६ दिवस – काँग्रेससाठी शहरातर्फे प्रतिनिधी निवडावयासाठी भरलेल्या सभेत दिसून आली. सभेस जागा अगदी लहान योजून आयत्या वेळी सभा जाहीर केली. परंतु ही युक्ती सफळ झाली नाही. तेथे जुन्या मताचे लोकांचा सर्व समाज लोटला व त्यांनी स्वतःस पसंत असा अध्यक्ष निवडला. हे सर्व पाहून गोखले व इतर १५ इसम सभा सोडून चालते झाले; हा थोडा कमकुवत-पणाच होता. टिळकांवर जो लोकच्छंदानुवर्तित्वाचा आरोप करण्यात येतो तसाच आरोप प्रख्यात पंडित हक्सले हा, विख्यात इंग्लिश राजकार्यधुरंधर जो ग्लॅडस्टन, त्याच्यावर करीत असे. तो म्हणे, He is a man with the greatest intellect in Europe and yet he debases it by simply following majorities and the crowd." परंतु हे लक्षात ठेवणे जरूर आहे की, टिळक, ग्लॅडस्टन यांसारखे पुढारी लोक केवळ जनतेच्या मताप्रमाणे चालत नसतात. ते त्यास शिकवीत तर असतातच परंतु हळू हळू त्यांच्या मनांत भरवीत, त्यांच्याशी मिळते घेऊन, मिळते घेतानाही आपला उद्देश सिद्धीस जातो आहे हे पाहून हे लोक पाऊल टाकतात; फटिंगपणे वागणे म्हणजे लोकप्रिय होणे नव्हे.

या वर्षीची दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे सार्वजनिक सभा रानडे पक्षाला सोडावी लागली ही होय. १८८९ पासून सार्वजनिक सभेत रानड्यांचे म्हणणे म्हणजे वेदवाक्य असे समजले जात असे. १८९५ साली टिळक हे बहुमताने सार्वजनिक सभेचे पुढारी झाले. या गोष्टीने जुन्या रानडे पक्षाच्या नाकाला मिरच्या झोंबल्या. गोखले हे नव्या–जुन्यांची दिलजमाई करयाचा प्रयत्न करू लागले. परंतु तो दिलजमाईचा प्रयत्न नसून नवीन पक्षाचा अपमान करण्याचाच पर्याय होता. त्यांनी टिळकांना अशा तऱ्हेच्या अटी सांगितल्या की, त्या बहुमतवाल्यांस

पसंत पडल्या ना. गोखल्यांस आपण अल्पसंख्याक आहो हे या वेळी माहीत होते. असे असूनही त्यांनी खालील अटी घालाव्या ही गोष्ट अनुचित वाटते. त्या अटी अशा—( १ ) सभेच्या कार्यकारी-मंडळीत दोन्ही पक्षांचे सभासद असावे. ( २ ) अध्यक्ष आहे तोच म्हणजे जुन्या पक्षाचाच असावा. ( ३ ) दोन सेक्रेटरींच्या ठिकाणी या वर्षापासून तीन असावे, आणि त्यांतील दोन जुन्या पक्षाचे आणि एक नवीन पक्षाचा असावा. टिळकांचे महत्त्व दृष्टीआड व्हावे एतदर्थ हा प्रयत्न होता. हा प्रयत्न अर्थातच निष्फळ झाला. आता टिळकांचे मताधिक्य होणार हे पाहून त्यांच्या जवळ काम करावे लागणार या भीतीने रानडे पक्षाचे लोक सभा सोडून जाण्यास तयार झाले! आणि टिळकांस आयत्या बिळावर नागोबा असे म्हणू लागले! परंतु आजपर्यंत सार्वजनिक सभेत आपले मताधिक्य नव्हते म्हणून टिळक दुसऱ्या सभा काढण्याच्या भरीस पडले नाहीत. पार्लमेंटमध्ये आपले मताधिक्य होत नाही म्हणून कोणी नवीन पार्लमेंट स्थापीत नाही, आणि नवीन येणाऱ्या मंत्रिमंडळास कोणी आयत्या पिठावर रेघा ओढणारे असे अपमानास्पद दूषणही देत नाही. टिळकांस मिळते व्यावयास नको असे म्हणणारे व हा कांगावा करणारे जे नेमस्तपक्षीय लोक त्यांसच खरोखर माघार घेणे, आपली मते बहुमतापुढे मागे घेणे, कधी माहीत नव्हते. नबाबशाही त्यांस पाहिजे असे. ती दुसरी नोकरशाहीच होती; लोकशाही नव्हती, ही गोष्ट कॉंग्रेसच्या वेळी सिद्ध झाली आणि या वेळेसही सिद्ध झाली.

जुनी सभा सोडून नवीन सभा स्थापण्यास आता रानडेपक्षाचे लोक कारणे शोधू लागले आणि ज्या नावांनी हिंदुस्थानच्या राजकीय चळवळीत खळबळ उडाविली ती नावे जन्मास आली. टिळकपक्ष हा जहाल पक्ष आहे; आमचा पक्ष नेमस्त पक्ष आहे; दोघांचे जमणे अशक्य, म्हणून हा सवता सुभा आम्हांस काढणे भाग आहे असे या रानडे-पक्षाच्या लोकांनी जाहीर केले. आजपर्यंत नेमस्तपक्षाचा वरचष्मा होता तेव्हा अल्पसंख्याक पक्षाने आत्मघातकी, पक्षभेदाची चळवळ केली नाही. एका घरात भांडणे असू देत. जो मताने अधिक त्याचे खरे ठरेल. परंतु निरनिराळी घरे बांधून भांडणे म्हणजे सरकारास आपल्यातील

भिन्नता आणि विरोध दाखविण्यासारखे आहे. परंतु आपलेच शेवटास नेऊ पाहणारे जे हे नेमस्त बंधू त्यांनी मात्र आता निराळी सभा स्थापण्याचे ठरविले, आणि १८९५ च्या नोव्हेंबर महिन्यांत डेक्कन सभा स्थापन केली. आपले महत्त्व कमी होणार असे दिसताक्षणीच हे नवीन अपत्य निर्माण करणाऱ्या रानड्यांवर टिळकांनी ' हा म्हातारचळ की पोरखेळ ? ' हा अग्रलेख लिहून खरपूस टीका केली. नेहमी मिळते व्यावयास खरोखर टिळकच तयार असत, परंतु ते बहुमत लाथाडीत नसत. आजपर्यंतच्या राष्ट्रीय सभा जरी नेमस्तांनीच भरविल्या तरी राष्ट्रीय सभेचा महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात शिरकाव टिळकांनीच केला. ते असे नाही म्हणाले, की या मवाळ मताच्या काँग्रेसचा आपण पुरस्कार का करावा. ते आपले मताधिक्य वाढविण्याची खटपट करीत होते. ही खटपट प्रत्येक पक्ष करितोच. काँग्रेस म्हणजे काही मवाळास मिळालेली सनद नव्हे. देशामध्ये ज्या वेळेस जे जनमत असेल–जे बहुमत असेल ते सरकारास स्पष्टपणे कळविण्यासाठी काँग्रेसचा जन्म आहे. परंतु बहुमताचा वास ज्यांस सहन होत नाही त्या आमच्या रानडेपक्षीयांनी दुसऱ्या पक्षाचे बहुमत झाले असे पाहताच सवता सुभा स्थापावा आणि राजकारणात नेमस्त आणि जहाल असे पक्ष पाडावे हे अनुचित होय. टिळक म्हणत : " सामाजिक सुधारणेत ' नेमस्त आणि जहाल ' असे पक्ष होऊ शकतील; परंतु हिंदुस्तानच्या राजकारणात ' नेमस्त आणि जहाल ' हे आपणांस समजत नाही. परकी सरकारच्या लोखंडी रुळाखाली सर्व सारखेच चिरडले जातो आहो. या चरकातून सर्वच चिपाडे होऊन बाहेर पडणार. टिळकपक्ष सरकारास–प्रचलित राज्यपद्धतीस–नामशेष करण्यासाठी झटणार आणि रानडेपक्ष त्याचा उदोउदो थोडाच करणार आहे ? ध्येय जर एक आहे तर त्या ध्येयासाठी बहुमताने ज्या वेळेस जो मार्ग ठरेल तो हाती धरावयाचा आणि कामाचा धोशा चालवावयाचा. " टिळकपक्ष हा जहाल पक्ष आहे असे दाखविण्यासाठी, त्यांनी १८९३ साली सुरू केलेला गणपत्युत्सव आणि १८९५ साली सुरू केलेला शिवाजी–उत्सव ही दोन कारणे रानडेपक्षीयांनी पुढे केली. परंतु या गोष्टींचा राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमाशी काही

एक संबंध नव्हता. हे सामाजिक आणि धार्मिक प्रश्न आहेत. लोकांस एकत्र आणण्यास आणि त्यांच्या उत्सवप्रियतेसही पुष्ट करण्यास टिळकांनी हा गजाननोत्सव सुरू केला. राजकीय विघ्नाचे हरण होण्यासाठी या विघ्नहर्त्याचा सार्वजनिक पूजामहोत्सव करण्याची त्यांनी रूढी पाडिली. तेहतीस कोटि देवता असता हिंदू लोक स्वाभिमानरहित होऊन मुसलमानांच्या मोहरमात भाग घेतात, त्यांच्या डोल्यांपुढे नारळ फोडतात. पाणी ओततात, नाके घासतात—हे काय? परकी धर्माबद्दल सहानुभूती मनात बाळगा, परंतु स्वत्वाचा अभिमान सोडू नका. मुसलमान तुमच्या गणपत्युत्सवात, विष्णुपूजेत भाग घेतो काय? कधीही नाही. तो जर तुमच्यांत मिसळत नाही तर तुमचे काय अडले आहे त्यांच्यापुढे नाकदुऱ्या काढण्याचे? परस्परांनी परस्परांबद्दल सहानुभूती, सलोखा, प्रेम दाखविलें तर रास्त आहे. परंतु एकाने नाक घासावयाचे आणि दुसऱ्याने तर्र असावयाचे हे आम्हांस सहन होत नाही. स्वत्व विसरणाऱ्या लोकांस स्वतःचा फाजील अभिमान बाळगणाऱ्या लोकांजवळ गोडीने वागता येणे शक्य नाही. शेळी आणि वाघ एका वनात राहणे शक्य नाही, दोघे वाघ राहू शकतील. समान दर्जाचे लोक एकत्र राहतील. विषम दर्जाचे लोक संतोषाने—गुण्यागोविंदाने राहणे म्हणजे पाणी आणि विस्तव एकत्र राहण्याप्रमाणे आहे. सर्पाशी दर्पानेच वागले पाहिजे. तर तो नमेल. आपण दूध पाजू लागलो आणि आपल्या घरात त्याला ठेविले तर तो विषच वमणार आणि दंश करणार. मानवी स्वभाव असाच आहे. तेव्हा टिळकांनी हिंदूंचे दौर्बल्य जाणून त्यांस मुसलमानांच्या दर्जाला आणण्याचा प्रयत्न केला. मुसलमानांत अभिमान आहे; आपल्यांतही पाहिजे. 'उत्सवप्रियतेमुळे जर मोहरमात तुम्ही भाग घेत असाल तर हा गजाननोत्सव मी सुरू करितो—चला या इकडे' असे टिळकांनी म्हटले म्हणजे टिळक वितुष्ट पाडणारे झाले काय?

त्याप्रमाणेच शिवाजी—उत्सवाने मुसलमानांस वाईट वाटेल हा दुसरा आक्षेप. वाईट वाटण्याचे कारण? शिवाजीने मुसलमानांस सळो का पळो केले. त्या गोष्टीच्या अनुकरणार्थ काही आज आम्ही शिवाजी-उत्सव करीत नाही. तर जो धर्माभिमान, जो राष्ट्राभिमान, जे तेज, जे धैर्य, जे वीर्य, जे शौर्य, जो स्वार्थत्याग, जे युक्तिबल, शिवाजीने व त्या वेळच्या लोकांनी

दाखविले तेच गुण आजही आपल्या अंगात पाहिजेत. आपण शेळपट; नादान होत चाललो आहो, याची जाणीव लोकांच्या मनात टिळकांना उत्पन्न करावयाची होती. मुसलमानांस वाईट वाटण्याचे यात कारण काय? मुसलमानांस आणि हिंदूंस सोवळा असा नेल्सन, वेलिंग्टन, नेपोलियन यांपैकी कोणाचा उत्सव आम्ही सुरू केला पाहिजे होता की काय असे चिरोलसाहेबांस आमचे विचारणे आहे. जी विभूती लोकांस आपलीशी वाटेल, अवतारी वाटेल तीच त्यांच्यापुढे ठेवावी लागते. मुसलमानांनी सुद्धा शिवाजी-उत्सव करावयास हरकत नाही. त्याने त्यांच्या धर्मावर हल्ला केला नाही; त्यांच्या मशिदी पाडून मंदिरे उभारली नाहीत; परधर्मी म्हणून त्यांच्या मुंडक्यांची रास केली नाही; परधर्मातील स्त्रियांशी विवाह केला नाही; परकी स्त्रिया जनानखान्यात घातल्या नाहीत; तेव्हा असे उदाहरण त्यांच्या हिंदुस्थानांतील इतिहासात क्वचितच सापडेल. शिवाजीचे गुण आपल्यात आणण्यासाठी हा उत्सव आहे. आणि त्या गुणांची सदा सर्वकाळ जरुरी आहेच.

परंतु टिळकांच्या या दोन उत्सवांनी सरकारास वाटले की, यात जातीजातींचे वैमनस्य वाढविण्याचे बीज आहे. त्याचीच री मवाळांनीही ओढली, मलबारी या गृहस्थांनी ईस्ट आणि वेस्ट या मासिकात १८९७ मध्ये सद्यःस्थिती या विषयावर एक लेख लिहिला आहे. या उत्सवासंबंधी ते म्हणतात: "His movement to revive the memory of Shivaji though deserving of sympathy from every generous heart so far as it aims at the unity of the Deccan, is historically an anachronism." आणि पुढे म्हणतात: "Mind has been liberated to a certain extent, not so the heart." पहिल्याच वर्षी मुंबईत दंगे झाले. मुसलमानांस हिंदूंनी आपल्यासारखा दहा दिवसांचा उत्सव सुरू केला हे खपले नाहीं. हिंदूंनी आपणांस वचकावे, त्यांनी नरमून असावे ही त्यांची इच्छा. हिंदू तुमच्या मोहरमात भाग घेतात. तुम्ही गणपत्युत्सवात घ्या—असे म्हणणे किती मुसलमानांस रुचले असते? हा उत्सव त्यांस वर्मी झोंबला आणि म्हणून त्यांनी दंगे केले. परंतु या दंग्याचे कारण निरुपद्रवी विघ्नहर्त्या गणपतीचा उत्सव हे नसून, चढेल मुसलमानांचे फाजील धर्म-

वेड हेच होय हे डोळ्यांआड करून चालणार नाही. हे दोन उत्सव आणि टिळकांचा सामाजिक बाबीतला परंपरेला होता होईतो एकदम न टाकण्याचा दृढ निश्चय या तीन गोष्टींमुळे त्यांस या रानडेपक्षीय लोकांनी जहाल हे विशेषण दिले. आपल्यास सवता सुभा काढावयाचा तर काढावा, परंतु तो काढण्यासाठी आपले मताधिक्य नाही, ही खरी गोष्ट जी सांगावयाची ती टाळून हा पक्ष जहाल आहे अशी टिमकी वाजवावयास या पक्षाने सुरुवात केली, आणि आपल्याच देशबांधवांस जहाल अशी नावे ठेवून तो पक्ष सरकारच्या अवकृपेस जास्तच पात्र केला. नवीन सभा काढण्यास बळकट आधार कशाचाच नव्हता. ज्यांचे मताधिक्य आहे, त्यांच्याबरोबर काम करण्यात आपली मानखंडना आहे असे वाटल्यावरूनच ही निराळी सभा स्थापण्यात आली आणि म्हणूनच टिळकांनी ती स्थापणाऱ्यांवर टीकेचे जळजळीत अस्त्र सोडले. हा विस्तार करण्याचे कारण येवढेच की जो पक्ष मताने मातबर असेल त्याच्याशी भांडून जर त्या पक्षाने आपली मते स्वीकारली तर ठीकच; नाही तर जे मताधिक्याने ठरेल त्याचा टिळक प्रसार करीत. परंतु टिळक आग्रही आहेत असा टिळकांवर आरोप करणारे मात्र आपले अल्प-संख्याकत्व झाल्याबरोबर वेगळे होतात ! टिळक मतासाठी, आपले मत दुसऱ्यास पटविण्यासाठी, मातबर लोकांशी झगडतील; आकाशपाताळ एक करितील; परंतु जर आपले म्हणणे मताधिक्याने पसंत ठरले नाही तर उठून जाणार नाहीत; उलट जे ठरेल त्याचे लोण सर्व जनतेत पोच-वितील आणि दुसऱ्या प्रसंगी आपले मताधिक्य करण्याचा प्रयत्न कर-तील. परंतु सवते सुभे काढणे, वेगळे होणे हे नेमस्त मंडळींसच बाळ-कडू आहे; टिळकांस नाही असे आम्ही स्पष्टपणे म्हणतो. गोखले आता डेक्कन सभेचे सेक्रेटरी झाले. याच वर्षी गोपाळराव ग्रज्युएटांतर्फे बॉम्बे युनिव्हर्सिटीचे फेलो निवडून आले. मरेपर्यंत ते युनिव्हर्सिटीचे फेलो होते. कर्झनसाहेबांच्या युनिव्हर्सिटीच्या कायदेकानूनंतर त्यांस युनि-व्हर्सिटीनेच फेलो नेमले. एक वर्ष ते सिंडिकेटचेही सभासद होते, परंतु पुढे मात्र निवडून आले नाहीत. पुढे पुढे सीनेटच्या बैठकीसही त्यांस वेळेवर जाता येत नसे. कारण कामाचा बोजा त्यांच्यावर किती पडे हे

त्यांचे, त्यांनाच कळे. ते हजर असले म्हणजे मात्र वादविवादात लक्षपूर्वक मन घालावयाचे. शिक्षण हा त्यांचा जिव्हाळ्याचा विषय होता बी. ए. च्या परीक्षेस इतिहास हा विषय सक्तीचा असावा की नाही या प्रश्नावर जेव्हा भवति न भवति होत होती तेव्हा गोपाळरावांनी उत्कृष्ट भाषण केले. हेच त्यांचे शेवटचे भाषण होय. हिंदुस्थानातील तरुणांस इतिहासाची फार आवश्यकता कशी आहे ते त्यानी स्पष्टपणे सांगितले. हा विषय आवश्यक असावा असे त्यांचे म्हणणे होते आणि त्याच वेळेस जर मते घेतली असती तर गोपाळरावांचा जय झाला असता. कारण त्यांच्या भाषणाने खरोखरच मनावर परिणाम घडवून आणला असे ते भाषण ऐकणारे लोक सांगत. परंतु उपयोग झाला नाही. नवीन 'ऐच्छिक इतिहास' या विषयाचा अभ्यासक्रम जेव्हा आखण्यात आला तेव्हा मात्र त्यांच्या मतास—म्हणण्यास मान देण्यात आला. राजनीतिशास्त्राचा अभ्यास आणि अर्थशास्त्र हा विषय बी. ए. ला व हिंदुस्थानची आर्थिक परिस्थिती हा विषय एम्. ए. ला ठेवण्यात त्यांनीच भीड खर्च केली. ते पुष्कळ वर्षे इतिहास व इंग्रजी यांचे परीक्षकही होते.

१८९६ मध्ये कलकत्त्यास राष्ट्रीय सभा होती. रानडे व गोखले ही गुरुशिष्यांची जोडी तेथे गेली होती. गोखल्यांविषयी रानडे यांस आता बरीच आशा वाटू लागली होती. हा पुढे मोठा मनुष्य होईल, राष्ट्राचा नेता होईल असे भविष्यकाळचे स्वप्न त्यांच्या दृष्टीस दिसू लागले होते. गोखल्यांची तेथे ओळख करून देताना ते म्हणाले : 'हा एक होतकरू तरुण असून हिंदुस्थानच्या पुढाऱ्यांत याची गणना होईल!' हे त्यांचे शब्द अक्षरशः खरे ठरले, म्हणजे या सुमारास रानड्यांस त्यांचे सर्व गुण, त्यांची योग्यता कळून आली असली पाहिजे; एरव्ही नेहमी जबाबदारपणे बोलणाऱ्या व अवास्तव स्तुती न करणाऱ्या रानड्यांच्या तोंडून असे उद्गार बाहेर पडले नसते. "स्तुति येति न मुखासि या असारा ज्या" — असार म्हणजे पोकळ स्तुति अशा पुरुषांच्या तोंडून येत नसते. आज दहा वर्षे रानड्यांजवळ ते शिकत होते. मनाने, बुद्धीने, हृदयाने शिकत होते. वागावे कसे, लिहावे कसे, बोलावे कसे, शांत राहावे कसे—या सर्वांचे धडे त्यांनी घेतले. रानड्यांच्या तालमीत

पूर्णपणे तयार झाले तेव्हा त्यांचे वय फक्त तीस वर्षांचे होते. या होतकरू तरुणास पुढल्याच वर्षी आपल्या गुरूजवळ शिकलेल्या विद्येत परीक्षा देण्याची वेळ आली. परीक्षा घेणारा तिऱ्हाईत असला म्हणजे परीक्षा जास्त कसोशीने होते. गोपाळरावांची परीक्षा इंग्लंडांत होणार होती. आणि त्या परीक्षेस जाण्याची ते तयारी करू लागले.

# इंग्लंडची पहिली सफर

१८९६ मध्ये इंग्लंडमध्ये कान्झर्वेटिव्ह पक्ष सत्तारूढ होता. ज्या खर्चाचा बोजा वास्तविक रीत्या इंग्लंडवर पडावयाचा तो हिंदुस्थानावर पडतो असा गवगवा होत होता. तेव्हा या प्रकरणाची चौकशी करण्याकरिता एक कमिशन नेमण्यात आले. हे कमिशन वेल्बी कमिशन म्हणून प्रसिद्ध आहे. हिंदुस्थानातून या कमिशनपुढे साक्ष देण्यासाठी वाच्छा हे जाणार होते. मुंबई प्रेसिडेन्सी असोसिएशनतर्फे व डेक्कन सभेचा सेक्रेटरी या नात्याने गोपाळराव गोखले यांनी इंग्लंडात साक्ष देण्यास जावयाचे असे ठरले. वाच्छा हे कसलेले, नांवाजलेले आकडेशास्त्रज्ञ होते. गोपाळरावांचा या अभ्यासाबद्दल लौकिक अद्याप झाला नव्हता. रानड्यांनी मात्र १८९० मध्येच जुन्नरहून लिहिलेल्या मागे दिलेल्या पत्रात गणेशपंत जोशी यांस गोखले हे तुमच्याबरोबर अभ्यास करण्यास योग्य आहेत असे लिहिले होते. त्या गोष्टीस आज सहा वर्षे झाली होती. गोपाळरावांनी सांगोपांग अभ्यास केला होता. आता तर त्यांनी तीन महिने जय्यत तयारी चालविली. मुंबईहून पुणे, पुण्याहून सोलापूर, तेथून पुनः मुंबई असे त्यांनी किती खेटे घातले ! रा. ब. गणेशपंत जोशांजवळून सर्व बारीकसारीक माहिती, टाचणे, टिपणे सर्व काही तयार करून घेऊन ठरलेली वेळ येताच गोपाळराव हिंदुस्थानची तरफदारी करण्याकरिता त्याच्या वतीने साक्ष देण्यासाठी इंग्लंडास चालले. बालसूर्य उदयाचलावर येऊ लागला. हिंदुस्थानचा किनारा दिसेनासा झाला. परिचित मित्रमंडळी दूर राहिली. प्रथम प्रथम गोपाळरावांस चैन पडेना.

अफाट आकाश आणि अनंत सागर यांच्याकडे ते कित्येक वेळा पाहत बसले असतील. समुद्राच्या लाटांप्रमाणेच त्यांचे मन खाली वर होत असेल. ज्या कार्यासाठी आपण जात आहो ते आपल्या हातून नीट तडीस जाईल का? आपल्या गुरुच्या अपेक्षा आपल्या हातून सफल होतील काय? परकी समाजात आपणास नीट वागता येईल का? इत्यादि विचारांनी त्यांच्या मनांत खळबळ उडविली असेल. ॲडे येथे गोपाळरावांस केबिनमध्ये मोठा धक्का बसला आणि त्यांची छाती किंचित् दुखू लागली. त्यांस वाटले की, दोन दिवसांनी थांबेल; म्हणून त्यांनी तिकडे दुर्लक्ष केले. गोखले इंग्लंडमध्ये आल्यावर प्रथम वाच्छांकडेच राहिले. वाच्छा हे केंब्रिज लॉजमध्ये राहत होते. तेथेच प. पूज्य दादाभाई राहत असत. दादाभाई हे कमिशनमधील एक सभासद होते. गोपाळराव आधीच अत्यंत भिडस्त आणि लाजाळू; त्यातून ते आता परक्या समाजात आलेले! पंचहौदमिशनमधील चहा प्रकरणावर ज्या समाजात प्रचंड वादविवाद झाले, त्या समाजातील गोखले तेथे गोंधळून गेले. बायकां-पुरुषांमध्ये, पारशांमध्ये मिळून मिसळून वागण्याचा त्यांस अद्याप सराव नव्हता. त्यांना कसेसेच वाटे. इकडील राहणी अद्याप त्यांस नीटशी समजेना. पहिले दोन दिवस तर ते मोठ्या सावधगिरीने वागत होते. न जाणो कोठे एखादा शिष्टाचार चुकावयाचा! गोपाळराव या गोष्टीस फार जपावयाचे; इतके की ते करणे हास्यास्पद व्हावयाचे. दोन दिवस झाले. तिसऱ्या दिवशी त्यांचे छातीतील दुखणे जास्त झाले. ते दोन दिवस काळजी घेत होते; परंतु आता वेदना सहन करवतना. दुःख असह्य झाले आणि गोपाळराव अस्वस्थ झाले. दादाभाईंकडे समक्ष जाण्यास ते भीत. त्यास आपण कसे सांगावे असे गुरुजनांविषयी आदर ठेवणाऱ्या त्यांच्या मनास वाटे. त्यांनी ही गोष्ट वाच्छांच्या कानावर घातली, त्यांची सहनशक्ती, आपले दुःख षट्कर्णी होऊ न देता ते मुकाट-पणे मनांत गिळून राहणे हे पाहून वाच्छा कळवळले. परक्या देशात आलेले, जवळ ना स्नेही, ना मित्र, ना नात्यागोत्याचा आप्त! परंतु वाच्छा व दादाभाई तेथे होते. वाच्छांनी ही बातमी दादाभाईंस सांगितली. त्यांनी ताबडतोब तज्ज्ञ डॉक्टरास निमंत्रण पाठविले आणि ते स्वतः गोपाळरावांची

कळ कमी होण्याचे प्रथमोपचार करीत बसले. दादाभाईंस आपली शुश्रूषा करावी लागत आहे हे पाहून गोपाळराव गोंधळले. दादाभाईंबद्दल त्यांस किती पूज्यभाव वाटे हे १८९३ मध्ये जेव्हा दादाभाई पुण्यास आले होते आणि त्या वेळेस त्यांचे जे थाटाचे स्वागत झाले होते, त्याप्रसंगी दिसून आले होते. दादाभाईंच्या जवळ आपण असावे असे त्यांस त्या वेळी वाटे. परंतु ज्या गाडीतून मिरवणूक निघत होती त्या गाडीत जागा नव्हती. तेव्हा गोपाळराव घोडे हाकणाराजवळच जाऊन बसले आणि आपल्या मनींची इच्छा त्यांनी सफळ करून घेतली; असो. डॉक्टर आला; छाती तपासण्यात आली; दुखणे किती जोखमीचे आहे हे डॉक्टरने सांगितले. थोडक्यात चुकले नाही तर प्राणांवरच बेतावयाचे ! औषधोपचार सुरू झाले. पहिले दोन तीन दिवस फारच काळजी वाटत होती. हळूहळू सुधारणा होत होती. काही दिवस अंथरुणावर पडणेच त्यांस भाग होते. कारण डॉक्टराने तसे सांगितले होते. ज्या घरात ते राहत असत त्याच घरात एक फार ममताळू पोक्त बाई होत्या. ज्या शेरिडनने हिंदुस्तानची करुण कहाणी पार्लमेंटात सांगितली त्या शेरिडनच्याच वंशातली ही बाई होती. तिचे नाव मिसेस कॉन्ग्रीव्ह. या बाईने गोपाळरावांची बरदास्त फार उत्तम ठेविली. शुश्रूषा खरोखर स्त्रियांनीच करावी. गोखल्यांची जास्त उत्तम व्यवस्था घरीही झाली नसती. गोपाळराव प्रसन्न राहावे–त्यांचे मन चिंताग्रस्त नसावे यासाठी कॉन्ग्रीव्ह बाई खटपट करी. ती त्यांच्याजवळ बोलत बसे. तिच्याबरोबर बोलण्याचालण्याने गोखल्यांचा भिडस्तपणा जाऊन आता नैसर्गिक चौकसपणा व मोकळेपणा त्यांच्या वागणुकीत आला. ते पंधरा दिवसांनी हिंडू फिरू लागले. ३१ मे १८९७ रोजी युनिव्हर्सिटीतर्फे बोटिंगच्या शर्यती होणार होत्या. त्या पाहण्यास गोखले, वाच्छा व दादाभाई त्रिवर्ग गेले होते. दादाभाईंनी जरी ४०–४२ वर्षे इंग्लंडमध्ये काढली तरी ते ही गोष्ट पाहण्यास कधी गेले नव्हते. ही त्यांची विरक्तता पाहून गोपाळरावांचा आदर दुणावला. गोपाळरावांवर आध्यात्मिक परिणाम घडविणाऱ्या तीन विभूतींपैकी एक दादाभाई होते हे मागे एके ठिकाणी आलेच आहे. बारीक सारीक गोष्टीकडेसुद्धा लहान मुलाप्रमाणे गोपाळरावांचे लक्ष असावयाचे. शिकवताना सुद्धा ते काही वगळावयाचे नाहीत. वाच्छा म्हणतात : 'Mr. Gokhale was a master of the minutest details.'

इंग्लंडमधील प्रसिद्ध व्यक्तींस भेटण्याची त्यांची फार इच्छा. मोर्ले साहेबांचे ग्रंथ त्यांनी फार मनःपूर्वक वाचले होते. या तत्त्वज्ञास भेटल्याशिवाय जाणे म्हणजे देवळांत जाऊन देव न पाहण्यासारखे त्यांस वाटले असावे. त्यांस भेटून आपली धणी केव्हा तृप्त होईल, डोळ्यांचे पारणे कधी फिटेल असे त्यांस झाले होते. शेवटी एक दिवस ठरविण्यात आला, आणि गोखले व मोर्ले यांची गाठ पडली. बर्कविषयी, आयर्लंडच्या परिस्थितीविषयी त्यांचे बोलणे झाले. मोकळेपणाने त्यांनी चर्चा केली. शाळेतील एखाद्या आनंदोत्सवाची बातमी घेऊन जसा विद्यार्थी घरी धावत येतो तसे गोखल्यांचे झाले. पुष्कळ वेळा ते खरोखरच मुलाप्रमाणे वागत. मुलाचा उत्साह, जिज्ञासा व अकपटपणा त्यांच्या ठिकाणी अजूनही होता. व मरेपर्यंत राहिला. यानंतर आयरिश पक्षाचा जॉन रेडमंड याचीही त्यांनी भेट घेऊन 'होमरूल' ची इत्थंभूत माहिती करून घेतली. सर डब्ल्यू. बेडरबर्न यांच्या मध्यस्थीने दुसऱ्या पुष्कळ हिंदुस्तानच्या हितचिंतकांस ते भेटून आले.

जेथे कोठे मेजवानी किंवा खाना असेल तेथे गोखले आपली तांबडी गुलाबी पगडी घालून जावयाचे. पार्लमेंटमध्ये जाते वेळेसही आपले राष्ट्रीय शिरोभूषणच ते ठेवीत. पाय विलायती झाले तरी डोके हिंदुस्तानी ठेवावयाचे ! केंब्रिज लॉजमध्ये दुसऱ्या एक मिस् पायनी म्हणून बाई होत्या. त्यांनी गोपाळरावांचे नवीन नामकरण केले. कॉन्ग्रीव्ह बाईने गोपाळरावांची आजारीपणात शुश्रूषा केल्यामुळे कॉन्ग्रीव्ह बाईचा पिंगट बच्चा–Brown Baby–त्या विनोदाने म्हणत. इंग्लंमधील शिक्षणपद्धती कशी काय असते हेही गोपाळरावांस पाहावयाचे होते. केन साहेबांच्या खटपटीने त्यांस हे सर्व समजून घेण्यास सांपडले. प्रथम डल्विच् कॉलेजमध्ये ते गेले. तेथे अर्धा दिवस मोठ्या मजेत गेला. फराळ करताना प्रिन्सिपालना प्रश्नांवर प्रश्न विचारून गोपाळराव भंडावून सोडीत. नंतर बेडफर्ड या मुलींच्या कॉलेजात ते गेले. तेथे एक पार्शी बाई शिक्षकीण होत्या. मुलींच्या शिक्षणाबद्दल त्यांनी माहिती करून घेतली. केंब्रिज येथे या वेळेस परांजपे होते, त्यांस भेटण्यास गोखले अर्थात्च विसरले नाहीत. सर वुइल्यम हन्टर या प्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञासही ते भेटले.

शिक्षणाच्या काँग्रेसमध्ये स्त्रियांच्या शाखेपुढे त्यांनी हिंदुस्तानातील स्त्रीशिक्षण हा निबंध वाचला. या निबंधातील पहिल्याच्च अधिकरणातील एक वाक्य फार गोड व मार्मिक आहे. हिंदुस्तान पिकले फळ होते आणि इतर राष्ट्रे कच्ची फळे होती. "Time, however, which brings ripeness to the raw fruit brings also decay to the ripe one and the country which was once the cradle and long the home of a noble religion, a noble philosophy, science and art of every kind, is at the present day steeped in ignorance and superstition and all the moral helplessness which comes of such darkness." नंतर शिक्षणाचा इतिहास सांगितला आहे; मिशनऱ्यांचे प्रयत्न वर्णिले आहेत; हिंदुस्तानातील सध्याच्या शिक्षणाचे शेकडा प्रमाण मुलांमुलीत किती आहे ते सर्व आकडे देऊन दाखविले आहे. स्त्रीशिक्षणास हिंदुस्तानांत होणारा विरोध दिवसें-दिवस कसा कमी होत आहे आणि हिंदुस्तानातील शिक्षण विशेष उपयुक्त अगर मताची वाढ करणारे नसून केवळ डोक्यांत कोंबले जाणारे कसे आहे हेही त्यांनी विशद करून या निबंधात दाखविले आहे.

अशा रीतीने इंग्लंडमध्ये इतर कामे चालली होती. आता ते दुसऱ्या एका मित्राकडे राहण्याची सोय झाल्यामुळे वाच्छांकडून निघून गेले. नंतर इंग्लंडमध्ये ज्या कामासाठी ते मुख्यत्वेकरून आले होते ते काम आले. ते काम त्यांनी उत्तम प्रकारे पार पाडले. त्यांची उलट तपासणी करून घेण्यात आली, परंतु गोपाळराव कचरले नाहीत; डगमगले नाहीत. त्यांची तयारी पूर्ण असल्यामुळे त्यांची त्रेधातिरपीटही उडाली नाही. सर्व प्रश्नांस त्यांनी समाधानकारक उत्तरे दिली. कोठे कोठे दादाभाई त्यांस सावरून घेत. दादाभाई त्या कमिशनमध्ये असल्यामुळे गोखल्यांस धीर असे. त्यांचे विस्तृत वाचन, सर्व प्रश्नांचे केलेले सूक्ष्म परिशीलन, बिनचूक माहिती, हिंदुस्तानच्या आजपर्यंतच्या घडामोडींची वित्तंवातमी या गोष्टी त्यांच्या लेखी साक्षीवरून आणि तोंडी जबानीवरून दिसून येतात. त्यांनी आपल्या लेखी साक्षीचे तीन भाग केले होते.

१. वसूल व जमाबंदी—या सर्व जमाबंदीवर ताबा कोणाचा व किती असतो.

२. खर्च कोणत्या पद्धतीने आणि कसा करण्यात येतो.

३. इंग्लंड आणि हिंदुस्तान यांच्यामधील खर्चाची वाटणी कशी करावयाची.

गोपाळरावांनी सांगितले की, हिंदुस्तानातील बहुतेक सरकारी वसूल लष्कर, बडया बडया अंमलदारांचे मोठमोठे पगार आणि पेन्शने यातच खर्च होतो. अगदी अल्प भाग शिक्षण, आरोग्य, कालवे, शेतकी यांसाठी खर्च होतो. ब्रिटिश व्यापारी आणि ब्रिटिश सावकार यांचेच हितसंबंध प्रथम पाहिले जातात आणि ज्यांच्यापासून कर मिळतो त्यांच्या हिताची वास्तपुस्तही करण्यात येत नाही. लढायांचे बेसुमार खर्च होतात आणि त्याचा बोजा गरीब बिचाऱ्या हिंदुस्तानवर पडतो. साम्राज्य वाढविण्याची हाव तुम्हांस, परंतु पैसा आणि प्राण मात्र जाणार हिंदुस्तानाचे ! दुसऱ्याचा बळी देऊन आपली पोळी पिकविणे हे अत्यंत अनिष्ट व अहितकारक व अन्यायाचे आहे. आधीच शिक्षणादी कार्यासाठी पैसा पुरत नाही तो या गोष्टीमुळे मुळीच पुरणार नाही आणि निःसत्त्व व निष्कांचन होणाऱ्या रयतेवरील करांचे ओझे मात्र खर्चाची तोंडमिळवणी व्हावी म्हणून वाढतच जाणार !

The frequent subordination of the interests of the Indian taxpayer to these other interests makes it all the more imperative that the machinery of constitutional control should provide adequate safeguards for a just and economical administration of the Indian expenditure; and yet, I fear, nowhere are the safeguards more illusory than in our case.

गोपाळरावांच्या सुंदर व मुद्देसूद साक्षीने त्यांची वाहवा झाली ! हिंदुस्तानातील त्यांच्या मित्रांचा आनंद गगनात मावेना ! ! रानडयांसही समाधान झाले ! ! ! नवीन पुढारी आपणांस लाभला असे जनतेस वाटू लागले. हा आपले पांग फेडील असे दुःखीकष्टी भूमातेस वाटले असावे, अशा प्रकारे गोखले आनंदात होते, त्यांचे मित्र त्यांच्या गळ्यात यशाची माळ घालण्यास इकडे उत्सुक होते, परंतु विधिघटना होती वेगळीच !

जगात अशी गंमत आहे की, ज्या वेळेस दुःखाचा मागमूसही नसतो; सुखसमाधानात लोक पोहत असतात; अशा वेळेस एकाएकी सर्व स्थिती पालटून जाते. काळेकुट्ट ढग जमतात; आकाशातील चंद्रमा लोपून जातो; सोसाट्याचा झंझावात वाहू लागतो; मेघांच्या गडगडाटाने कानठळ्या बसून जातात; विजेचा लखलखाट होतो आणि दरएक क्षणी वाटते, हा विजेचा गोळा कोठे तरी पडणार; या प्रचंड वादळाने गावच्या-गाव उद्ध्वस्त होणार; आणि असे उत्पात आपण अगदी शांत आणि प्रसन्न वातावरण असताना पाहतो. तसेच गोखल्यांच्या बाबतीत झाले. पायसात मिठाचा खडा पडला. एकंदरीत दैवाला सर्व चांगले पाहवत नाही हेच खरे !

गोपाळराव इंग्लंडमध्ये गेले, परंतु मागे इकडे पुण्यात हलकल्लोळ माजला. नवीन रोगाची साथ आली. मुंबई, पुणे, नाशिक, धारवाड, बेळगाव या महाराष्ट्रातील बहुतेक सर्व ठिकाणी ग्रांथिक संन्निपाताने–प्लेगने हलकल्लोळ माजविला. हजारो लोक मृत्युमुखी पडले. कुटुंबेच्या कुटुंबे बसली. लोक अगदी हवालदिल झाले. कधी कोणाच्या प्राणांवर बेतेल याचा नेम नव्हता. सरकारने या नवीन रोगाचा वेळीच प्रतिरोध करावा या सद्धेतूने, त्याचे उच्चाटण व्हावे म्हणून शास्त्रज्ञांच्या सल्ल्याने लस टोचण्याचा जालीम उपाय शोधून काढला. रोग नवीन आणि त्यावर पसंत केलेला उपायही नवीन. लोकांस टोचून घेण्याची कल्पनाच सहन होईना. याशिवाय जो कोणी या रोगाने पछाडला असेल त्याच्या आईबापांचे, भावाबहिणींचे म्हणणे, केविलवाणे रडणे, आरडणे यांपैकी कशासही न जुमानता त्याची क्वारंटाईनमध्ये रवानगी होई. आणि तेथे तो रोगी बहुधा आपल्या नात्यागोत्याचे कोणी जवळ नसता दगावावयाचा हे ठरल्याप्रमाणेच होते. ज्या घरात रोग आला असेल ती घरे धुऊन, कपडे वगैरे जाळावयाचे; लोक आजाऱ्याची बातमी देत नसत म्हणून घरांची झडती व्हावयाची; असा रोजचा कार्यक्रम होता. आणि ज्यांची मने जात्याच असंस्कृत व निष्ठुर असतात, आणि घाव घालावयास जे उत्सुक असतात अशा गोऱ्या सोजिरांची या कामगिरीवर नेमणूक झाली होती. काम किती नाजूक आणि ते पार पाडणारे हे हडेलहप ! हिंदू लोकांची मने जात्याच कोमल. दुसऱ्याच्या दुःखाने त्यांच्या

हृदयाचे पाणी होते. साथीच्या रोगाने घरातील माणूस आजारी पडला तर त्याची शुश्रूषा मनोभावाने जिवापाड मेहनत करून करावयाची हे त्यांस माहीत. या संसर्गजन्य रोगाने आपण पछाडले जाऊ असे त्यांच्या ध्यानीमनीही येत नाही. मरणोन्मुख माणसास मरता मरता तरी सुख व्हावे ही त्यांची इच्छा असते. दुधाचा थेंब, गंगेचे पाणी तरी त्याच्या पोटात जाऊ दे असे त्यांस वाटत असते. या सर्व मनोवृत्तींना फाटा देऊन, त्या कोमल मनांचे दुःख न पाहता, आजारी माणसास उचलून क्वारंटाइनमध्ये नेऊन ठेवीत. घरातील माणसे आरडून ओरडून नुसता कल्लोळ करीत, परंतु विचारतो कोण ? आणि दया तरी कोणास येणार ? बापलेक एकमेकांस दुरावले ! मायलेकरांची ताटातूट झाली ! ! पतिपत्नीत दुजेपणा आला ! ! ! सोजीर लोक घरांत घुसून देवाब्राह्मणांची नालस्तीही करीत. यामुळे पुण्यातील लोकांत असंतोष माजून राहिला. लोकांची मने क्रोधाने जळफळू लागली. तरुणांना त्वेष आला. आणि याचा परिणाम म्हणजे रँड व आयर्स्ट यांचे खून झाले. ही बातमी विजेप्रमाणे सर्वत्र पसरली. इंग्लंडातील वर्तमानपत्रे आणि हिंदुस्तानातील अँग्लो-इंडियन पत्रे ' सूड सूड ' म्हणून ओरडू लागली. गोपाळराव या वेळेस इंग्लंडात होते. त्यांच्या मित्रांची त्यांस खाजगी पत्रे गेली होती. त्यांस काही वर्तमानपत्रांचे अंक मिळाले होते. त्यांच्या मित्रांनी ' स्त्रियांची अब्रू घेण्यात येते; त्यांच्यावर जुलूम होतो ' वगैरे मजकूर पत्रात लिहिला होता. इंग्लंडातील लोकांस ही खरीखुरी माहिती कळविली तर त्यांचा गरीब हिंदूंवर झालेला रोष नोकरशाहीवरच वळेल असे गोखल्यांस वाटले. ते ही सर्व पत्रे वाच्छांस वाचून दाखवीत असत; त्यांच्या मित्रांस ही कुणकुण समजली. शेवटी जून महिन्याच्या अखेरीस या बाबतीत काय करावे हे ठरविण्यासाठी पार्लमेंट–गृहाच्या लायब्ररीच्या खोलीत काही मित्र जमा झाले. पहिल्या दोन बैठकी ज्या झाल्या त्यावेळी वाच्छा हे हजर होते. परंतु ज्या बैठकीत ही बातमी प्रसिद्ध करावी असे ठरले त्याच बैठकीस वाच्छांस हजर राहता आले नाही. आणि गोखले तर उतावीळ झाले होते. तिसऱ्या बैठकीत जे ठरले ते त्यांनी वाच्छांस कळवून त्यांचा सल्ला घेतला असता तर भावी आपत्ती टळली

असती, परंतु उतावळेपणाने त्यांनी ती बातमी मँचेस्टर गार्डियन या वृत्तपत्रात प्रसिद्ध केली. पत्रांवर भरवसा किती ठेवावा, त्यांत ऐकीव गोष्टी किती असतील याचा सारासार विचार करून हे कृत्य झाले पाहिजे होते. परंतु होणारासारखी बुद्धि झाली आणि गोखल्यांनी सर्व मजकुरावर भिस्त ठेवून माहिती जाहीर केली. इंग्लंडमधील लोक स्त्रीस्वातंत्र्याचे कैवारी. त्यांच्यामध्ये स्त्रियांस सर्वत्र मान. त्यामुळे स्त्रियांची अब्रू सोजिरांनी घेतली हे वाचून त्यांच्या पायाची आग मस्तकांत गेली. पार्लमेंटात प्रश्नोत्तरे झाली आणि मुंबई सरकारास 'खुलासा करा' अशी तार करण्यात आली. मुंबई सरकारने पुण्यातील सुमारे ५०० सद्‌गृहस्थांकडे पंचप्रश्नात्मक पत्रिका पाठविल्या आणि या पाच प्रश्नांसंबंधी प्रत्यक्ष वा ऐकीव जी माहिती, जो पुरावा असेल तो सरकारला कळवावा असे लिहिण्यात आले. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही की, एकही गृहस्थ पुढे झाला नाही. आणि पुढे येणार तरी कसा ? आपलीच बेअब्रू आपल्या तोंडाने हिंदी अंतःकरणास बोलवत नाही. मलबारी हे याविषयी म्हणतात, "No modest Hindu or Mahomedan lady will come forward to accuse, she would be assailant of her modesty. To ask her or her male relatives for proof is something like addition of insult to injury." जेव्हा कोणी काही सांगावयास धजेना तेव्हा अर्थात्च निमित्तावर टेकलेल्या मुंबई सरकारने 'गोखल्यांची विधाने खोडसाळपणाची आहेत' अशी उलट तार केली. आता मात्र गोखल्यांवर कठीण प्रसंग आला. आपल्या मित्रांनी ज लिहिले ते अगदी खरे आहे अशी त्यांची मनोभावना त्यांस सांगत होती. मुंबईसरकारच्या आव्हानास 'ओ' देऊन कोणीच गृहस्थ पुढे कसा झाला नाही याचे त्यांस आश्चर्य वाटले. आपल्या लोकांत नीतिधैर्य नाही असे त्यांस वाटले असेल काय ? इंग्लंडातील पत्रांनी गोखल्यांवर शिव्याशापांचा नुसता पाऊस पाडला. पार्लमेंटात एका सभासदाने तर त्यांस Despicable perjurer म्हणजे खोटी व निंद्य कुभांडे रचणारा असा आहेर अर्पण केला. 'सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम्' हा अमोल उपदेश संतापाच्या व भावनांच्या भरात दृष्टीआड झाला.

आपल्या लोकांची दुःखे व जुलूम तेथील लोकांस कळावा या सद्धेतूने त्यांनी सर्व केले. आपली विधाने खरी असे त्यांस वाटत होते, परंतु सज्जनांच्या अंतः-करण-प्रवृत्तीला कोठे जगात मान्यता मिळते ? जे काय प्रत्यक्ष सिद्ध होईल त्याच्यावर जगाचा भरंवसा, करावयास गेले एक आणि झाले भलतेच ! इंग्लंडमध्ये सुरेख साक्ष दिली होती, परंतु ते यश पार नाहीसे झाले. परक्या देशात परकी लोकांचे वाक्प्रहार सोसणे त्यांस भाग होते. त्यांचे मन द्विधा झाले. अंतःकरण विदीर्ण झाले. ते हिंदुस्तानास यावयास निघाले. वाच्छांबरोबर युरोपला जाण्याचा आपला बेत त्यांनी रद्द केला. हिंदुस्तानात जाऊन आपल्यास आपली विधाने खरी करून दाखविता येतील काय हाच प्रश्न त्यांच्या अंतश्चक्षूंपुढे होता. बोटीवर त्यांस फार त्रास झाला. सिव्हि-लियन् लोक ' हाच आमच्या शिपायांचे वाभाडे काढणारा ' असे त्यांच्याकडे बोट दाखवून सांगू लागले. एका सिव्हिल सर्वंटाने मात्र त्यांच्या दुखावलेल्या मनास धीर दिला. गोखल्यांची बोट एडनला आली. एडनला कांही मित्रांची पत्रे त्यांस मिळाली. ही पत्रे ज्यांनी इंग्लंडमध्ये त्यांस पुण्यातील हलकल्लोळाची पत्रे लिहिली होती त्याच सद्गृहस्थांची होती. आमची नावे सरकारात कळवू नका. आमच्या नावाची परिस्फुटता—वाच्यता न होऊ देण्याची खबरदारी घ्या अशी विनंती या पत्रात मोठ्या कळवळ्याने केली होती. गोखल्यांनी सर्व जबाबदारी आपल्याच शिरावर घेण्याचे नाही तरी ठरविलेच होते. आपली एक मानखंडना झाली तेवढी पुरे—आपल्या-बरोबर इतरांची नको हाच उदार विचार त्यांनी मनात धरिला होता.

# माफी–प्रकरण

मुंबई बंदरात बोट आल्याबरोबर प्रथम त्यांस पोलिस कामिशनर भेटले. गोपाळरावांनी सांगितले की, मला आधी घरी जाऊ द्या; मी पुरावा मिळविण्याची खटपट करीन आणि मग काय ते जाहीर करीन. आता मला काही एक करिता येणार नाही. गोपाळराव घरी आले. सर्व मित्रांच्या त्यांनी भेटी घेतल्या. परंतु पुरावा कोणीच देईना. आता काय करावयाचे ? आपण तर सर्व युरोपियन राष्ट्रांत इंग्लंडच्या शिपायांची नाचक्की करून बसलो ! आणि ते विधान सप्रमाण सिद्ध करिता तर येत नाही ! ! गोपाळ-रावांच्या मनाची काय स्थिती झाली असेल याची कल्पनाच करणे बरे. त्यांच्या जिवास रुखरूख लागली. मन खाऊ लागले. आपल्या गुरूची त्यांनी सल्ला घेतली. कठिण प्रसंगात गुरुशिवाय कोण मदत करणार ? रानड्यांनी त्यांस जाहीर माफी मागण्यास सांगितले. गोखल्यांस ही गोष्ट कमीपणाची वाटली. पण रानड्यांचे नीतिधैर्य थोर. त्यांनी सांगितले की, आपली चूक कबूल करणे यात मनाचा मोठेपणा आहे; मानखंडना नाही. सज्जन जे आहेत ते तुमचे कौतुकच करितील. हेच करणे रास्त व श्रेयस्कर आहे. गोखले हो ना करीत होते; परंतु शेवटी गुरूच्या उपदेशाप्रमाणे वागण्याचे त्यांनी ठरविले. रानड्यांचा शब्द ते कसा मोडतील ? रानड्यांस आपल्या करणीने जर संतोष होत असेल तर त्रिभुवनाच्या निंदेसही ते भिणारे नव्हते. इंग्लंडमधील माझी साक्ष जर तुम्हांस पसंत पडली असेल तर माझे सार्थक झाले असे रानड्यांस त्यांनी लिहिले होते. ‘ If yon find time to go through the statements and feel satisfied, I shall have received the only reward I care. ’ तेव्हा ज्यांना ते सर्वस्व समजत असत,

त्यांच्या सांगीप्रमाणे ते वागणार नाहीत तर कोणाच्या? पुढे एकदा मोतीलाल घोष यांनी रानड्यांजवळ या माफीचा खुलासा विचारला तेव्हा त्यांनी सांगितले की गोखले तयार नव्हते; परंतु आपण त्यांचे मन वळविले. मोतीलाल, 'A step in the steamer' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत लिहितात : "He was willing to stick to his words, but was prevented from doing so by his Guru-Mr. Ranade whom he could not disobey. In the course of a conversation Mr. Ranade assured me that the entire responsibility for Gokhale's apology was his and Gokhale simply followed his advice." स्वतःच्या शब्दांस चिकटून राहण्याच्या गोखल्यांच्या निश्चयास मोतीलाल ('Fairness') 'चांगुलपणा' म्हणतात. आम्हांस तसे वाटत नाही. जी गोष्ट आपणास सिद्ध करिता येत नाही आणि ज्या गोष्टीमुळे दुसऱ्याची आपण निंदा केली, ती गोष्ट सपशेल परत घेऊन माफी मागणे हेच न्याय्य होय. आपला शब्द जर खरा करून दाखविता येत नाही तर त्यास चिकटून राहण्यात मोठेपणा किंवा धैर्य नाही. अशा वेळी आपला अपराध कबूल करण्यासच अलौकिक धैर्य लागते आणि यासच आम्ही नीतिधैर्य म्हणतो. आपल्याच लोकात मनोधैर्य कमी म्हणून गोपाळरावांवर हा नामुष्कीचा प्रसंग आला. जर आपल्या विधानासाठी त्यांनी पुरावा पुढे मांडला असता तर गोपाळरावांस आपले शब्द खरे करता आले असते. पण त्यांच्या पत्रलेखकांनी त्यांस आगाऊच केविलवाणी विनंती केली होती. ह्या भ्याड लोकांच्यामुळे गोपाळरावांस माफी मागावी लागली! जर लोक पुढे येत नाहीत, पुरावा देत नाहीत तर आपलीच विधाने जरी ती ईश्वराच्या दृष्टीने (कारण तोच फक्त सर्वसाक्षी आहे) खरी असली तरी जगामध्ये खरी ठरत नाहीत. आणि ती खरी न ठरल्यामुळे ज्यांच्या-वर त्या विधानांनी दोषारोप केले होते त्यांची माफी मागणे हाच राज-मार्ग आहे. गोपाळरावांनी हा मार्ग स्वीकारला त्याबद्दल त्यांचे जितके कौतुक करावे, त्यांच्या धैर्याची जितकी तारीफ करावी तितकी थोडीच होईल.

युरोपात हा माफी मागण्याचा प्रघात सर्वमान्य आहे. गोखल्यांनी

माफी मागितल्यामुळे सरकारचे समाधान झाले. इंग्लंडमधील पत्रांची तोंडें बंद झाली. तेथील मित्रमंडळींची गोखल्यांस सहानुभूतिपर आणि समाधानदर्शक पत्रे आली. या माफीचा त्यांस पुढे फार उपयोग झाला. जबाबदारपणे आणि विचारपूर्वक कोणतीही गोष्ट करण्याचा त्यांनी धडा घेतला. अधिकारीवर्गास वाटले की, हा पुरुष न्यायी आहे. उगीच कोणाची नालस्ती करणार नाही. जे खरे दिसेल तेच करील. आपली अब्रू याच्या हातात सुरक्षित राहील. इंग्लंडमधील लोकांसही वाटले की या माणसाची सत्याकडे दृष्टी आहे. सत्य कठोर असले तरी हा डगमगणार नाही. जी गोष्ट इंग्लंडमध्ये त्यांस सत्य वाटली ती जाहीर करण्यास ते भ्याले नाहीत. परंतु ती गोष्ट खोटी ठरली हे जेव्हा त्यास दिसले तेव्हा माफी मागण्याच्या सत्यात्मक मार्गापासूनही ते विन्मुख झाले नाहीत. ते पुनः जेव्हा इंग्लंडास गेले तेव्हा हा सत्यवक्ता आहे अशी लोकांची समजूत असल्यामुळ त्यांच्या शब्दास वजन प्राप्त होई व त्यांच्या शब्दाचा विचार होई. हा फायदा लहानसान नाही. वाइटातून हे चांगले बाहेर पडले, आणि जास्त सावधगिरी ते शिकले. परंतु इंग्लंडमध्ये, तेथील अधिकारीवर्गात आणि कांही मित्रमंडळीत जरी त्यांची वाहवा झाली तरी पुष्कळ वर्तमानपत्रांनी त्यांस भ्याड, भित्रा, वगैरे विशेषणे दिली. देशाचा अपमान करणारा अशी त्यांची निंद्य वर्णने करण्यात आली. पुण्यातील मेळ्यामधून त्यांची टर उडविण्यात आली ! आपले लोक इतके कसे कृतघ्न असे गोपाळरावांस वाटे. त्यांनी इंग्लंडमध्ये बजावलेल्या कामगिरीचा गौरवपर उल्लेख एकानेही न करता, त्यांनी सत्यासाठी जी गोष्ट केली त्यामुळे त्यांच्यावर येवढा गहजब केला ! परंतु मुक्ताबाईने ज्ञानेश्वरांस सांगितलेले ‘ संत जेणे व्हावे । जगबोलणे सोसावे, ’ हेच वचन लाखाचे आहे. गोखल्यांनी निमूटपणे सर्व सहन केले. आपल्या गुरूची शांत व गंभीर मूर्ति त्यांच्या समोर होतीच. ‘ आपलेच दात आणि आपलेच ओठ ’ लोक निंदा करताहेत, करोत. ही स्वजननिंदा गोखल्यांनी थोर मनाने सहन केली. मात्र ते म्हणत ‘ Forgive I must, forget I cannot ’ त्यांच्या अंतःकरणात–निंदेचे शब्द कायमचे बसले ! टीकेसंबंधी त्यांचे मन जात्याच अत्यंत मृदु. इंग्लंडमध्ये असताना एकादा शिष्टाचार आपल्या हातून चुकू नये म्हणून त्यांची कोण धडपड ! असल्या साध्या

शब्दाने विव्हल होणारे कोमल अंतःकरणाचे गोखले या प्रचंड शरसंपाताने किती घायाळ झाले असतील बरे! कण्वाश्रमींचा कुरंग जसा दावानळांत होरपळून निघाला तद्वत् त्यांची स्थिती झाली. टिळकांमध्ये आणि गोखल्यामध्ये हा मोठा फरक होता. टिळक आणि आगरकर टीकेस कधी भ्यावयाचे नाहीत. लंगड्या पायाने सुद्धा ते समरांगणांत नाचावयाचे, चमकावयाचे. टिळक हे तत्त्वज्ञ होते. तत्त्वज्ञानाने येणारा कठोरपणा त्यांच्यांत आला होता. टीकेकडे त्यांचे विशेष लक्ष नसे. ते टीका विसरून जात आणि त्यांस वाटे की, दुसराही टीका विसरून जाईल. दुसरा इतके दिवस टीका उराशी धरून कसा बसतो याचे त्यांस आश्चर्य वाटे. स्वतःस टीकेची खिजगणती नसल्यामुळे दुसरेही असेच असतील या समजुतीने ते टीका करीत. परंतु गोखल्यांची मनःस्थिती निराळी होती. टिळकांच्या मनोगिरींवर किती का मुसळधार पाऊस पडेना ? त्याचा एक कोपराही ढासळावयाचा नाही. परंतु गोखल्यांचे अंतःकरण देशावरील मृदू आणि भुसभुशीत मातीप्रमाणे होते; पावसाचे चार थेंब पडले तरी ते आतपर्यंत जावयाचे. त्यांचे मन लोण्याप्रमाणे होते. ते परदुःखाने वितळे तसेच टीकेनेही वितळे ! टिळकांचे मन जरी परक्याच्या दुःखाने कळवळले तरी टीकेने—स्वतःच्या दुःखाने वा स्वतःवरच्या टीकेने कधीही वितळून जात नसे. अशा प्रसंगी ते वज्राप्रमाणे कठिण बने. सार्वजनिक काम करणारा असाच खंबीर लागतो. गोखल्यांनी देशाचे हित केले, सार्वजनिक कामे केली. परंतु दुखावलेल्या मनाने केली. दुखावलेले मन पुनः साफ बरे झाले नाही. वाग्बाण निघून गेला तरी त्याने केलेला व्रण राहतो म्हणतात ते काही खोटे नाही, १८९७ सालची कॉंग्रेस वऱ्हाडास अमरावतीस भरावयाची होती. गोपाळरावांच्या इंग्लंडमधील कामगिरीचा गौरवपूर्वक उल्लेख करावयाचा ते तर बाजूसच राहिले; उलट त्यांच्या माफीबद्दल निषेध करणारा ठराव पास करावा असे दुसऱ्याचे वाईटच पाहणाऱ्या कित्येक लोकांस वाटले. परंतु गोष्टी या थराला आल्या नाहीत. तेथे गोखल्यांचे अभिनंदनही झाले नाही किंवा निंदाप्रदर्शक ठरावही पास झाला नाही. अमरावतीच्या कॉंग्रेसहून परत येताना गोपाळरावांस एका प्रसंगाने आपल्या गुरूची अंतःकरण—ओळख जास्तच झाली.

माधवरावांच्या प्रकृतीमधले दैवी तेज पुष्कळांस दिसले होते. भांडारकर तर रानड्यांचे सांगणे म्हणजे दैवी संदेश असे समजत. रानडे पहाटेच्या वेळेस उठून ' जे का रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ' हा तुकाराम महाराजांचा सुप्रसिद्ध आणि गोड अभंग आळवून आळवून म्हणत होते. अर्थाशी त्यांची झालेली समरसता पाहून गोपाळरावांस काय बरे वाटले असेल ?

१८९८ मध्ये गोपाळरावांनी माफीसंबंधाने आपल्यावर केल्या गेलेल्या आरोपास सविस्तर उत्तर प्रसिद्ध केले. त्यात त्यांनी शेवटी खालील उद्गार काढले आहेत. " Several of my Indian friends have been equally kind foremost among them being the gentleman at whose feet I have now sat for these many years as a pupil. "

लोकांनी टीका केली तरी रंजले गांजलेल्यांच्या दुःखाचा परिहार करण्याचे स्तुत्य काम गोखल्यांनी टाकले नाही. अजून प्लेग हटला नव्हता. त्यांनी एक स्वयंसेवकांचे पथक उभारले आणि लोकांस पुष्कळ सहाय्य केले, टोचून घेण्याचा उपदेश केला व त्यांच्या भोळ्या समजुती नाहीशा करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या कामागिरीचा गौरवपर उल्लेख सरकारी रिपोर्टात सर क्रीम यांनी केला होता.

१८९९ मध्ये इनॉक्युलेशनसंबंधी एक सरकारी कमिशन बसले. हा उपाय धोक्याचा आहे किंवा काय, याने दुसरीच दुखणी जडतात असे लोक म्हणतात त्यात किती तथ्य आहे, सांधेदुखी उत्पन्न होते की काय यांची चवकशी करण्याकरिता हे कमिशन नेमले होते. गोखल्यांची या कमिशनवर नेमणूक झाली होती. कारण त्यांच्यावर सरकारचा विश्वास बसला होता. निरनिराळ्या ठिकाणी चवकशी झाली. विशेषतः धारवाड, बेळगाव येथे जास्त साक्षी घेण्यात आल्या. सर्व सभासदांचे मत इनॉक्युलेशन हा उपाय चांगला आहे असेच पडले. गोखल्यांनी आपली स्वतंत्र पत्रिका जोडिली होती. तीत ते म्हणतात ' जरी काही इसमांस या उपायाने अन्य रोग जडला असला, तरी टोचला जाणारा जो असेल त्याची वयोमर्यादा आणि त्याची शक्ती नीट लक्षात घेऊन तज्ज्ञ माणसाकडून लस टोचविल्यास हा उपाय लोकांस भोवणार नाही व परिणाम चांगलाच होईल. '

# कौन्सिलातील कामगिरी

या वर्षाच्या अखेरीस ते मध्यभागातर्फे कौन्सिलमध्ये निवडून आले. त्यांच्या अभिनंदनार्थ पुण्यास हिराबागेत समारंभ झाला होता. डॉ. भाण्डारकर आणि गंगाराम भाऊ म्हस्के यांनी गोखल्यांची स्तुती व गौरव केला. समारंभास गोखल्यांचे गुरू रानडे हेही हजर होते. गोखले हे जात्याच विनयशील आणि नम्र. भाषणाच्या अखेरीस ते म्हणाले : "न्या. मू. रानड्यांनी मला हाताशी धरिले. त्यांच्या चरणांशी बसून शिकण्याची संधी मला मिळाली; म्हणूनच आज मला ही स्थिती प्राप्त झाली आहे." केवढी ही गुरुभक्ती ! अलीकडे अशा प्रकारचे गुरुशिष्यसंबंध फारसे आढळत नाहीत.

१९०० पासून आपल्या मृत्यूपर्यंत गोपाळराव हे प्रांतिक नाही तर वरिष्ठ–कोणत्या ना कोणत्या तरी कौन्सिलचे सभासद होतेच. या वर्षीच्या पहिल्याच भाषणात त्यांनी दुष्काळपीडितांची कष्टप्रद कथा निवेदन केली. सरकारचे त्यासंबंधी कर्तव्य काय तेही सुचविले. सर्व विधाने आकडे देऊन सशास्त्र सिद्ध केली होती. अंमलदार कर कसा जुलुमाने वसूल करतात, ज्या अंमलदाराकडून कर वसूल केला जात नाही त्याला कसा दपटशा देण्यात येतो हे खानदेश वगैरे जिल्ह्यातील प्रत्यक्ष प्रमाणांनी त्यांनी सिद्ध केले. या वर्षी सूट दिली तर ती पुढील वर्षी वसूल करण्यात येते आणि अशा तऱ्हेने शेतकऱ्यांच्या माना या परंपरागत बाकीने आवळल्या जातात असे सांगून गोखले म्हणतात : In the present situation of our peasantry, it is necessary to give many of them a fresh start in life without placing the mile-stone of arrears round their necks.'

सरकारचे म्हणणे असे की एक वर्ष जर दुष्काळाचे तर दुसरे सुबत्तेचे असले पाहिजे आणि दक्षिणेत पिकांची सरासरी काढून कर ठरविण्यात आल्यामुळे सूट अगर तगाई देण्याची जरूरच नाही. या विधानांची विफलता आणि त्यांतील फोलपणा त्यांनी पटवून दिला. शेतकऱ्याने कर्ज काढून कर देऊ नये या शब्दाची ' कर्जाने तो जर निरंतर बांधला जाणार असेल ' अशी खानदेशच्या कलेक्टरांनी केलेली ओढाताण त्यांनी पुढे मांडली. सातारा जिल्ह्यात तालुक्यातील तलाठी वगैरे लोकांस बाकीसह वसूल जमा न केल्याबद्दल दंडही ठोठावण्यात आले. या सर्व प्रकारांची चवकशी होऊन दुष्काळग्रस्त प्रजेस अल्प तरी सुख देऊन तिचा दुवा घ्यावा असे त्यांनी कळकळीने विनविले.

गोपाळरावांस इंग्लंडमध्ये गेल्यापासून वाटे की, दादाभाईंप्रमाणे आपणही इंग्लंडमध्ये राहूनच काम करावे, पार्लमेंटचा सभासद व्हावे, देशहिताची चळवळ करावी; परंतु न्या. रानडे म्हणावयाचे : ' तुम्ही तिकडे जाऊन इकडील कामे कोण करणार ? येथे कौन्सिलमध्ये कोण झगडणार ? सरकारचा नैतिक अधःपात कोण दाखवून देणार ? लोकांस राजकीय विचार करावयास कोण शिकविणार ? अस्पृश्यांचा उद्धार कोणी करावयाचा ? दारूला आळा कसा घालावयाचा ? शिक्षण कसे वाढावयाचे ? मृत्युसंख्या वाढत आहे तिला आळा कसा पडावा ? आरोग्य कसे सुधारेल ? शेती कशी वाढेल ? कर कसे कमी होतील ? उद्योगधंद्यास हातभार कसा लावता येईल ? आपसातील तंटेबखेडे मोडून एकी कशी घडवून आणता येईल ? प्रेम, सलोखा कसा वाढेल ? कामांचे डोंगर इकडे पडले असता इंग्लंडांत जाऊन काय करणार ? पाया भरावयाचे काम आधी करा. सध्या येथेच राबावयाचे तुमचे काम आहे. तुमच्यासारखी सर्वस्व देणारी माणसे पाहिजे आहेत. आम्ही नोकरदार; आम्ही किती करणार ? रानड्यांच्या या उपदेशाचा गोपाळरावांवर फार परिणाम होई. या कामासाठी यंदा त्यांस कौन्सिलमध्ये जाऊन काम करावे लागले.

अशा रीतीने कामास आरंभ होत आहे, आपला शिष्य कौन्सिलमध्ये झगडण्यास योग्य झाला असे पाहून न्या. रानड्यांनी आपला देह १९०१

च्या जानेवारी महिन्याच्या १६ तारखेच्या उत्तररात्री खाली ठेविला. रात्रंदिवस देशहिताची काळजी वाहणारा, धोरणी, विद्वच्छ्रेष्ठ, असा महापुरुष इहलोक सोडून निघून गेला. सर्व चळवळींना जन्म देणारे, सर्वांस कार्यप्रवृत्त करणारे, टीकेचा पाऊस पडत असता हिमालयाप्रमाणे गंभीर राहणारे, कृतीने व मनाने थोर असे सत्पुरुष ईश्वराकडे गेले. मार्ग दाखविणारा गेला. काळ्याभोर अंधारात चंद्राप्रमाणे शीतल प्रकाश देणारा महात्मा मृत्युराहूच्या मुखात पडला. सर्व देश हळहळला. कोण हळहळणार नाही ? या मृत्यूने गोपाळरावांच्या मनाची स्थिती किती चमत्कारिक झाली असेल बरे ? ज्याने नवीन दृष्टी दिली, नवीन सृष्टी दाखविली, संकटाच्या वेळी सदुपदेशाची वृष्टी केली त्या पितृतुल्य गुरूच्या मृत्यूने गोपाळराव क्षणभर स्तिमित झाले. परंतु क्षणभरच. रानड्यांनी रडावयास शिकविले नाही, तर रडे गिळून काम करता करता पडावयास शिकविले. समर्थांच्या समाधीच्या समयी त्यांचे शिष्य असेच मुळुमुळू रडावयास लागले, तेव्हा समर्थांनी काय सांगितले होते ? 'आजपर्यंत शिकलात ते रडण्यासाठीच का ? मी चाललो तरी माझा दासबोध आहे. त्यात माझा आत्मा आहे. तो दासबोध समोर ठेवून वागा म्हणजे मी जवळ असण्यासारखेच आहे.' या समयी गोखल्यांसही रानड्यांचाच उपदेश आठवला असेल. जीवित म्हणजे कर्तव्य आहे. येथे रडावयास वेळ नाही. आपला शोकावेग त्यांनी आवरला, डोळे पुसले आणि गुरूचा उपदेश जो अंतरी साठविलेला होता तदनुसार वागावयाचे ठरविले.

न्या. रानड्यांची स्मारके सर्वत्र उभारण्यात आली. कोठे वाचनालय, कोठे ग्रंथालय; कोठे तसबीर, कोठे पुतळा; काही ना काही तरी या थोर पुरुषाचे स्मारक लोकांनी केले. आपल्या गुरुस आणि आपल्या गुरुभक्तीस साजेसे स्मारक गोपाळरावांनी उभारावयाचे ठरविले. त्यांनी वर्गणीसाठी व्याख्याने दिली. एक लाख रुपये गोळा केले. या रकमेतून पुण्यास सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीच्या अग्रभागी, डेक्कन एज्युकेशन् सोसायटीच्या जवळ स्मारकार्थ 'इंडस्ट्रिअल व एकॉनॉमिक इन्स्टिटयूट' स्थापण्यात आली. या इमारतीचा उद्‌घाटन समारंभ १९१० मध्ये गव्हर्नरांच्या हस्ते झाला. येथे अर्थशास्त्रावरील निवडक पुस्तकांचा चांगला संचय आहे. प्रयोग-

शाळाही साधारण चांगली आहे. परंतु एक लाख रुपयांत ही कामे यशस्वी कशी होणार ? फक्त अर्थशास्त्राचा व्यासंग व अभ्यास करण्यासाठी ही संस्था स्थापिली असती तर बरे झाले असते. परंतु गोखल्यांच्या आशेस पारावार नव्हता. ‘ I know no limitations for the aspirations of my Countrymen ’ हे त्यांचे वाक्य. प्रयोगशाळेत शोध लागून हिंदुस्थानची औद्योगिक उन्नती व्हावी, आपल्या देशाचा दर्जा वाढावा असे त्यांस वाटत होते. परंतु अशा गोष्टीस कोट्यवधी रुपये लागतात. सरकारचा आश्रय लागतो. गोपाळरावांस वाटत होते की, म्युनिसिपालिटीमधून आणि सरकारमधून आपल्या संस्थेस साहाय्य मिळेल; परंतु ही आशा व्यर्थ ठरली. एक लाख रुपये म्हणजे नुसता कात आहे. परंतु पुढेमागे संस्था भरभराटेल असे वाटले असावे ‘ उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः ’ हा नियम खरा आहे. परंतु आपण दारिद्री असलो तरी ‘ अल्पारंभ ’ करून मनातील कल्पना लोकांपुढे निदान आज मांडून तरी ठेवावी या हेतूने गोपाळरावांनी हे स्मारक उभारले.

१९०१ मधील प्रांतिक कौन्सिलांची बैठक सुरू झाली. या वर्षी दोन महत्त्वाची बिले पास झाली. दोहोंमध्येही गोखल्यांनी चांगलाच भाग घेतला. डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल बिल याच वेळी पसार झाले. गोपाळराव पुणे म्युनिसिपालिटीत पुष्कळ दिवस सभासद होते. त्यांस या कामाची व त्यातील वैगुण्याची चांगली कल्पना असल्यामुळे त्यांनी या बिलावर मुद्देसूद व उपयुक्त टीका केली. या बिलाचे कौन्सिलमध्ये वाचन होण्यापूर्वी जिल्हा म्युनिसिपालिट्यांचा विचार करण्यासाठी एक सिलेक्ट कमिटी नेमण्यात आली होती, या कमिटीत गोपाळरावही एक सभासद होते. चार्लस ऑलिव्हंट हे अध्यक्ष होते. या अध्यक्षांनी पुष्कळ मिळते घेऊन काम केले. कमिटीचे काम संपून आता नवीन बिल ऑलिव्हंट यांनी पुढे मांडले होते. “ या बिलाला उपसूचना आम्ही आणीत नाही. कारण मग काहीच मिळणार नाही तेव्हा काही न मिळण्यापेक्षा थोडे मिळणे बरे. ” ( Half a loaf is better than no bread. ) असे गोखल्यांनी प्रथम सिलेक्ट कमिटीमध्ये ठरविले. परंतु, नवीन बिल जे पुढे आले त्यात अशा काही गोष्टी होत्या की त्यास उपसूचना आणणे जरूर झाले. गोपाळरावांनी या नवीन बिलातील पहिली गोष्ट

नाकारली ती ही की, '१८८४ च्या कायद्याने सरकारला निम्मे सभासद ज्या जातीच्या अल्पसंख्याक लोकांना प्रतिनिधित्व मिळाले नसेल—त्यांतून निवडण्याचा हक्क मिळालेलाच होता. आता या नवीन बिलाने पुनः उरलेल्या निम्म्या भागातही जातवार प्रतिनिधी नेमून टाकावयाचे हे काय? 'माझे ते माझे आणि तुझे तेही माझे' असे म्हणण्याप्रमाणे हे आहे. निम्मे सभासद लोकांनी निवडावे; त्यात आणखी वेगळ्या स्वतंत्र जागा काढू नका असे गोखल्यांनी सुचविले. ही पुच्छप्रगती त्याज्य आहे. मद्रास इलाख्यात एकोणीस म्युनिसिपालिट्यांत तीन चतुर्थांश सभासद लोकनियुक्त असताना, मुंबई सरकारने नक्राश्रु का ढाळावे? येवढी कृपणता कशासाठी? इतर प्रांतांतून लोकनियुक्त सभासदांचे प्रमाण अधिक असता मुंबई सरकार 'आम्ही म्युनिसिपालिटीच्या कामात पुढारलेले आहो' अशी आणखी घमेंड मारते! 'नोटिफाइड एरिआ' या कलमामुळे आजूबाजूच्या खेड्यांस हक्क न मिळता पैशाचे ओझे मात्र त्यांच्या डोक्यावर बसेल. म्युनिसिपालिटीकडे सोपविलेल्या कामांवर तर गोखल्यांनी चांगलेच तडाखे लगावले. म्युनिसिपालिटीवर कामे सोपवून सरकार स्वतः मोकळे होऊ पाहते हा खासा न्याय! दुष्काळ आला, म्युनिसिपालिटीने मदत करण्यास पुढे सरकावे; साथीचे रोग आले, म्युनिसिपालिटीने कंबर बांधावी; असे म्हणू लागले तर जगातली अत्यंत सधन अशी म्युनिसिपालिटीही मेटाकुटीस येईल. मग हिंदुस्तानातील आज मरू, उद्या मरू असे करणाऱ्या म्युनिसिपालिट्यांची गोष्ट बाजूसच राहिली!' गोखल्यांच्या टीकेचा थोडाफार फायदा झाला आणि हे बिल पास झाले.

दुसरे अत्यंत महत्त्वाचे बिल म्हणजे 'लँड रेव्हिन्यू कोडाच्या दुरुस्तीचे बिल.' सरकारास हे बिल घाईने पास करावयाचे होते. सावकारांपासून रयतेचे रक्षण करीत आहो, अशा बहाण्याने सरकार मात्र जमिनीचे स्वामी होणार होते. वाटेल तेव्हा सरकारलाच कबजा घेता आला असता. सावकारास जमीन गहाण द्यावयाची नाही असे याने ठरणार होते. लोक या बिलाला फार विरोध करीत होते. लोकांस या बिलाचा विचार करावयास सवड द्या आणि लोकमत काय पडते ते पाहा आणि मग बिलाचे वाचन होऊ द्या, असे फेरोजशहांनी सांगितले. या सूचनेस गोपाळरावांनी जोरदार

भाषण करून संमती दिली. सरकारने जर आपली सूचना मान्य केली नाही तर उठून जावयाचे मेथांनी ठरविले होतें. गोखले प्रथम विरुद्ध होते, परंतु मेथांप्रमाणेच त्यांनी करावयाचे ठरविले. ' तुम्ही स्वतःस योग्य दिसेल तसे वागा ' असे मेथांनी त्यांस कळविले होते. शेवटी मेथांचेच करणे त्यांस रास्त वाटले. ठरल्याप्रमाणे ज्या वेळेस मेथांची ही तहकुबीची साधी सूचना सुद्धा पास होईना तेव्हा सर भालचंद्र कृष्ण, गोकुळदास परेख, दाजी आबाजी, गोखले यांसह मेथा उठून गेले.

या बिलाच्या वादविवादप्रसंगी मूर मॅकेंझी या सभासदांनी एतद्देशीय सभासदांस रयतेची काही माहिती नसते, फक्त सरकारी अधिकाऱ्यांसच ती असते अशी मुक्ताफळे काढिली. या उत्तरास ठोशास ठोसा देणाऱ्या फेरोजशहांनी चांगलेच खरमरीत उत्तर दिले होते. ते वाचण्यासारखे आहे. मेथांची तडफ व त्यांचा बाणेदारपणा या उत्तरांत मूर्तिमंत दिसतो. ते असे :—

" An English official moves among the people (natives), isolated even when not unsympathetic, ignorant even when not uninquisitive, a stranger and a foreigner to the end of the chapter. My lord, I can therefore truly say, that it is I and my native colleagues who can claim to speak at first hand, and of our own personal and intuitive knowledge and experience of the feelings and thoughts of the Ryat, his prejudices, his habits of thought, his ways of life, his ambitions and his aspirations. In speaking on this bill, it is we who represent the real views of the agricultural masses, not the insular and isolated English official. " पुष्कळ उत्तराउत्तरी झाल्यावर अखेर वर सांगितल्याप्रमाणे काही तेजस्वी लोकप्रतिनिधी उठून गेले. काही सभासद असे असतात की, कोणतेही बिल सरकारने पुढे आणले की, ' theirs not to reason why, theirs but to vote and die ' हाच त्यांचा मार्ग. परंतु काही मानधन असे असतात की त्यांस सरकारच्या, किंवा

सरकारच्या प्रत्येक कृत्याचे समर्थन करण्याचे आजन्म व्रत उचललेल्या वर्तमानपत्रांच्या संपादकांच्या स्तुतीची किंवा निंदेची पर्वा नसते. मेथा प्रभृतींच्या कौन्सिलमधून उठून जाण्याच्या कृत्याबद्दल टाइम्सकारांनी ' नाटकी आविर्भाव ' असे शब्द काढले. परंतु येथे नाटक नसून आतडे जळत आहे याची या परभृतांस कोठून कल्पना येणार ? मायेवाचून रड नाही म्हणतात ते काही खोटे नव्हे. टाइम्सकारांना जी गोष्ट खेळ वाटते तीतच आमचे मरण होते. लोकप्रतिनिधींना जेथे बोलण्याची स्वतंत्रतासुद्धा मर्यादित असते तेथे सभेतून उठून जाण्याऐवजी मानाचा मार्ग दुसरा कोणता आहे ? आपल्या उठून जाण्यानेच त्यांस सरकारबद्दल तिरस्कार व स्वतःचा अभिमान दर्शवावयाचा असतो. टाइम्सकारांच्या थट्टेस कोण विचारतो ? हा पहिलाच प्रसंग होता की ज्या वेळेस लोकप्रतिनिधी उठून गेले. त्यांच्या या बाणेदारपणाची देशात वाहवा झाली. त्यांचे सर्वत्र अभिनंदन करण्यात आले. सरकारने मात्र लोकमताला सर्वस्वी धाब्यावर बसवून आपल्यास करावयाचे ते केले. सत्तेपुढे शहाणपणाचे काय होय ?

हे १९०१ साल गोखल्यांच्या आयुष्यक्रमात फार महत्त्वाचे वर्ष होय. या वर्षी प्रकृती नीट नसल्यामुळे फेरोजशहा हे आपल्या जागेचा राजीनामा देणार होते. यामुळे वरिष्ठ कायदे कौन्सिलातील त्यांची जागा रिकामी होणार होती. १९०२ पर्यंत त्यांच्या जागेची या वर्षाची मुदत होती. आणि या वर्षीची बैठक समाप्त झाल्यावर त्यांनी राजीनामा द्यावा असे पुष्कळांचे व गोपाळराव गोखल्यांचेही म्हणणे होते; परंतु मेथांस ते पटले नाही. कलकत्त्यास ४।१।१९०१ ला कौन्सिलची बैठक होती. तीस फेरोजशहांस हजर राहता आले नाही. परंतु त्यांनी हजर राहावे असे गव्हर्नर जनरलचे आग्रहाचे म्हणणे होते. तेव्हा ९ तारखेस ते कलकत्त्यास गेले. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे ही कामाची दगदग त्यांस झेपेना, तेव्हा ते जागेचा राजीनामा देऊन मोकळे झाले.

वरिष्ठ कौन्सिलातील मेथांची जागा भरून काढावयाची होती. मुंबई-कौन्सिलच्या लोकनियुक्त सभासदांनी हा मनुष्य निवडावयाचा असे. गोखल्यांस वाटले की, आपण या जागेसाठी उभे राहावे आणि जर

आपली नेमणूक हे प्रातीनिधी करितील तर आपण जास्त उपयुक्त कार्य करून दाखवू. वरिष्ठ कायदे कौन्सिलात आपला शिरकाव व्हावा ही गोखल्यांची फार दिवसांची इच्छा. परंतु मेथांसारखा अनुभवी, धोरणी, धीरोदात्त आणि सरकारवर अचूक मारा करणारा वीर तेथे असता आपण त्या जागेसाठी उभे राहावे ही कल्पनाही त्यांच्या मनात नव्हती. कायदे कौन्सिलात जावयाचे म्हणजे आपली प्रतिष्ठा वाढावी, मानमरातब व्हावा, सरकारी मेजवान्यांस हजर राहता यावे असे गोपाळरावांस स्वप्नातही वाटले नसेल. तेथे जावयाचे यासाठीच, की जरी सरकारपुढे 'अरण्यरूदन' असले तरी ते करून लोकांची गाऱ्हाणी वेशीवर टांगावयाची; सरकारला स्वकर्तव्याची जाणीव नीट शब्दांत करून द्यावयाची. सरकारच्या हातात सत्ता असली तरी, लोकपक्षीय प्रतिनिधीने सरकारचा अधःपात दाखविला म्हणजे उघड्या माथ्याने तरी सरकारास मिरविता येणार नाही आणि त्याचे मन तरी त्यास खात राहील खास. हाही काही अगदींच टाकाऊ फायदा नव्हे. हे जबाबदारीचे काम मेथांनी आजपर्यंत उत्तम प्रकाराने पार पाडिले होते. त्यांची जागा आता भरून काढावयाची होती. गोखल्यांस वाटले की आपण या जागेसाठी उभे राहावे. मनांत खळबळ सुरू झाली आणि त्या भरात त्यांनी १५ जानेवारी १९०१ रोजी फेरोजशहांस पत्र लिहिले. त्यात ते खालीलप्रमाणे लिहितात :—

'I was hoping that you would, even if you did not stand for a fresh election at any rate complete your present term which does not expire till the middle of 1902; that during that time I might show some useful work in the local Council so that when you retired, you might consider me as not quite the least deserving among those who are working for public good in this presidency, at a good respectful distance behind you.'—याचा सारांश असा आहे की, 'आपण आपली इच्छा नसली तरी निवडणूक संपेपर्यंत राजीनामा देऊ नये. तोपर्यंत मला प्रांतिक कौन्सिलात कांही तरी उपयुक्त कामकाज करून लायकी दाखविता

येईल. म्हणजे मग आपणांस मी अगदी कच्चा शिष्य आहे असे वाटणार नाही.’ गोखल्यांनी गेल्या वर्षी प्रांतिक सरकारच्या अंदाजपत्रकावर टीका करिताना दुष्काळातही दयाळू सरकार कसे दुष्ट असते हे सांगितले. यंदाही थोड्याच दिवसांनी त्यांनी वर सांगितलेल्या जिल्हा म्युनिसिपालिटी बिल आणि लँड रेव्हिन्यू कोडच्या दुरुस्तीचे बिल या दोन्ही प्रसंगी चांगलीच कामगिरी बजाविली होती. फेरोजशहांस त्यांची लायकी शितावरून भाताची परीक्षा या नात्याने करिता आलीच. या जागेसाठी इब्राहिम रहिमतुल्ला आणि बम्मनजी पेटिट हे वतनदार गृहस्थ उभे राहणार होते; परंतु फेरोजशहांनी त्यांची मने वळवून त्यांस तसे न करण्याची विनंती केली, आणि अशा रीतीने फेरोजशहा, टाइम्सचे संपादक मिस्टर बेनेट वगैरेंच्या सहाय्याने गोखले हे या जागेसाठी निवडून आले. ही निवडणूक एप्रिल १९०१ मध्ये झाली. गोखल्यांस समाधान झाले; आणि समाधानाबरोबर त्यांच्यावर जबाबदारीही येऊन पडली.

वरिष्ठ कायदेकौन्सिलात किंवा प्रांतिक कायदेकौन्सिलात जाण्यात सरकारबरोबर जबाबदारपणे झगडून जनसेवा करावयाची हा जरी गोखल्यांचा हेतू असला तरी या हेतूच्या आत दुसरा एक हेतू होता. मागे आम्ही सांगितलेच आहे की, गोखल्यांस इंग्लंडमध्ये चळवळ करावी, काम करावे असे वाटे; परंतु १८९७ च्या प्रसंगामुळे त्यांचे मन दुखावले होत. इंग्लंडमध्ये त्यांचे नाव बद्दू झाले होते आणि जरी त्यांनी माफी मागितली होती तरी लोक ‘हाच तो पूर्वीचा खोट्या कंड्या उठविणारा’ असे म्हणणार अशी त्यांस भीती वाटे. हा लोकांचा अंदेशा–गैरसमज कायमचा जावा आणि आपण एकदा (मनाच्या प्रामाणिकपणे जरी घसरलो नसलो तरी एकंदरीत) घसरलो, पण तेव्हापासून पुढे आपण जबाबदारपणेच सरकारवर टीका केली असून सरकारचा व लोकांचा विश्वास संपादन केला आहे हे त्यांस इंग्लंडमधील लोकांस दाखवून त्यांचे मन साफ करावयाचे होते. यामुळे त्यांस इंग्लंडात जाऊन काम करता आले असते. फेरोजशहांस लिहिलेल्या वरील पत्रात त्यांनी त्याप्रमाणे लिहिले आहे, आणि १८९७ पासून आपल्या मनात कसे कसे विचार घोळत आहेत याचे त्यांनी हृदयास पीळ पडेल अशा रीतीने वर्णन केले आहे.

त्या पत्राचा सारांश असा :—१८९७ च्या वावटळीत माझ्या डोक्यावर तर टीकांचा वर्षावच झाला. परंतु इंग्लंडमधील हाउस ऑफ कॉमन्समध्ये मजविषयी उच्चारलेले शब्द ज्या रात्री मी वाचले त्या वेळेस तापलेल्या सळईप्रमाणे ते माझ्या अंतःकरणात घुसले आणि मनाचा आगडोंब उडाला. त्याच वेळेस मी माझ्या मनाशी अशी खूणगाठ बांधून ठेविली की आपल्या करणीने ज्या इंग्लंडमधील चळवळीस धक्का बसला आहे, तीच चळवळ सोसायटीमधील आजन्म सेवाव्रताची परिपूर्णता होताच हातात घ्यावयाची. या कामासाठी वरिष्ठ कायदेकौन्सिलात जर मी गेलो तर बरे होईल. कारण मी इंग्लंडला गेलो असता माझ्याविरुद्ध काहूर माजेल खरे; परंतु लॉर्ड सँढर्स्ट यांचा शब्द, आणि प्रांतिक व वरिष्ठ कौन्सिलातील माझे सभासदत्व या गोष्टीमुळे हे काहूर आपोआप शमेल. माझ्या कौन्सिलमधील चळवळीने वेडरबर्न, ह्यूम, दादाभाई—ज्यांच्यावर माझ्या कृत्यामुळे माना खाली घालण्याचा प्रसंग आला—या सर्वांस आनंद होईल आणि म्हणून हे काम मी करणार आहे.

या पत्रावरून कौन्सिलमध्यें जाण्याने आपल्या आवडीच्या देशकार्यास आपणांस वाहून घेता यावे हा पवित्र हेतू गोखल्यांच्या मनात होता हे उघड होते. आपल्यावरील कलंक नाहीसा होऊन, आपल्या निःपक्षपातपणें व जबाबदारपणे काम करण्याच्या पद्धतीने अँग्लो इंडियन व इंग्लंडमधील लोक यांचा आपल्यावर विश्वास बसेल; आपला शब्द ते शांतपणे ऐकतील त्याचा विचार करितील; हुटहुट करणार नाहीत असे गोखल्यांस वाटत होते.

या पत्रात दुसरी गोष्ट त्यांनी सांगितली आहे ती ही की, डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या बंधनातून पार पडल्यावर आपले शेष आयुष्य देशसेवेत खर्च करावयाचे त्यांनी ठरविले होते. या गोष्टीस गोपाळरावांची घरची परिस्थितीही हातभार लाविती झाली. सोसायटीच्या कामाचे ओझे आणि रानड्यांची शिकवणूक या गोष्टीमुळे त्यांस प्रपंचाकडे फारसे लक्ष देण्यास सवड नसे. त्यांच्या द्वितीय विवाहानंतर ते पुण्यास सहकुटुंब राहात असत हे मागे सांगितलेच आहे. बाहेरच्या व्यापामुळे घरी मीठमिरची-पासून लक्ष देण्यास जरी त्यांस फावत नसले तरी ते उदासीन नसत.

गोखल्यांचे मृदू हृदय ज्यास म्हणून माहीत आहे त्यास असे कधीही वाटणार नाही. १८९१ साली त्यांना पहिला मुलगा झाला. परंतु हे फूल जो चिंतेने खंगले नाही, काळजीने काळवंडले नाही तोच काळाने परमेश्वरास नेऊन दिले. कॉलरिज या प्रतिभावान् कवीने असल्याच एका प्रसंगावर एकच श्लोक लिहिला आहे परंतु तो किती सुंदर व भावनापूर्ण आहे !

" Ere sin could blight or sorrow fade,
Death came with friendly care ;
The opening bud to Heaven conveyed
And bade it blossom there. "

गोखल्यांच्या हृदयास चरका बसला. पुढे १८९३ मध्ये शके १८१५ भाद्रपद शु० प्रतिपदेस त्यांची वडील मुलगी काशीबाई हिचा जन्म झाला. या मुलीबद्दल ते फार काळजी बाळगीत. मूल हिंडते फिरते होईपर्यंत जास्त जपावे लागते. खोकला, आंकडी, डबा इत्यादी रोगांना मुले फार बळी पडतात. घरी आले रे आले की मुलगी कशी आहे याची ते चवकशी करावयाचे. सर्व नीट कुशल आहे असे समजले की, त्यांचा जीव खाली पडावयाचा. परंतु काशी वर्षाची होत आहे, बोबडे शब्द बोलू लागून आईबापांस सुखवीत आहे, चालू लागून दुडदुड धावून सर्वांस आनंद देणार, तो तिला कठिण दुखणे आले. तो मुदतीचा ताप होता. घरातल्या सर्व मंडळींच्या तोंडचे पाणी पळाले. मुलगी हाती कशी लागते याविषयी सर्व माणसे चिंतातुर झाली. परंतु दैवाने खैर केली. ईश्वराने कठिण प्रसंग येऊ दिला नाही. काशीबाई बरी झाली. ती बरी होईपर्यंत गोखल्यांचे चित्त ठिकाणावर नव्हते. ते क्षणक्षणां माडीवरून खाली यावयाचे, पाहावयाचे व सुस्कारा टाकून माघारी जावयाचे. पहिले अपत्य गेलेले आणि दुसऱ्या मुलीवर तोच प्रसंग आलेला. या विचाराने आईबापांच्या हृदयाचे कसे पाणी पाणी होते याची कल्पना इतरांस काय होणार ? मुलगी बरी झाल्यावर गोपाळरावांचा आनंद गगनात मावेना. त्यांची दुसरी मुलगी गोदूबाई ही पहिल्यापासूनच अशक्त होती. ती गोखले निवर्तल्यावर फार दिवस जगली नाही. गोखल्यांची आई याच सुमारास म्हणजे १८९३–९४

साली हा लोक सोडून गेली. या माउलीची पतिनिष्ठा आम्ही प्रथमारंभी सांगितलीच आहे. ते आपल्या वडिलांचे धोतर गोपाळरावांनीही जपून ठेवले होते. आईविषयीं गोपाळरावांस फारच आदर व भक्ती वाटे. ज्या वाड्यात आई निवर्तली त्या भाटवडेकरांच्या वाड्यात गोखले जेव्हा जेव्हा जात, तेव्हा तेव्हा आपल्या आईच्या मृत्यूच्या खोलीत जाऊन ते साष्टांग नमस्कार घालीत. केवढी ही मातृभक्ती ! अशी मातृभक्ती अलीकडे किती विवाहित तरुणांमध्ये असते ? वडील माणसांबद्दल आदर त्यांच्या मनात फार असे आणि अलीकडे दुर्मिळ होणारा हा गुण गोपाळरावांमध्यें मरेपर्यंत कायम होता.

१९०० मध्ये गोपाळरावांचे द्वितीय कुटुंब निवर्तले. संसारातील जबरदस्त ओढा नाहीसा झाला. तोडावयास कठिण अशी ग्रंथी आपोआप तुटली. संसारामधील माया आपण सोडू म्हणता सोडता येत नाही. समर्थांचे " चपलपण मनाचे मोडिता मोडवेना ! कठिण स्वजनमाया तोडिता तोडवेना " हे शब्द किती सत्य आहेत ! गोपाळरावांनी मेथांस पत्र लिहिले त्या वेळेस त्यांची पत्नी इहलोक सोडून गेली होती. त्यांचे गुरु रानडे मृत्युशय्येवर होते. अशा प्रसंगी गोपाळरावांच्या मनात कोणते विचार खेळत होते ? गोपाळकृष्णाने यशोदेला ज्याप्रमाणे विश्वरूपदर्शन घडविले त्याप्रमाणे येथे या गोपाळ कृष्णाला रानडे, आगरकर यांच्या सहवासाने विश्व दिसू लागले होते. छोटा संसार डोळ्यांपुढे न येता देशाचा संसार दिसू लागला. आपलीच मुले डोळ्यांसमोर न खेळता देशातील अजाण मुले खेळू लागली. देशासाठी शेष आयुष्य घालवावे, फकिरी पतकरावी असे ते मनांत म्हणू लागले. फर्ग्युसन कॉलेजमधील मुदतही संपत आली होती. कॉलेजमधून तीस रुपयांचे पेन्शन मिळणार होते आणि गणिताच्या पुस्तकाबद्दल त्यांस महिना १००–१२५ रुपये मिळत असत. या पैशावर त्यांचे व कुटुंबातील मंडळीचे भागणार होते. तेव्हा तीही कटकट नव्हती. मेथांच्या राजीनाम्यामुळे १८९७ पासून मनात येणारे विचार बळावले. निःसंगत्वाची त्यांनी तयारी केली आणि लंबकाप्रमाणे आशानिराशांच्या लाटांवर मन हेलकावत असता त्यांनी फेरोजशहांस पत्र लिहिले.

# वरिष्ठ कायदेकौन्सिलात प्रवेश

पत्राचे काम झाले आणि गोपाळराव हे वरिष्ठ कायदेकौन्सिलात निवडून आले. १९०२ पासून त्यांच्या वरिष्ठ कायदेकौन्सिलातील कामास सुरुवात झाली. ते काम आमरण चालले. फर्ग्युसन कॉलेजमध्ये त्यांचा संबंध कमी कमी होत गेला. कॉलेजमधील त्यांचे शेवटचे व्याख्यान सप्टेंबर महिन्यात झाले. विद्यार्थ्यांस फार वाईट वाटले. गोखल्यांस जरी इंग्रजी वगैरे इतर विषय मनोरंजकपणे शिकविता येत नसले तरी त्यांची इतिहास, अर्थशास्त्र यांवरील व्याख्याने फार सरस वठत. इतिहास शिकविताना ते नेहमी तुलनात्मक पद्धतीने शिकवावयाचे. आयर्लंड वगैरे देशांची व हिंदुस्तानची तुलना करून त्यांत साम्य किती आहे आणि विरोध कोठे आहे हे अचूक पटवून द्यावयाचे. इंग्लंडच्या इतिहासाचा त्यांस फार अभिमान. आपल्याकडील इतिहास म्हणजे रक्तपात, खून, लुटालूट व आपसातील भांडणे यांनी येथपासून तेथपर्यंत भरलेला. थोडेफार अपवाद सोडले तर जो तो आपल्या पोळीवर तूप ओढण्यास सवकलेला. लोकांच्या हक्कांचे समर्थन येथे झालेच नाही. आपणास काही हक्क आहेत याची लोकांसही जाणीव नाही. परतु इंग्लंडकडे पाहा ! आपल्या हक्कांच्या समर्थनासाठी हॅम्पडनसारखे लोक पुढे घुसतात; राजाची आहुती पडते. आपले धर्मरक्षण होत नाही म्हणून लोक परकी देशात हजारो मैल लांब जाऊन वसाहत करतात, जंगले तोडतात, नवीन संसार थाटतात आणि मायभूमीने नवीन नवीन कर बसविले तर 'No representation, no taxation' म्हणजे, 'ना हक्क, ना कर' असा रोख जबाब देऊन जबरी होऊ लागताच, लष्करी शिक्षण नीट मिळाले नसले तरी सर्व लोक दंड थोपटून 'हा आपला मायदेश आहे' ही कल्पना बाजूस ठेवून, युद्धास सिद्ध

होतात ! देवासाठी नातीगोती दूर करावी, तसेच आपल्या नैसर्गिक आणि रास्त हक्कांची पायमल्ली होत असता, आपली विनाकारण गळचेपी होत असता, कोणता स्वाभिमानी पुरुष स्वस्थ बसेल ? इंग्लंडच्या इतिहासाचे गोखल्यांनी फार मनन केले होते. त्याचप्रमाणे अर्थशास्त्रावरही त्यांचा दांडगा व्यासंग. रानडे आणि ग. व्यं. जोशी यांच्याजवळ सर्व प्रश्नांचा त्यांनी साधकबाधक रीतीने ऊहापोह केलेला. या सर्व गोष्टींमुळे त्यांची शिकवणूक अधिकारी शिक्षकाप्रमाणे असे. त्यांच्या अस्खलित आणि सुंदर भाषापद्धतीने मुलांस फार आनंद वाटे. असा योग्य शिक्षक आपल्यामधून जावा याची विद्यार्थ्यांस साहजिकच खिन्नता व उद्विग्नता वाटली. परंतु खालच्या पायरीवरून ते वरच्या पायरीवर जात आहेत, हिंदुस्थानच्या कारभाराची दिशा कशी असावी याचे शिक्षण सरकारास देण्याकरिता आपले गुरुजी जात आहेत या विचाराने त्यांस आनंदही झाला. गोखल्यांनी सप्टेंबरमध्ये शेवटचे भाषण करून दोन वर्षांची फर्लो घेतली. १९ सप्टेंबर रोजी विद्यार्थ्यांनी त्यांस मानपत्र अर्पण केले. त्यास उत्तर देताना गोखल्यांचे गोड व मृदू मन भरून आले. ज्या शिक्षणसंस्थेत आगरकर, टिळक यांच्या थोर उदाहरणामुळे आपण शिरलो, टिळक सोडून गेले असता आणि पुढे आगरकर–केळकरांसारखे मोहरे अकाली निवर्तले असता, जिची धुरा आपणावर घेतली, जिच्यासाठी नाना कष्ट करून पैसा जमा केला, जिच्यासाठी पैशानेही न मिळणारी अशी नवीन विद्वान माणसे गोळा केली, ज्या शिक्षणसंस्थेची सर्वतोपरी भरभराट व्हावी म्हणून आपल्या आयुष्यातील ऐन उमेदीची, उत्साहाची—ज्या वेळेस लाथ मारू तेथे पाणी काढू असा हिय्या असतो, मान मिळवू पैसा कमावू, लोकांस चकित करू अशी महत्त्वाकांक्षा असते—अशी वर्षे निरपेक्षपणे तनमनधन खर्च करून वाहिली, जेथे आपले मित्र आणि आपले लाडके शिष्य होते ते सर्व सोडून आज त्यांस जावयाचे होते. जुने बांधलेले घर सोडून पुनः नवीन घर बांधण्यास जावयाचे होते. कॉलेजमधील कामात विशेष दगदग नव्हती; काळजी नव्हती. विद्यार्थी बरे, आपली पुस्तके बरी, आपले काम बरे. आता ते लोकांपुढे जाणार होते. सरकारपुढे छातीवर स्वस्तिकाकार हात ठेवून झगडण्यासाठी ते जाणार होते. स्वतःच्या जबाबदारीची त्यांस जाणीव

होती. त्यांनी आपल्या भाषणात तुफान दर्यात होडी लोटणाऱ्या कोळ्याची गोष्ट सांगितली. क्षणात पर्वतप्राय लाटांच्या 'आ' पसरलेल्या जबड्यात आपण गिळंकृत होणार असे त्यास वाटते तर दुसऱ्या क्षणी त्याची होडी लाटांवर, समुद्राच्या वक्षःस्थलावर मोठ्या डौलाने डुलत असते. आपल्या कामगिरीत यश मिळणार का अपयश पदरी पडणार या विचाराने त्यांचे मन खालीवर होत होत होते. परंतु आशानिराशा बाजूस ठेवून यश मिळो वा अपयश येवो; आपले पवित्र कर्तव्य म्हणून मी जात आहे असे त्यांनी सांगितले, आणि या जबाबदारीच्या कामातून—या दिव्यातून—ते यशस्वीपणाने अलौकिक यशाने बाहेर पडले. कौन्सिलमध्ये काम करावयाचे, लोकांमध्ये राजकीय चळवळ चालू करावयाची हे काम अत्यंत त्रासाचे आणि जिकीरीचे असते. लोकांत तर मतामतांचा गलबला माजलेला; धर्मांप्रमाणे समाजातही नाना पंथ बोकाळलेले आणि एकमेकांवर टीका करण्यास अस्तन्या सारून सरसावलेलेले. 'जो तो बुद्धिच सांगतो,' अशी जेथे स्थिती आहे तेथे आपले म्हणणे कितपत ऐकू जाईल; जेथे सरकारी अधिकारीही कठोर आणि अधिकाराने मगरूर आणि फार शहाणे, तेथे आपण कसे वागले पाहिजे याची गोखल्यांस फार चिंता वाटत होती. परंतु आता आपल्या मनातील कार्यास वाहून घेताना कोणाच्याही टीकेस भीक न घालण्याचे त्यांनी ठरविले. टीकांचा पाऊस कोसळला, निंदांचा कडकडाट झाला तरी आपले कार्य बरे की आपण बरे असे त्यांनी मनात पक्के ठसविले. कशाचीही क्षिती न बाळगिता, जो मार्ग आपणास हितप्रद, व कल्याणकर असा दिसतो आहे, जो आपल्या पूज्य व दूरदृष्टी गुरूने चोखाळला आणि आपणास व जो पाहील त्यास दाखविला, त्या मार्गाने सदसद्विवेक बुद्धीस अनुसरून लोभालोभ दूर ठेवून जाण्याचे आणि लोकांस नेण्याचे त्यांनी ठरविले. स्वतःच्या ध्येयावर एकान्तिक निष्ठा ठेवून, कधी उल्लसित मनाने तर कधी पोळलेल्या मनाने, आपले काम १९०२ पासून मरेपर्यंत या थोर पुरुषाने केले. तो इतिहास फार हृदयंगम—कधी उद्विग्न करणारा तर कधी थरारून सोडणारा असा आहे. त्या इतिहासाकडे आता आपण वळले पाहिजे. येथे जाता जाता एक गोष्ट सांगावयाची ती ही की, गोखले हे आता आजपर्यंतच्या आपल्या चळवळीचे स्थान जे पुणे ते सोडून मुंबईस कायमचे राहण्यास जाणार

होते. मेथा वगैरेंचाही आग्रह होता. परंतु पुण्याच्या मित्रांची फार गळ पडली, आणि त्यांस पुणे म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष याच वर्षी निवडल्यामुळे मुंबईस जाण्याचा बेत कायमचा मागे पडला.

या वेळेस हिंदुस्तानची सूत्रे लॉर्ड कर्झन साहेबांच्या हातात होती. एका लेखकाने असे म्हटले आहे की, जर लॉर्ड कर्झनमध्ये आहे त्याच्यापेक्षा कमी घमेंड असती तर ते फारच मोठे गृहस्थ झाले असते. मोठेपणाबरोबर थोरपणाही त्यांच्यामध्ये आहे असे जगास दिसले असते. हिंदुस्तानच्या व्हाइसरॉयपदावर केव्हा ना केव्हा तरी अधिष्ठित होईन अशी महत्त्वाकांक्षा बालपणापासून त्यांनी धरिलेली. ती महत्त्वाकांक्षा सफल झाली होती. लहानपणचे मनोहर मनोरे खरोखरच उभारले गेले. कर्झनसाहेबांस धन्य वाटले असेल. तेहतीस कोटी लोकांचा मी अधिकारी, अनेक संस्थानिक माझ्याशी रुंझी घालावयास तयार. हा वैभवशाली देखावा पाहून त्यांना आवेश चढला. मोठमोठे बेत त्यांनी केले होते. निरनिराळे बारा सुधारणाप्रकार त्यांनी जाहीर केले होते. हळूहळू ते पोटातून बाहेर येत होते. आपण म्हणू ते करू आणि जे करू ते शहाणपणाचे, दुसऱ्यास त्यात सुधारणा सुचविण्याची किंवा ढवळाढवळ करण्याची योग्यता अगर अक्कल मुळीच नाही असे त्यांस स्वाभाविक वाटत असे आणि जे काही करावयाचे ते सर्व देशात व्यवस्था राहावी, घडी उसकटू नये म्हणून अशी त्यांची समजूत होती.

अशा या अनाठायी बाणेदारपणा बाळगणाऱ्या गृहस्थासमोर गोखल्यांस जावयाचे होते. कर्झनसाहेबास ‘आजपर्यंतच्या सर्व गव्हर्नर जनरलांमध्ये आपण वयाने लहान आहो असा अभिमान वाटे. त्यांचे वय फक्त ४३ वर्षांचे होते ! गोखल्यांचे वयही फार नव्हते. ते ३६ वर्षांचे म्हणजे कर्झनसाहेबां-पेक्षा सात वर्षांनी लहान होते. कर्झन साहेबात तडफदारपणा व तरतरीतपणा होता. आणि गोखल्यांच्या तोंडावरही विद्वत्तेचे तेज चमकत असे, पाणीदार-पणा एकवटलेला दिसे. कर्झन अरेराव व ताठेबाज; गोखले मनमिळाऊ, नेमस्त परंतु योग्य प्रसंगी भीडभाड न ठेवणारे. कर्झनसाहेबास एतद्देशीय म्हणजे गोऱ्यांच्या पदकमलासभोवार रुंझी घालणारा वाटे; तर गोखले हे खरे भारत-सेवक आपल्या देशास समान दर्जा प्राप्त व्हावा यासाठी अव्याहत झगडणारे. अशा या दोघां वीरांचा कौन्सिलमध्ये मोठा प्रेक्षणीय संग्राम होई.

गोखल्यांची वरिष्ठ कौन्सिलातील सर्वश्रेष्ठ व अत्यंत महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्यांची अंदाजपत्रकांवरील भाषणे. सरकारचे अंदाज-पत्रक वाचण्यात आले की हा आकडेबहाद्दर त्या पत्रकावर अशी काही टीका करी की, सरकारास तोंड उघडता येऊ नये. गोखल्यांचे अंदाज-पत्रकावरील पहिले भाषण १९०२ मार्चमध्ये झाले. १८९० च्या सुमारास बजेटात तूट येत असल्यामुळे काही नवीन कर बसविण्यात आलेले होते. मिठावर कर, प्राप्तीवर कर, जमिनीवरील साऱ्याची वाढ या सर्व गोष्टी करण्यात आल्या होत्या. परंतु अलीकडे दोनतीन वर्षे तूट न येता दरवर्षी भरपूर शिल्लक पडत चालली होती. हिंदुस्तान सरकार म्हणजे कोठेही न आढळणारे उधळे सरकार. अशा या सरकारजवळसुद्धा शिल्लक राहू लागते हे जगातील सात आश्चर्यांच्या जोडीचे आठवे आश्चर्य होय ! हिंदुस्तानची भरभराट होत आहे, देश सधन होत चालला असून माझ्या कारकीर्दीत रामराज्य आहे असे कर्झनसाहेबांनी सांगण्यास सुरुवात केलीच असेल ! परंतु जगात–प्रजेत काय चालले आहे याची सिमल्यास राहणाऱ्या शंभूस काय कल्पना असणार ? लोक पिळवटून चालले आहेत, मिठासारख्या अत्यंत आवश्यक वस्तूवरही जबरदस्त कर बसवावे, सरकारजवळ पैसा उरत असला तरी कराचे ओझे यत्किंचित्‌ही कमी होऊ नये ! खरोखरच भाग्य आम्हा हिंदुस्तानच्या लोकांचे ! ! सरकारास हिंदुस्तानातील लोकांची पर्वाच नाही. बेगुमान व बेपर्वा बनून प्रजेला जळवा लावून पैसे उकळावयाचे आणि सिमल्यास देशसंपन्नतेचा नगारा बडवावयाचा ! ‘ क्वचिद्वीणावादः क्वचिदपिच हाहेति रुदितम् ’ अशातलीच ही स्थिती. जो पैसा घेण्यात येतो त्याच्या शतांश तरी रयतेच्या खऱ्या कल्याणा-साठी खर्च करण्यात येतो काय ? शिक्षण, आरोग्य, शेतकी, उद्योगधंद्यास भांडवल-सर्वत्र नकारघंटाच घणघणत आहे. वाहवा रे मायबाप सरकार ! सरकारची जावई–खाती लष्कर आणि सिव्हिल सरव्हंट. यांच्या अवाढव्य खर्चात किती पैसा गडप झाला तरी खळगा भरतो आहे कोठे ? गोख-ल्यांनी या सर्व गोष्टी प्रमाणे देऊन सिद्ध केल्या. लोकांचे कर कमी झाले पाहिजेत, लोकांस जास्त मोठ्या पगाराच्या जागा देण्यात आल्या पाहि-जेत, शिक्षणाकडे कानाडोळा करू नये, सरकारने सैन्य कमी करावे

आणि जे राहील त्या सैन्याच्या खर्चापैकी बराचसा बोजा इंग्लडने सोसावा. १८८५ मध्ये ३०००० सैन्य वाढविले. कशास तर म्हणे रशियाचा बागुलबोवा आहे म्हणून ! रशियाचा बागुलबोवा दूरच राहिला. परंतु या आधीच भिऊन गेलेल्या सरकारने जे नवीन लष्कर ठेवले त्याचा खर्च चालावा म्हणून मात्र कर वाढविण्यात येतात ! आणि रशियन पिशाच्चाची भीती नाहीशी झाली तरी हिंदुस्तानच्या रयतेच्या छाताडावर नंगा नाच घालणारे हे करांचे भूत ! याला मात्र मूठमाती देण्यात येत नाही ! केवढी लोककल्याणाची तयारी ! यासाठीच आम्ही या सरकारचे ऋणी असावयाचे काय ? लोकांनी पोटास चिमटा घेऊन दिलेले कर लष्करच्या लाडक्या लोकांच्या सुखसोयींसाठी खर्च व्हावे ना ? कर्झनसाहेब मोठा उपदेशाचा आव आणून धीरगंभीर वाणीने सांगतात, ‘ हिंदुस्तानाने संकुचित राष्ट्राभिमानाची दृष्टी अतःपर टाकून व्यापक साम्राज्याभिमानाची दृष्टी ठेवावी. ’ हे शब्द बोलताना कर्झन शुद्धीवर होते की नाही कोण जाणे ? किंवा हिंदुस्तानी लोकांस आपण गव्हर्नर जनरल असल्यामुळे सांगू ते रुचेल व पटेल असे तरी त्यांस वाटले असावे. हिंदुस्तानने साम्राज्याभिमान कशासाठी बाळगावयाचा ? आफ्रिकेत, कानडात, आस्ट्रेलियात सर्वत्र वसाहतींमध्ये हिंदू लोकांच्या होणाऱ्या अनंत यातनांसाठी तर नव्हे ? एतद्देशीय लोक म्हणजे पशूच असे समजण्याची उदारता हे वसाहतवाले दाखवतात म्हणून की काय ? परंतु लांब कशाला, प्रत्यक्ष हिंदुस्तानात लोकांच्या डोक्यावर सदैव दंडुका उगारलेला असतो, तेव्हा या परम भाग्यासाठीच आम्ही साम्राज्याभिमान बाळगावयाचा ना ? हिंदुस्तानास दूर अस्पृश्याप्रमाणे वागवीत असता साम्राज्याचा अभिमान धरण्यास सांगणे म्हणजे दुःखावर डागण्या देणे आहे, जखमेवर मीठ चोळणे आहे. हिंदू लोकांस मन नाही, बुद्धी नाही, विचार नाही, भावना नाही, असेच या कर्झनसाहेबांस वाटले असावे. लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकणे, पांडित्याचे प्रदर्शन करणे, आपण तुमच्यापेक्षा किती वर आहो, किती अप्राप्य आहो हे दाखविणे कर्झनसाहेबांचे पवित्र कर्तव्य असे. गोखल्यांनी आकडे देऊन सिद्ध केले की, १३७० (एक हजार रुपयांपेक्षा जास्त पगाराच्या) जागांपैकी फक्त ९२ एतद्देशीय

लोकांस देण्यात आलेल्या आहेत. हा निःपक्षपातपणाचाच प्रकार आहे काय ? तरी आमचे कर्झनसाहेब सांगतात : ‘ छेः छेः आमच्या येथे पक्षपात नाही. सर्वांस सारखे बागाविण्यात येते. हिंदू लोकांस भरपूर जागा देण्यात येतात; देण्यात येत नाहीत असे म्हणणे खोडसाळपणाचे आहे. असे हृदय-भेदक प्रकार पाहिले म्हणजे संताप येतो. परंतु सत्तेपुढे शहाणपणा नाही. आंकड्यांशी काय करावयाचे ? मी सांगतो आहे ना की भरपूर जागा देण्यात येतात म्हणून ? हिंदू लोकांस खरेपणा माहीत आहे कोठे ? माझे वाक्य ब्रह्मवाक्य आहे आणि इतर लोक जरी सत्य सत्य असे सांगत असले तरी ती माया आहे ! हिंदू लोक म्हणजे खोटे बोलणारे असा एक शेरा त्यांनी दिलाच आहे. परंतु अमृत बझार पत्रिकेने वेळीच कोरियातील आठवण देऊन त्यांचे दात त्यांच्याच घशात घातले हे बरे झाले. गोखल्यांची ही अंदाजपत्रकावरील भाषणे लांबच लांब असत. कारण ते म्हणतात, “ This is the only day in the year when the non-official members of the council find an opportunity to place before Government their views, such as they may be in regard to the more important questions connected with the administration of India. ” सरकारपुढे राज्यकारभारासंबंधी आपले जे विचार असतील ते मांडण्यास हीच एक वेळ असते. यामुळे जेवढे सांगावयाचे असेल ते सर्व या वेळेस गोखले सांगून टाकीत. दरवर्षी सरकारचे तेच तेच दोष न कंटाळता ते पुनः पुनः दाखवीत. सर्व चुकांचा पाढा पुनः वाचीत. आपण जेव्हा कानीकपाळी ओरडू तेव्हा हैदोस घालणाऱ्या सरकारचे आपल्या म्हणण्याकडे अल्पस्वल्प तरी लक्ष जाईल हे गोखल्यांस पूर्णपणे समजले होते. यामुळे ते आपल्या कर्तव्यनिष्ठेत क्षणभरही कसूर करीत नसत. ‘ शिल्लक पडत चालली, कर कमी करा, लोकांस जास्त जागा द्या, शिक्षणाकडे जास्त खर्च करा, लष्कर कमी करा, शेतकऱ्यांची स्थिती सुधारा ’ ही सूत्रे मांडून त्यांच्यावर ते नीट व्यवस्थित भाष्य करावयाचे.

दरवर्षीप्रमाणे १९०३ सालचे अंदाजपत्रकावरील भाषण झाले. परंतु या वर्षी महत्त्वाचे नवीन कायदे पास करावयाचे होते. ४ डिसेंबर १९०३

च्या बैठकीत 'ऑफिशिअल सीक्रेट्स अ‍ॅक्ट' वर — सरकारी गुपितांच्या कायद्यावर—गोखल्यांनी सणसणीत टीका केली. १८८९ मध्ये हा कायदा सौम्य स्वरूपात सिमल्यास पास झाला होता, कारण त्या वेळी तेथे विरोध करण्यासच कोणी नव्हते. कोणतेच हक्क त्या वेळेस मिळविण्यास लायक कायदेमंडळे नव्हती ! हा 'सरकारी गुपितांचा कायदा' एतद्देशीयांसच निंद्य वाटला असे नव्हे तर इंग्लिशमनसारखे गोरे वर्तमानपत्र म्हणते :— "This bill is calculated to Russianize the Indian administration and it is inconceivable that such an enactment can be placed on the statute book even in India." 'या कायद्याने हिंदुस्तानात झारशाही सुरू होणार. कायदेपुस्तकाला या कायद्याचा विटाळही होऊ देऊ नये !' या वर्तमानपत्राचे जर हे शब्द तर आम्हा हिंदुस्तानवासियांस या कायद्यावर टीका करण्यास कठोर असे शब्द तरी कोठे उरले ? गोखल्यांसारख्या धिम्या व शांत राहणाऱ्या माणसासही या बिलाचा संताप आला.

The present bill proposes to make alterations of so astounding a nature in that Act ( of 1889 ) that it is difficult to speak of them with that restraint which should characterise all utterances in this Chamber. 'या दिवाणखान्यात मनास व जिभेला जो लगाम घालावा लागतो, तो लगाम ओढून धरणे हे अशक्य झाले आहे' असे शब्द गोखल्यांनी काढले. आजपर्यंत लष्करी आणि आरमारी खात्यामध्येच फक्त गुप्तपणा असे, आणि असे कायदे सर्वत्र असतात. परंतु दिवाणी खात्यांतही गुप्तता ठेवणे म्हणजे जगाविरहित वागणे होय. सर्व दिवाणी कारभारही लष्करी पद्धतीवर सरकार नेऊ पाहत होते. तालुक्यातील तलाठ्यापासून तो गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलपर्यंत ज्या प्रश्नांची व्याप्ती असते त्या प्रश्नांसही लष्करी स्वरूप देणे म्हणजे अविचार व वेडेपणा यांचा कळस होय. या कायद्यात आणखी एक विषारी दात होता. जर का सरकारची बिंगे वर्तमानपत्रकर्त्यांनी चव्हाट्यावर आणिली तर त्यांस प्रसंगोपात्त शिक्षा करण्याचा अधिकार या बिलाने सरकारास मिळणार होता. हिंदुस्तानातील वर्तमानपत्रांच्या संपादकांवर या कायद्याने केवढी आपत्ती कोसळत आहे

याचे गोखल्यांनी वर्णन केले. इंग्लंडमध्ये सरकार जनहितास बाध घालणारे कोणतेही कृत्य करणार नाही असा लोकांस भरवसा असतो. परंतु हिंदुस्तानसारख्या देशात असे थोडेच आहे? परंतु सत्तेपुढे सर्व उपाय हरतात. सरकारच्या कृत्यांस अल्प–स्वल्प आळा घालू पाहणाऱ्या वर्तमानपत्रकर्त्यांस अशा रीतीने जखडून टाकणे म्हणजे शुद्ध राक्षसी जुलूम होय. वर्तमानपत्रकर्त्यांस पकडण्यात आल्यावर त्यास जामिनावरही खुले करावयाचे नाही! एकदम गिरफदार आणि खटला!!

गोपाळरावांच्या भाषणानंतर हे बिल नेहमीच्या पद्धतीप्रमाणे एका सिलेक्ट कमिटीकडे सोपविण्यात आले. त्यात फेरफार करून ते पुनः ४ मार्च १९०४ मध्ये मांडण्यात आले. त्यातही गोखले, बोस, आणि नबाब सय्यद महंमद यांनी काही महत्त्वाचे फेरफार सुचविले. पण साऱ्या सूचनांस वाटाण्याच्या अक्षता लावण्यात आल्या. शेवटच्या वाचनासाठी बिल पुनः आले. गोखल्यांनी परोपरीने सांगितले की ‘ या बिलाला सर्वप्रांतीय सभासदांचा कसून विरोध आहे. अशा तऱ्हेचे एकमत आजपर्यंत कोणत्याही प्रश्नावर केंद्रीभूत झाले नव्हते. अशा एकवटलेल्या मताला कःपदार्थ लेखणे म्हणजे अनुदारपणाची व बेपर्वाईची कमाल होय. अँग्लोइंडियन वर्तमान-पत्रांनीही या बिलाची दया क्षमा केली नाही. त्यांनीही सडकून टीका केली. देशातील सर्व समंजस व विचारी लोकांच्या विचारास काडीचाही मान न देता आपलेच म्हणणे रास्त आहे असे समजून त्याचेच समर्थन करावयाचे यास काय म्हणावे ते आम्हांस समजत नाही, असे गोखल्यांनी म्हटले. परंतु सरकारला किती जरी विरोध केला तरी जोपर्यंत कौन्सिलची रचना दोषयुक्त आहे, जोपर्यंत लोकनियुक्त प्रतिनिधींस लोकमत फक्त प्रगट करण्याचीच परवानगी व तीही मर्यादित–दिलेली आहे तोपर्यंत सरकार सत्तेच्या जोरावर कोणतेही बिल पास करण्यास समर्थ आहे. लोकांस जे फेरफार कल्याणप्रद होतील तेच आम्ही करणार असा गव्हर्नर जनरल किंवा आमचे सरकार आव मात्र घालते, परंतु प्रत्यक्ष प्रकार मात्र हरघडी विपरीत होतो. हिंदुस्तानच्या लोकांस स्वतःचे हिताहित कळत नाही. परमेश्वर सरकारच्या पवित्र आणि निष्कपट अंतःकरणात या तेहतीस कोटी रयतेच्या हिताचा मंत्र देतो आणि तो मंत्र प्रजेच्या गळी बांधावयाचाच!

मुलाच्या थोबाडीत मारून जसा बाप त्यास स्वशब्दानुसार वागावयास लावतो तद्वत् आमचे वयस्क सरकार आम्हांसही बोंडल्याने दूध पिणाऱ्या मुलाप्रमाणेच समजते ! ! याच वर्षी दुसरे एक महत्त्वाचे बिल पुढे आले. ते म्हणजे युनिव्हर्सिटीच्या पुनर्घटनेसाठी एक कमिटी नेमण्याचे. हा ठराव १९०३ डिसेंबरच्या बैठकीत मांडला गेला. या ठरावाची कहाणी किंवा कुळकथा प्राचीन आहे. १९०० मध्ये कर्झनसाहेबांचे कलकत्त्याच्या युनिव्हर्सिटीत चॅन्सेलर या नात्याने भाषण झाले. त्यांत त्यांनी अलीकडच्या पदवीधरांवर खूप टीका करून घेतली. असे पदवीधर ज्या विद्यापीठांतून निर्माण होतात त्या विद्यापीठांची पुनर्रचना करावी म्हणजे ती सरकारच्या ताब्यात असावी असा सूर त्यांनी काढला. यानंतर सिमल्यास शिक्षणविषयक विचार करण्यासाठी एक कॉन्फरन्स भरविण्यात आले. या कान्फरन्समध्ये सर्व सरकारी अधिकारी होते, नाही म्हणावयास एक अपवाद होता. मद्रासच्या ख्रिश्चन कॉलेजमधील डॉ. मिलर हे गृहस्थ या कान्फरन्ससाठी निमंत्रित होते. परंतु ते सुद्धा गोरेच ! एतद्देशीय लोकांनी खासगी प्रयत्नांनी चालविलेल्या कित्येक संस्था होत्या, परंतु कोणासही आमंत्रण नव्हते ! या कॉन्फरन्समध्ये वाटाघाट होऊन कमिशन नेमावयाचे ठरले. या कमिशनचे सर थॉमस रॅले हे अध्यक्ष होते. या कमिशनमध्ये एकही एतद्देशीय गृहस्थ नव्हता. फक्त शेवटी कलकत्त्याचे जज्ज गुरुदास बानर्जी हे नेमण्यात आले होते. परंतु तेही सरकारचे नोकर. मिशनऱ्यांचे प्रतिनिधी डॉ. मॅकिकन हे होते. या सरकारी कमिशनमधील लोकांच्या नेमणुकीमुळे जनतेत असमाधान उत्पन्न झाले. आम्हांस काही अक्कल नाही काय ? आम्ही केवळ कवडीमोल आहो ? आमच्या प्रत्येक गोष्टीचा यांनी विचार करावा आणि त्या शिफारशी आमच्या बोडक्यावर ठेवाव्या हे काय ? या कमिशनमुळे सरकारच्या मनात काही तरी काळेबेरे असावे अशी साहजिकच लोकांस शंका आली. या कमिशनला फेरोजशहा मेथा आणि चिमणलाल सेटलवाड यांनी लेखी जबाब पाठविले होते. उलट तपासणीतही त्यांनी जे लिहून दिले होते तेच ठणठणीतपणे पुनः सांगितले. कमिशनचा रिपोर्ट १९०२ जूनमध्ये तयार झाला. या कमिशनच्या बहुतेक सूचना 'फी वाढवावी, परीक्षा पास होण्यासाठी लागणारे गुणकोष्टक वाढवावे, सिंडिकेटची व सीनेटची पुनर्घटना करावी,

युनिव्हर्सिटीस जोडण्यात येणाऱ्या निमसरकारी शाळांसाठी कडक नियम असावे ' अशा प्रकारच्या होत्या. म्हणजे एकंदरीत अनेक कुसकट कल्पना व युक्त्या लढवून खासगी शिक्षणसंस्था खची करण्याचा हा शास्त्रशुद्ध व कायदेशीर प्रयत्न सरकारास करावयाचा होता.

कमिशनच्या रिपोर्टाची एकेक प्रत प्रांतिक सरकारकडून युनिव्हर्सिटीकडे पाठविण्यात आली. युनिव्हर्सिट्यांनी या रिपोर्टाचा विचार करण्याकरिता कमिशनें नेमली. मुंबई विद्यापीठाने जी कमिटी नेमिली त्यात फेरोजशहा होते. त्यांनी सर्वांच्या म्हणण्याची एकवाक्यता केली. कमिटीमधील गोरे सभासदही मेथापक्षास वळले. गोखले या वेळेस कलकत्त्यास होते. मुंबईच्या कमिटीचे एकमत आणि तेही मेथांप्रमाणे झाले असे जेव्हा त्यांनी ऐकिले तेव्हा त्यांनी मेथांस अभिनंदनपर पत्र लिहिले :

' That you should have got the European members of the committee to join in all your criticisms and proposals, except one, is a remarkable triumph for us all and everybody must recognise that it has been achieved mainly owing to your great tact and influence and your powerful personality. It is felt here that if the Bombay Senate adopt their report–as most probably will now be the case—the opposition to the commission's recommendations will be enormously strengthened. They have no hope here of getting their own Senate to condemn the report as ours has done or rather will shortly do and the difference in calibre and political grit between their leaders and ours is therefore at present being freely recognised here. You know how emotional these people are and how easily swayed. ' या पत्रात गोखल्यांनी त्या वेळच्या बंगालच्या राजकीय पुढाऱ्यांच्या मध्ये व आपल्याकडील पुढाऱ्यांच्या मध्ये असणारा फरक दाखविला आहे आणि बंगाली लोकांच्या भावनाप्रधान स्वभावाचे जाता जाता दिग्दर्शन केले आहे.

परंतु अखेर सर्व विरोधास धाब्यावर बसवून—युनिव्हर्सिटी सुधारणा करण्यासाठी कमिटी नेमण्याचे बिल २ नोव्हेंबर १९०३ मध्ये मांडण्यात आले. थॉमस रॅले साहेबांनी 'कोणत्याही संस्थेस असे वाटत नसते की, आपणामध्ये दोष आहेत आणि ते सुधारले पाहिजेत,' ('No corporate body cares to admit that its constitution needs improvement.') असे सांगितले. सरकार शिक्षणाची खर्ची करीत आहे अशी ओरड करणाऱ्यांवर कर्झनसाहेबांनी तोंडसुख घेतले. सरकारच्या मनात लवमात्र पापबुद्धी नाही; तुमच्या कल्याणाचे मार्गच ते आखीत आहे असे त्यांनी सांगितले. गोपाळरावांनी डिसेंबरच्या बैठकीत या बिलास कसून विरोध केला. मुंबईस मेथांचे जोरदार भाषण झाले. परंतु अरण्यरुदनाला कोण विचारतो? इंग्लिशमन पत्राने सुद्धा अशी कबुली दिली की 'One of the main objects of the proposed reforms was that the direction of University education should thenceforward be under the domination of the Government through such a new constitution as may be established by legislation.' शेवटी १९०४ मध्ये कायदेशीरपणे युनिव्हर्सिट्यांवर नवीन कायदे लादण्यात आले. युनिव्हर्सिटी सरकारची हस्तक बनली. युनिव्हर्सिटीच्या सीनेटमध्ये आपणांस कोण दिसणार—तर चॅन्सलर, सरकारनियुक्त सभासद, हायकोर्टाचे न्यायाधीश, बिशप, एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलाचे सभासद, शाळाखात्याचे प्रांतिक अधिकारी व सरकारी आणि मिशनरी विद्यापीठातील आचार्य. लोकांच्या प्रतिनिधींचे नावही नको!

१९०४ च्या जुलै महिन्यात गोखले कॉंग्रेसचे जॉइंट सेक्रेटरी असल्यामुळे मद्रासच्या बाजूस गेले. मद्रासला त्यांचे जंगी जाहीर स्वागत करण्यात आले. मुंबईच्या प्रांतिक कौन्सिलात दुष्काळग्रस्त लोकांची त्यांनी सांगितलेली कष्टप्रद कथा, म्युनिसिपल कायद्यासंबंधी त्यांनी केलेले विवेचन, वरिष्ठ कायदेकौन्सिलात सरकारी गुपितांचा कायदा, व युनिव्हर्सिटीसंबंधी कायदा यांच्यावर निर्भीडपणे टीका करून जी लोकपक्षाची सेवा त्यांनी केली होती ती, या सर्व गोष्टी लोकांच्या मनांत ताज्या होत्या. आपल्या

हक्कांचे समर्थन करणारा, सरकारच्या कृष्णकारस्थानातील विष आविष्कृत करणारा हा पुढारी जेव्हा मद्रासी लोकांनी पाहिला तेव्हा त्यास आनंदाचे भरते आले. निरनिराळ्या वर्तमानपत्रकर्त्यांनी त्यांचे त्रोटक चरित्र दिले. त्यांच्या स्वार्थत्यागाचा, विद्वत्तेचा, वगैरे गौरव केला गेला. अँग्लो इंडियन वर्तमानपत्रेही मागे नव्हती. मद्रास टाइम्सने लिहिले, ' It is no easy task to stand Ranade's cross examination. Gokhale's contact with Ranade gave him an opportunity to imbibe in a large degree his master's prodigious industry, great breadth of vision, a true sobriety of judgement, a calm sweetness and reasonableness, a temper singularly free from prejudice and personal bias and a sincerity of conviction which those alone who knew him most could realise best. ' त्यांच्या अंदाजपत्रकांवरील भाषणांनी तर नवीनच क्रांती घडवून आणली होती. विचारवंत लोकांत त्यांची फार स्तुती झाली. विद्यार्थ्यांनी त्यांस मानपत्रे दिली. निरलसता व निरपेक्षता ज्याच्या ठिकाणी एकवटली आहेत, त्याचे कोण कौतुक करणार नाही ? त्याचे गोडवे कोण गाणार नाही ? सार्वजनिक संस्थांनी त्यांचा सत्कार केला. गोखल्यांच्या बिऱ्हाडी भेटीस व मुलाखतीस येणाऱ्या गृहस्थांची मारे गर्दी असे. मित्रांनी त्यांस मेजवान्या दिल्या. अशा रीतीने मुलाखती, संभाषणे यात काळ चालला असता मैलापुरास त्यांस एका पवित्र कार्यासाठी आमंत्रण देण्यात आले. तेथे रानडे यांच्या स्मारकासाठी बांधण्यात येणाऱ्या इमारतीच्या पायाचा दगड बसवावयाचा होता. रानड्यांबद्दलचा गोखल्यांच्या मनात असणारा भक्तीचा जिव्हाळा जे जे गृहस्थ पाहात त्यांस गोखल्यांच्या मनाची आध्यात्मिक ठेवण पाहून मोठे समाधान होई. कृतज्ञतापूर्ण अंतःकरणाने गोखले मैलापुरास गेले. तेथील त्यांचे भाषण फार रसाळ, आणि प्रेमळ असे झाले.

" He was one of those men who appear, from time to time in different countries and on different occasions, to serve as a light to guide the footsteps of our weak and erring

humanity. He was a man with a mission in life—the preacher of a new gospel, one who imparted a new impulse to our thoughts and breathed a new hope into our hearts. A great and a massive intellect, a heart that overflowed with the love of his country, an earnest and dauntless spirit, an infinite capacity for work, patience inexhaustible and an humble faith in the purpose of Providence that nothing shook–and a man so equipped could worthily undertake the task of moulding the thoughts, hopes and aspirations of his countrymen. The grandeur and nobility of his soul impressed itself on all who came in any kind of contact with him; men were afraid to think unworthy thoughts before him; they felt themselves to be in an atmosphere of holiness, of love and of service—they felt as though they were in the presence of a being of a higher order. Well, gentlemen, such men are among the chosen instruments of God to work out His beneficent purpose."

वरील भक्तिपूर्ण उद्गारांवरून रानड्यांकडे गोपाळराव कोणत्या दृष्टीने पाहत असत हे दिसून येईल. या साध्या व सरळ भाषणात गोखल्यांचे हृदय ओतले आहे.

१९०४ च्या बजेटवरील भाषणात त्या वर्षी लष्कराकरिता वाढविण्यात येणाऱ्या खर्चावर त्यांनी टीका केली. सेनापतिसाहेबांनी हिंदुस्तानातील आंग्लपुत्रांना सैन्यात दाखल होण्यास आग्रहाने सांगितले. परंतु, हिंदू लोकांस मात्र मज्जाव ? 'May not the Government consider the desirability of permitting—aye, inviting—carefully selected classes from among the children of the soil to share in the responsibilities of national defence ?' परंतु राष्ट्र दुर्बल करण्याचेच ज्यांचे व्रत ते सरकारी अधिकारी या गोष्टीकडे लक्ष कसे देणार ? सुशिक्षित

लोकांस तर लष्कर म्हणजे वावडेच. लष्करात घ्यावयाचे झालेच तर ज्यांस देशाची अगर स्वाभिमानाची चाड नाही, ज्यांची मने सुसंस्कृत नाहीत अशा, सरकार सांगेल त्याच्यावर गोळी झाडणाऱ्या आडमुठ्या लोकांस, सरकार लष्करात घेणार.

१९०४ सालच्या काँग्रेसचे गोखले हे जॉइंट सेक्रेटरी होते. या वर्षीची राष्ट्रीय सभा मद्रासला भरावयाची होती. या सभेत गोखल्यांनी हिंदुस्तान सरकारच्या खजिन्यात सहा वर्षांत जी तीस कोट रुपये शिल्लक पडली, त्या शिलकेच्या उपयोगासंबंधी ठराव मांडला. सरकारने लोकांपासून मिळविलेल्या या लुटीवर त्यांनी कौन्सिलमध्ये तर वेळोवेळी तडाखे दिलेच होते. या पैशांतून निरनिराळ्या शास्त्रांचा सांगोपांग अभ्यास युनिव्हर्सिटीतून व्हावा म्हणून देणग्या द्याव्या असे लॉर्ड कर्झन साहेबांस सुचविले होते. परंतु कर्झन साहेबांचा कुर्रा कोणास माहीत नाही ? सरकारच्या ताब्यात युनिव्हर्सिटी देण्याविरुद्ध जर ओरडता तर मग सरकारच्या तिजोरीवर तरी लक्ष का असे हे विद्वान् लॉर्ड साहेब उद्गारतात. Lord Curzon said ( refering to Gokhale's observation ), " Exactly. But will the Hon. member tell me, why ? There is plenty of money among his own people. Then why does he not look to them, why does he look to the Government for the money which is needed for instituting University Chairs ?" जणू काय सरकारने गलबते भरभरून कोळशाच्या माहेरघराहून पैसा आणला ! लोकांजवळचा पैसा लुटून पुनः त्या पैशाचा उपयोग सरकारच्या नवीन नवीन जावईखात्यात करावयाचा आणि शिक्षण, आरोग्य, उद्योगधंदे यांसाठी भांडवल मागितले तर लोक श्रीमंत आहेत हे उत्तर ? दादाभाई, रानडे या सर्वांनी आकडेमोड करून जे सिद्ध केले ते कर्झन साहेबांच्या ब्रह्मवाक्यापुढे काहीच नाही काय ? ज्या परिस्थितीत नवीन कायदे केले ती परिस्थिती पालटली तरी कायदे काही चुकत नाहीत. गोपाळराव विचारतात, 'What right has the Government to retain taxation at the level to which it was forced up by successive additions, now that the need for

such a high level has passed away ?' या व्याख्यानात गोपाळरावांनी असल्या आर्थिक प्रश्नांवर जबाबदारपणे बोलण्याचा आपणास थोडाफार अधिकार आहे असे सांगितले. या गोष्टीत अभिमान नव्हता तर यथार्थता होती. ते म्हणतात, 'Gentlemen, it was more than sixteen years ago that I first imbibed a love for the study of financial questions at the feet of my great master, Mr. Ranade, and since then, I may claim to have been a fairly close student of Indian finance.' आधीच बेजबाबदारपणे अधिकार गाजविणारे सरकार हातात पैसा खुळखुळू लागताच जास्तच बेजबाबदारपणे वागू लागेल. "This *plethora* of money at the disposal of the Government makes an irresponsible administration still more irresponsible."

या शिलकी पैशामधून वरिष्ठ सरकार प्रांतिक सरकारास उधळपट्टी करावयास मदत करिते, कधीकधी शिष्टमंडळे पाठविण्यात, तर कधी अवाढव्य लष्करी खर्च वाढविण्यात या पैशाचा दुरुपयोग होतो.

"It enables the Viceroy to dispense in the style of a great oriental ruler, special aids to Local Governments out of his own abundance as acts of grace, to send expeditions under the name of political missions into the territories of helpless farmers and priests, to undertake large schemes of Army-re-organisations and to listen to the conceivings of his vast designs playing a great role in the heart of Central Asia." गोपाळरावांस समजत होते की जसे आपण कौन्सिलमध्ये काही एक उपयोग न होण्यासाठीच बोललो तसेच राष्ट्रीय सभेच्या ठरावाचेही होईल. ते शेवटी म्हणतात, 'It may be that our protest will go unheeded ! I, for one, do not think it will. I have a feeling faith that it will produce its effect, if not now on a future occasion. And in any case, whether it is heeded or not—it is better to have protested and borne than not to have protested at all.'

याच वर्षी गोपाळरावांस कौन्सिलमधील त्यांचे प्रतिस्पर्धी जे कर्झन साहेब त्यांच्याकडून सी. आय्. ई. ही पदवी सन्मानपुरस्सर अर्पण करण्यात आली. ज्याच्यावर १८९७ साली सर्व सरकारी अधिकारी तुटून पडले होते, त्यास त्याच सरकारी नोकरांच्या म्होरक्याने ही सन्मानाची पदवी देणे हे जरा चमत्कारिकच दिसते. गोखले हे सरकारची हांजी हांजी करीत होते काय? सरकारच्या प्रत्येक कृत्यास पाठिंबा देत होते काय? ते होयबाच होते काय? नाही; त्यांस सरकारास विरोध करणारा प्रतिनिधी अशी मानाची पदवी देण्यात आली होती. 'Leader of his majesty's opposition' या पदवीवरून ते सरकारला स्तुतिसुमनांजली समर्पण करण्यातच सर्वस्व समजत नसत हे उघड आहे. परंतु सरकारास विरोधासाठी विरोध करणे हे त्यांचे ब्रीद नव्हते. जेव्हा त्यांस सरकारास विरोध करणारा असे कायदेकानू करणाऱ्या सरकारी सभासदाने संबोधिले तेव्हा ते जरा रागानेच म्हणाले :—

"My Lord, we stand not here as an opposition, we come here as advisers to you as councillors to you as critics, and it may be occasionally as checks, but we are never the opposition for the sake of opposing the Government of the country." जरी सरकारास विरोध केला तरी सरकार थोडेच वठणीवर येणार? सभासद फार तर बडबडणार. सत्ता थोडीच आहे त्यांस? गोपाळरावांनी सरकारची योग्य तेव्हा सणसणीत कानउघाडणीच केली. चिरोल साहेब म्हणतात, 'He has often been, both in the Viceroy's Legislative Council and in that of his own presidency, a severe and even bitter critic of an alien Government." परंतु गोखल्यांची मुद्देसूद मांडणी, भारदस्तपणा, वगैरे गुणांनी कर्झन साहेबही प्रसन्न झाले. ते स्वतः पदवी देताना गोखल्यांस लिहितात, "The honour is offered to you in recognition of your abilities which are freely bestowed upon the service of your countrymen and of which I would ask no more than that they should continue to be so employed. I only wish that

lia produced more such public men.' दुसऱ्यास सदैव ठपका
ासाठीच टवकारून बसलेल्या कर्झनकाकांस गोखल्यांमध्ये प्रामाणिकपणा,
ेपेक्ष देशसेवा दिसावी हे गोखल्यांचे भाग्यच म्हणावयाचे ! त्यांच्या
न्सिलमधील सूचनांचाही जास्त जास्त विचार करण्यास व अल्प कृतीत
णण्यास सरकारने सुरुवात केली होती. १९०३ साली मिठाचा कर
मणी २।। रुपये होता तो २ रुपये करण्यात आला. १९०४ सालच्या
ाजे याच वर्षाच्या बैठकीत आणखी कमी करा असे त्यांनी सुचविले;
ु ही गोष्ट १९०५ मध्ये घडून आली. १९०५ मध्ये दर मणी आणखी
ठ आणे कमी करण्यात आले. दुसरा एक कर म्हणजे प्राप्तीवरील. हा
ीचा कर ५०० रुपये मिळकतीवरही बसत असे. गोपाळरावांनी ही
ादा किमान पक्ष १००० ही ठरविली.

या नवीन म्हणजे १९०५ सालच्या कौन्सिल–बैठकीमधील महत्त्वाचे
षण म्हणजे 'व्हॅलिडेशन ॲक्ट' वरील होय. आपल्या अधिकाऱ्यांची
यदेशीर रीतीने इभ्रत सांभाळण्यासाठी हे कायद्याचे पिल्लू निर्माण कर-
ात आले. १९०४ मध्ये पास केलेल्या युनिव्हर्सिटी ॲक्टला पुस्ती–
ञकटी देणारा हा ठराव होता. गोखल्यांनी आपल्या भाषणात कार्यकारी
न्सिलपेक्षा कायदेकौन्सिलला जास्त अधिकार असले पाहिजेत असे
गितले. हिंदुस्थानात सर्वच नवलाई ! जगात जो कोठे प्रकार नसेल
ला प्रकार येथे आढळावयाचा. एखादा नवीन कायदा करण्याची
ःकारास लहर लागली की आणा एक बिल कायदे–कौन्सिलात. सभा-
ांनी टीका केली तरी तिचे महत्त्व आपणांस माहीतच आहे. कार्यकारी
न्सिल हे चाकर खरे, परंतु हिंदुस्थानात हा चाकरच कायदे–कौन्सिल-
ी धन्याचा मालक, हुकूम फर्माविणारा झाला. वास्तविक पाहिले
णजे कायदे–कौन्सिल जे ठराव पास करील त्यांची अंमलबजावणी या
र्यकारी कौन्सिलने करावयाची; परंतु येथे नावे मात्र अशी आहेत;
ऱ्या नामानुरूप नाही. कार्यकारी कौन्सिलला जरूर भासली की त्यांनी
ायदे–कौन्सिलात बिल आणण्यास फर्मावावयाचे आणि ते परिस्थितीला
ग्य असे समजून सदैव पास व्हायचेच. खरोखर ही परिस्थिती फार
ईट. परंतु करणार काय ? गोखले म्हणतात,

'My Lord, in all civilized countries there is a well-understood and well-defined distinction between the Legislature and the Executive Government and the Legislative is regarded as higher than the Executive. In India unfortunately this distinction for the most part is of only a nominal character; for, with the present constitution of the Councils, the Executive Government can get what law they please passed by the Legislative without the slightest difficulty. I submit, however, that it is not desirable, it is not wise, that this fact should be forced on the attention of the public in so unpleasant a manner as on this occasion and I think the distinction becomes a farce if our legislature is to be thus at the back and call of the Executive Government and if it is to be called upon to exercise its powers of legislation to remedy defects not in existing laws, but in executive action taken under those laws."

गोखल्यांना या कौन्सिलांना फार्स म्हणावे लागले यातच या कौन्सिलांची रचना कशी आहे ते दिसते. सरकार नाटक मात्र नीट करून दाखविते. ठराव आणावयाचा; गंभीरपणाचा आव दाखवावयाचा; परिस्थितीचे भेसूर चित्र रेखाटावयाचे; लोकांचे कल्याण आहे हा मंत्र त्यात असावयाचा आणि हे सर्व ' शांतिः शांतिः शांतिः ' साठी आहे असे म्हणून कायदा पास करून टाकावयाचा. सरकारचे नाटक गोखल्यांच्या वरील भाषणावरून त्यांस समजत असे असे दिसते. पुनः पुनः सरकारास—मंद प्रकृतीच्या सरकारास जागे करण्यासाठी कानी कपाळी ओरडावयाचे. परंतु झोपेचे सोंग घेणाऱ्यापुढे ओरडून काय होणार ! त्यास चिमटे घेतले पाहिजेत असे म्हणणारा राष्ट्रीय पक्ष हिंदुस्तानात पुढे येत होता.

१९०५ साल म्हणजे गोखल्यांवर कामांचा डोंगर पाडणारे वर्ष होय. कौन्सिलच्या बैठकीचे दरवर्षाचे काम त्यांना करावे लागलेच. परंतु त्या-

बरोबर कित्येक नवीन कामे उत्पन्न झाली होती. या वर्षी त्यांस पुणे म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष निवडण्यात आले. तेथेहि त्यांनी पुष्कळ सुधारणा केल्या. इंग्लंडात चालू असलेले जे इंडिया पत्र त्याला हिंदुस्तानात वर्गणीदार मिळवून देण्याचे काम त्यांनी आपल्या शिरावर घेतले होते. रानडे यांच्या स्मारकासाठी फंड गोळा करावयाचा होता. याच सुमारास म्हणजे **१२ जून १९०५ रोजी त्यांनी भारत सेवक समाज स्थापन केला.** या समाजाचे जे पहिले सभासद होणार होते त्यांचा शपथविधी या दिवशी झाला. या समाजाची घटना कशी असावी, कायदे, नियम कोणते असावे याची वाटाघाट पुढे दोन वर्षांनी करण्यात आली. सध्या मनात जी कल्पना घोळत होती तिला त्यांनी थोडे मूर्त स्वरूप देण्याचा उपक्रम केला. परंतु या सर्व कामांपेक्षा एक जास्त जबाबदारीचे काम त्यांच्यावर सोपविण्यात आले. ते म्हणजे इंग्लंडमध्ये शिष्टमंडळात जावयाचे.

# बंगालची फाळणी व गोखल्यांची विलायतेतील शिष्टाई

१९०४ सालच्या कॉँग्रेसच्या वेळी वेडरबर्न साहेबांनी मोठ्या कळ-कळीने सांगितले होते की, प्रत्येक प्रांताने दोन दोन प्रतिनिधी किंवा एकेक तरी इंग्लंडमध्ये हिंदुस्तानची बाजू मांडण्यासाठी पाठवावा. १९०५ साल उजाडले आणि हिंदुस्तानातही नवीन युग निर्माण झाले. या नवीन युगाचे— नवीन क्रांतीचे सम्यक् स्वरूप लक्षात येण्यासाठी आपण जरा आजूबाजूस ही पाहिले पाहिजे.

आशियातील राष्ट्रासंबंधी एकोणिसाव्या शतकात युरोपातील राष्ट्रांची अशी समजूत झाली होती की आशियातील राष्ट्रे म्हणजे निर्माल्यवत्. त्यांच्यावर गोऱ्या लोकांचेच स्वामित्व राहणार. गोऱ्या राष्ट्रांची इभ्रत, त्यांचे शास्त्रीय ज्ञान, त्यांचे व्यापारातील प्रभुत्व आणि या प्रभुत्वामुळे प्राप्त झालेली संपत्ती, या सर्व समन्वयामुळे युरोपातील राष्ट्रांस स्वर्ग चार बोटे राहिला होता. मुसलमान लोकांच्या पूर्वीच्या स्वाऱ्यांचा युरोपातील उन्मत्त राष्ट्रास आता विसर पडला होता. परंतु अशा वेळी त्यांच्या डोळ्यांत चरचरीत अंजन पडले. आशियातील ईशान्य दिशेस असणाऱ्या चिमुकल्या जपानने अवाढव्य रशियाचा पराजय केला. त्याचे आरमार रसातळास नेले. अलौकिक शौर्य, लोकोत्तर धैर्य, प्रचंड व अतुल स्वार्थत्याग, शास्त्रीय ज्ञान आणि विजय मिळ-विल्यानंतरही केलेले कौतुकास्पद व आदरणीय वर्तन यामुळे जपानकडे सर्व राष्ट्रांचे डोळे वळले. युरोपातील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रांत त्याचा समावेश झाला. बरोबरीचे तह करण्यासाठी अहमहमिका सुरू झाली. युरोपातील मदोन्मत्त

हत्तीचा मद या सिंहाच्या छाव्याने हरण केला. जपानची इभ्रत वाढली; आणि त्याबरोबरच आशियातील राष्ट्रांचीही वाढली. आपण प्रयत्न करू तर युरोपातील राष्ट्रांची बरोबरीचशी काय परंतु त्यांच्यावरही ताण करून त्यांचा नूर उतरू अशी धमक या विजयाने आशियातील लोकांच्या मनांत उत्पन्न केली. आपणही माणसे आहो, थोरामोठ्यांचे वंशज आहो, मनांत आणू, हातपाय हलवू तर पाश्चात्त्यांस टक्कर देण्यास कमी पडणार नाही हा स्वाभिमान जागृत होऊ लागला. तुर्कस्तान, चीन, इराण या देशात क्रांत्या घडून येऊ लागल्या. राष्ट्रीय पक्ष पुढे येत चालले; तरुणांचे रक्त सळसळू लागले; स्वातंत्र्यवृत्तीचे वारे लोकांत, आशियातील जगात खेळू लागले; या चळवळींचा परिणाम हिंदुस्तानवरही झाल्याविना कसा राहील? मोर्ले साहेबांनी या वेळच्या परिस्थितीचे वर्णन केले आहे ते पहा :—

" It was among the students in part of India that unrest especially prevailed. That class was rapidly being drawn into something like a spirit of revolt against the British Government, and the movement was unmistakably coming to a head, notably in Upper India. A feeling gained ground that the last twenty years had been a period of reaction, and in combative response the idea of complete independence of England began to appeal to youthful imagination. This marked the line of cleavage between moderates and extremists in the native party of reform. It was no question of the terrible military mutiny of half a century ago repeating itself, the danger arose from a mutiny, not of sepoys about greased cartridges, but of educated men armed with modern ideas supplied from the noblest arsenals and proudest trophies of English literature and English oratory. Official persons of high station and responsibility assured the new Viceroy that the political change within the last dozen years was enormous, and though the mass of the people

remained ignorant and unmoved, it would be a fatal mistake to suppose that the change was confined to the preachings of political agitators. The fairly educated Indians were thoroughly dissatisfied with the old order of things. The victories of Japan, the revolutionary movements in Turkey, China, Persia did not pass unobserved. A new and ominous suspicion that England had come to a stop in her liberating mission made way,"

मोर्ले साहेबांची घमेंड पहा. ते म्हणतात की, इंग्लंड स्वातंत्र्यदानाच्या व्रतापासून च्युत होत चालले असे हिंदुस्तानातील लोकांस वाटू लागले आहे. जणू अद्यापपावेतो इंग्लंड आपले व्रत चालवीतच होते! कॉलरिज या कवीने १०० वर्षांपूर्वी म्हटले आहे:—

"We have offended, oh ! my countrymen !
We have offended very grievously,
And been most tyrannous. From east to west
A groan of accusation pierces Heaven !
The wretched plead against us multitudes
Countless and vehement, the sons of God,
Our brethren like a cloud that travels on,
Steamed up from Cairo's Swamps of pestilence
Even so, my countrymen ! have we gone forth
And borne to distant tribes slavery and pangs
And, deadlier far, our vices, whose deep taint
With slow perdition murders the whole man,
His body and his soul !"

खरोखरच या इंग्लंडने आमचे शरीर आणि शरीरात वास्तव्य करणारा मानस–हंस यांस कायमचे पंगू केले आहे. या राष्ट्राने इतरांच्या स्वातंत्र्याचे कैवारी असे स्वतःस म्हणवून घेणे म्हणजे रावणाप्रमाणे आपल्याच हाताने

'शाबास माझी' धृती; अशी पाठ थोपटून घेण्यासारखे आहे. नुकत्याच झालेल्या महायुद्धात चिमुकल्या बेल्जमच्या स्वातंत्र्यासाठी इंग्लंड युद्धात पडले ! काय पण शब्द ! महात्मा गांधींनी तर स्पष्टच सांगितले की, जर्मनी जितका दोषी तितकेच इंग्लंडही दोषी आहे. एडवर्ड कार्पेंटरने हीच गोष्ट सिद्ध केली आहे. हॅरिसन या ग्रंथकाराने आपल्या नॅशनल् प्रॉब्लेम्स या प्रकरणातील लेखात इंग्लंडच्या गेल्या शतकातील धोरणावर हीच टीका केली आहे. तो 'Empire and Humanity' या निबंधात स्पष्ट लिहितो : What race, which hemisphere, what latitude, has not seen the unsheathed sword of Britain ?' आणि खरोखर, हेच ब्रिटनचे यथार्थ वर्णन आहे. इतर राष्ट्रांतील चळवळी पाहून आणि स्वतःच्या देशांतील धांगडधिंगा पाहून नवीन सुशिक्षित लोकांस निराशा वाटू लागली. हिंदुस्तानातील पैशाने अवाढव्य खर्चाची युद्धे उत्पन्न करावी हे इंग्लंडचे धोरण ! अफगाण युद्धावर टीका करिताना हॅरिसन म्हणतो, "War wanton and cruel presents to our eyes the element of evil that it must throw back the task of administering our Indian Empire. A war which to every circumstance of injustice, bad faith and barbarity, adds the crushing load of exaction wrung from 200 millions of our fellow-subjects." व अशा लढायात होणारा अवाढव्य खर्च हिंदुस्तानच्या बोडक्यावर! याशिवाय बड्या अंमलदारांचे पगार व अत्यंत अपमानास्पद कायदे ! ! राज्यकारभारात तर भाग नाहीच. इंग्लंडने शंभर वर्षे राज्य केले तरी हिंदुस्तानचे पाऊल पुढे पडत नाही; परंतु तेच जपान पहा ! पन्नास वर्षांत त्याने युरोपातील राष्ट्रांच्या मांडीशी मांडी लावून बसण्याचा मान मिळविला. इंग्लंड बोलून चालून परकी. स्वतःच्या रंगाचे आयरिश लोकांस जर ते वगळते तर हिंदुस्तान हे बोलून चालून काळ्यांचे राष्ट्र. आजपर्यंत शेकडो अर्ज विनंत्या केल्या त्याचा यत्किंचितही परिणाम या कठोर सरकारावर झाला नाही. राणीच्या जाहिरनाम्यास आता अशक्य सनद ठरवून टाकण्यात आले. जळफळणाऱ्या लोकांना तत्काळ शमविण्यासाठी तो वरपांगी उपाय होता. कर्झनच्या कारकीर्दीत तर जास्तच दडपशाही माजली. सरकारी अंमलाची तात गळ्याभोवती जास्तच घट्ट बसली.

हिंदुस्तानातील लोकांस एक बडी जागा देणे म्हणजे गोऱ्याची एक जागा कमी करणे नव्हे काय ? आपल्या अंमलदारांस, इंजिनिअरांस, डॉक्टरांस, प्रोफेसरांस भरपूर पगाराच्या जागा देण्यासाठीच सरकारची सर्व चळवळ असावी असे लोकांस वाटू लागले. इजिप्तमध्ये सुद्धा असाच धिंगाणा परोपकाराच्या पवित्र नावाखाली इंग्लंडने घातला. आपण चळवळ केली पाहिजे, ऐक्य–वृद्धी केली पाहिजे, ही जाणीव लोकांस प्रखरतेने भासू लागली. विशेषतः बंगालमध्ये ऐक्य जास्त सहजसाध्य होते. बंगालच्या मध्यभागी सर्व बंगाली लोकांची जूट होती. हे लोक सुशिक्षित, विद्वान, भावनाप्रधान असत. त्यांच्यामध्ये जोमदार माणसे पुढे येऊ लागली. उत्तम वर्तमानपत्रे निघू लागली. सरकारला हे लोकांमधील वाढते ऐक्य पाहवेना. बंगालची फाळणी करण्याचे कर्झन साहेबांच्या मनात आले. बंगाल प्रांत मोठा आहे तेव्हा त्याचा राज्यकारभार सुरळीत चालवावयासाठी आम्ही त्याची दोन छकले करतो असे गव्हर्नर जनरलने जाहीर केले. राज्यकारभार नीट होत नसेल तर तो गव्हर्नरच्या हाताखाली इलाखा करा असे सर हेन्री कॉटन यांनी सुचविले. परंतु लोकांचे तुकडे पाडण्याचा ज्याचा उद्देश त्यास हे कसे पटणार ? त्याशिवाय गव्हर्नर हा इंग्लंडामधून नेमला जातो; लेफ्टनंट गव्हर्नर तर गव्हर्नर जनरलचा अधिकारी असतो. तोच त्याची नेमणूक करतो. यामुळे गव्हर्नर नेमण्याची बुद्धी कर्झनास पटेना. प्रथम जेव्हा कर्झन साहेबांनी आपला हेतू जाहीर केला तेव्हा बंगालचा फक्त एक कातळाच काढावा असे त्यांच्या मनात होते. लोकांनी त्या वेळेस फार गिल्ला केला, सभा भरविल्या. यामुळे काही दिवस सर्वत्र सामसूम होते. सरकारने फाळणीचा प्रश्न सोडून दिला असे लोकांस वाटले, पण आत खलबते चालली होती. पडद्याआड कारस्थाने जोरात सुरू होती. आणि १९०५ च्या आगष्ट महिन्यात फाळणी-योजना जाहीर करण्यात आली. लोकांनी ही योजना लुप्त व्हावी म्हणून आकाश पाताळ एक केले. पूर्वीच्या कातळ्याऐवजी आता बंगालचा निम्मा तुकडाच काढण्याचे सरकारने ठरविले. सिव्हिल सर्व्हंटांची पोळी पिकणार होती यामुळे त्यांनी या योजनेस मोठ्या आनंदाने संमति दिली. सिव्हिल सर्व्हंटांचे मत विचारले, परंतु बंगालमधील ज्या जमीनदारास गोडगोड थापा देऊन सरकारने वेळोवेळी मदत घेतली होती त्या जमीनदारांस या प्रसंगी सरकारने

विचारले होते का ? गरज सरो आणि वैद्य मरो. हा विभागणी कायदा रद्द व्हावा म्हणून पांचशेवर सभा भरल्या. लोकांची मने दुखवू नका; जनमताला कस्पटासमान लेखणे अंती हितपरिणामक व्हावयाचे नाही असे जबाबदार पुढाऱ्यांनी पुनः पुनः बजाविले. येवढेच काय परंतु ज्या फुल्लर साहेबांनी पुढे लोकांवर गहजब केला ते फुल्लर साहेब या विभागणीच्या विरुद्ध होते. साठ हजार लोकांच्या सह्यांचा अर्ज हाऊस ऑफ कामन्सकडे करण्यात आला. पार्लमेंटमध्ये काही प्रश्नोत्तरे झाली. परंतु शेवटी काय ? कर्झनसाहेबांनी आपलेच खरे केले ! पार्लमेंटच्या शेवटच्या निकालाशिवाय ही योजना अंमलात येणार नाही असे दुखावलेल्या लोकांच्या मनास वाटत होते. निराश होऊनही ते आशा करीत होते. परंतु '१६ आक्टोबर १९०५ पासून हा कायदा, ही विभागणी अंमलात आणिली जाईल' असे सप्टेंबरमध्यें जाहीर झाले, सरकाचा सर्व लोकांस संताप आला. सर्व मतांचे बंगाली लोक एक झाले. राष्ट्रीय वृत्ती वावरू लागली. हे बोलून चालून परकी सरकार ! त्यास आमची काळजी कशी असणार ? तेव्हा सरकारवर बहिष्कार घालण्याचे ठरले. ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याचे अमलात येऊ लागले, राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळा निघू लागल्या. तरुण लोक सामर्थ्य कमावू लागले ! लाठीचे खेळ सुरू झाले ! ! नवचैतन्याचा उदय झाला ! ! ! सर्व देशातील लोकांची मने एकवटली. हा कर्झन साहेबांनी आमच्या राष्ट्रावर एक गुप्त उपकारच केला.

१९०४ मध्ये ठरल्याप्रमाणे प्रत्येक प्रांताने आपआपले प्रतिनिधी चळवळीसाठी इंग्लंडात पाठवावयाचे ठरले होते. कर्झन साहेबांच्या दुष्ट कृत्यांची व त्या कृत्यांचा कळस जो फाळणीचा कायदा त्याची विलायतेतील लोकांस नीट कल्पना देण्यासाठी शिष्टमंडळ पाठविणे अधिकच जरूर झाले. ब्रिटिश मालावर बहिष्कार का घालण्यात येत आहे, त्यात सूडाची भावना नसून इंग्लंडला जागे करण्याचा हा एक उपाय आहे हे विलायतेतील जनतेस—मजुरांच्या समुदायांस पटवून देणे अगत्याचे होते. ३ मे, १९०५ रोजी मुंबईस जाहीर सभा भरून मुंबई इलाख्यातर्फे गोखल्यांस विलायतेस पाठविण्याचे ठरले. तेव्हा गोपाळराव हिंदुस्थानातील काम बाजूस ठेवून विलायतेस चालले. विलायतेस त्यांच्याविरुद्ध उठलेले काहूर

आता शमले होते. प्रत्यक्ष गव्हर्नर जनरलने त्यांस गतवर्षी सी. आय. ई. ही बहुमानाची पदवी स्वदस्तुरचे पत्र लिहून दिली होती. तेव्हा त्यांच्या सद्‌हेतूविषयी, त्यांच्या प्रामाणिकपणाविषयी व सत्य स्पष्टोक्तीविषयी विलायतेतील लोकांस अंदेशा बाळगिण्याचे कारण नव्हते. आपणास विलायतेत समाधानकारक व जबाबदारपणे काम करिता यावे याच एका हेतूने गोखल्यांनी ही पदवी स्वीकारली होती. कौन्सिलातील सर्वश्रेष्ठ असा लोकप्रतिनिधी विलायतेस जात होता. ज्याच्या सणसणीत परंतु रास्त टीकेने कर्झनसाहेबास संताप न येता प्रसन्न केले, असा नेमस्त परंतु योग्य ती खरडपट्टी काढण्यास न भिणारा लोकनायक आता इंग्लंडला जात होता. त्यांच्या शब्दाला इंग्लंडात मान मिळेल; त्यांचे तेथे वजन पडेल अशी आता सर्वांची व स्वतः गोखल्यांचीही खात्री होती. आणि म्हणूनच ते आपल्या दुःखी देशाची दीन कहाणी विलायतेतील निरनिराळ्या लोकांस ऐकविण्याकरिता निघून गेले.

इंग्लंडात गोखले गेले ते मोठ्या योग्य वेळी गेले. इंग्लंडमध्ये नवीन निवडणुकी व्हावयाच्या होत्या. जुने मंत्रिमंडळ जाऊन नवीन उदारमताचे मंत्रिमंडळ अधिकारारूढ होणार होते. बाल्फोर साहेबांच्या प्रतिगामी मंत्रिमंडळाची फार नाचक्की झाली होती. नवीन निवडणुकीने उदारमतवाल्यांचे फारच मताधिक्य झाले होते. अशा वेळी हिंदुस्तानातली दुःखेही समर्पक व हृदयस्पर्शी भाषेत सांगणे फार हिताचे होते.

गोखल्यांनी इंग्लंडमध्ये अविश्रांत चळवळ केली. हिंदुस्तानातील साग्र हकीकत त्यांनी करुण रवाने गाइली. मँचेस्टर येथे ६ आक्टोबर १९०४ रोजी त्यांनी हिंदुस्तानातील असंतोष या विषयावर सुंदर व्याख्यान दिले. हे व्याख्यान व्यापाराची मोठी पेठ जी मँचेस्टर तेथे होते ! मँचेस्टर आणि लिव्हरपूल यांस हिंदुस्तान म्हणजे बाजारपेठ. हिंदुस्तान त्यांच्या पोटास देत होता. परंतु हिंदुस्तानात आता या मालावर बहिष्कार पुकारण्यात आला होता. गोखल्यांस त्यांचे मित्र सांगत होते की, तुम्ही तेथे व्याख्यान देण्यास जाऊ नका. तेथील लोकांची मने हिंदुस्तानविरुद्ध क्षुब्ध झाली आहेत. परंतु गोपाळरावांस कर्तव्य करावयाचे होते, सर्वांची सहानुभूती त्यांस मिळवावयाची होती. त्यांनी बंगालची फाळणी करण्यातील धोरण येथे

उघड केले. बंगाली लोक एके ठिकाणीं असल्यामुळे त्यांचे सर्व देशात व त्या प्रांतात फार वर्चस्व आहे. बंगाली लोकांमधील ऐक्यवृत्ती व त्यांच्या वाढत्या राष्ट्रीय आकांक्षा चिरडण्यासाठी, बंगाली लोकांची संख्या दोन निरनिराळ्या प्रांतांत विभागून त्यांचे प्रत्येक प्रांतात संख्याबल व त्यामुळे मतबल कमी करणे हा सरकारचा हेतू होता, बंगाली लोक हाडाचे गरीब, ते बुद्धीने कोणास माघार न जाणारे, देशप्रेमाने ओथंबलेले, सरकारचे कृष्णकारस्थान कळताच त्यांचे उघडू लागणारे डोळे साफ उघडले, त्यांस त्वेष आला. आम्हां लोकांस या सरकारने एखाद्या किड्यामुंगीप्रमाणे मानून चिरडावे याची त्यांस चीड आली. स्वतःमधील दैन्य, स्वतःमधील दुर्बलता नाहीशी करण्याचा त्यांनी चंग बांधला. इंग्लंडमधील लोकही आपल्या न्याय्य आकांक्षा परिपूर्ण करण्यास पुढे येत नाहीत. त्यांनी पुढे यावे म्हणून बंगाली लोकांनी ब्रिटिश मालावर बहिष्कार पुकारला. या गोष्टीमुळे मँचेस्टर वगैरे शहरातील लोकांस आम्हांस रागच आणावयाचा होता. गोखले सांगतात.—

“ I am not sorry that you are angry, because I want you to be angry, but I want you to turn your anger not against the helpless people who have been driven to the last possible measure that they could take in an extremity, but against those officials of yours who are responsible for the unhappy situation that has been brought about. ’

कर्झन साहेबांच्या एकंदर धोरणाचे त्यांनी खालील वाक्यांत यथार्थ स्वरूप दाखविले आहे. ‘ Let us cripple them once and all, so that they shall be incapable ever of rising. ’ सरकार संशयपिशाचाने कसे भारले गेले आहे, हिंदुस्तानातील लोक आज राजनिष्ठ दिसले तरी पुढे मागे कदाचित् ते अराजनिष्ठ होतील या भीतीने त्यांस आताच तारेच्या कुंपणात अडकवून टाकणे बरे ही सरकारची सैतानी व सुलतानी वृत्ती कशी उघड होते याचे गोखल्यांनी यथार्थ वर्णन केले. मुलगा मोठा झाल्यावर आपणास नीट वागविणार नाही या भीतीने लहानपणीच मुलाचे

हातपाय कापून टाकण्यासारखे हे सरकारचे कृत्य आहे. परंतु या कृत्याने लोक पुढे अराजनिष्ठ होण्याऱ्या ऐवजी आजच असंतोषाने धुमसू लागतील. पुढे मुलाने आपणास चांगले वागवावे अशी बापाची इच्छा असेल तर बापाने त्या मुलाचे खरे कल्याण केले पाहिजे. त्याला इत्तम शिक्षण दिले पाहिजे. त्यास पोटास मिळविण्यास शिकविले पाहिजे. त्याप्रमाणेच सरकारनेही, जर प्रजेची निष्ठा सरकारास पाहिजे असेल तर, प्रजेस सुशिक्षित केले पाहिजे, तिचे खरे खरे कल्याण केले पाहिजे, पोटापाण्यास प्रजेस मिळते की नाही आणि पुढे मिळेल की नाही इकडे लक्ष पुरविले पाहिजे, तरच प्रजा दुवा देते. सरकारची विश्वास-वृत्ती डळमळली आहे; तरी वेळीच सावध होऊन हिंदुस्तानातील चालत आलेल्या कारभारास योग्य अशी कलाटणी द्या; असे गोखल्यांनी सर्वत्र सुचविले. त्यांनी जेथे जेथे व्याख्याने दिली तेथे तेथे त्यांनी हिंदुस्तानचा चित्रपट मोठा हृदयद्रावक रंगविला. कर्झन साहेबांची कारकीर्द म्हणजे व्याख्यानाला विषयांची तूट नाहीच. परंतु त्याशिवायही हिंदुस्तानातील वाढते दारिद्र्य, शेतकऱ्यांची कंगाल स्थिती वारंवार पडणारे दुष्काळ, अज्ञानांधकारात लोळणाऱ्या शेंकडा नव्याण्णव अगर–जास्तच–लोकांस नौकरीत मज्जाव, या सर्व वृत्तांताने त्यांनी श्रोत्यांची मने थरारून सोडली. आक्टोबर ९ रोजी त्यांनी लंडनमध्ये ‘ हिंदूंच्या दृष्टीने हिंदुस्तानचा कारभार ’ या विषयावर व्याख्यान दिले. व्याख्यानांत हिंदुस्तानातील सध्या बेजबाबदारपणे चालणाऱ्या पद्धतीचे वर्णन करून लष्कराकडे होणारा अपरंपार खर्च शिक्षणाकडे, उद्योगधंद्याकडे खर्च केला तर किती चांगले होईल याचे त्यांनी चित्र काढले. हिंदुस्तानातील अनेक जातींमुळे लोकांस राज्यकारभार करिता येणार नाही या चिरंतन आरोपाचा त्यांनी या भाषणात इन्कार केला. वसाहतीच्या दर्जाचे स्वराज्य आपणास पाहिजे, निदान ताबडतोब तरी काही हक्क दिले पाहिजेत आणि ते हक्क कोणते हेही त्यांनी उघड सांगितले. १५ नोव्हेंबर १९०५ रोजी सर हेन्री कॉटन यांच्या अध्यक्षतेखाली गोपाळरावांनी लंडन शहरी आणखी एक व्याख्यान दिले. सुशिक्षित लोकांची सर्वत्र निराशा होत असल्यामुळे, देशात असंतोष अधिकाधिक पसरणार असा भावी धोका जो होता तो त्यांनी दाखवून दिला. पन्नास दिवसांत गोपाळरावांनी पंचेचाळीस ठिकाणी भाषणे केली, कोठे निबंध

वाचले, कोठे वर्तमानपत्रांत लेख लिहिले, कोठे मुलाखती दिल्या, कोठे नवीन पुढाऱ्यांशी विचारविनिमय केला. त्यांनी स्वतःच्या देहाला विश्रांती अशी दिलीच नाही. याचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर दिसून येऊ लागला. ते अशक्त आणि थकल्याभागल्यासारखे दिसू लागले.

गोपाळरावांवर या वर्षीच्या कामगिरीचे ओझे किती होते याची कल्पना वाचकांस आली असेल. परंतु आणखीही फार महत्त्वाची कामगिरी त्यांचे देशबंधू त्यांच्यावर लादीत होते. बनारस येथे भरणाऱ्या राष्ट्रीय सभेस गोपाळरावच अध्यक्ष पाहिजेत असे तेथील स्वागत कमिटीने इतरांच्या मतानुसार ठरविले. गोपाळरावांनी नापसंती दर्शविली. मी अद्याप लहान आहे; माझ्याहून लायक लोक पुष्कळ आहेत आणि माझी प्रकृती पण नादुरुस्त आहे असे त्यांनी कळविले. परंतु छेः, गोखलेच अध्यक्ष पाहिजेत असे लोकांनी ठरविले. आपल्या देशबांधवांचा आपल्यावरील लोभ पाहून गोपाळरावांस आनंदाचे भरते आले! १८९७ सालच्या कॉंग्रेसमध्ये गोखल्यांसंबंधी निंदाव्यंजक ठराव येण्याचे घाटत होते. पण आठ वर्षांत केवढा फरक पडला! १९०५ मध्ये ते राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष निवडले गेले. ते हिंदुस्तानात येण्यास निघाले. परंतु इंग्लंडातील भाषणांनी त्यांचा घसा दुखू लागला होता. बोटीवर असताना तो सुजला. यामुळे बोटीवर असताच घशावर शस्त्रक्रिया करावी लागली पुढे प्रकृति बरी होत चालली. ते मुंबईस आले, तेव्हा लोकांनी त्यांचा जयजयकार केला. त्यांच्या इंग्लंडमधील निःस्वार्थ व निरपेक्ष सेवेस तर मोलच नव्हते. त्यांनी प्रकृतीचीही काळजी केली नाही. देशासाठी असा अविरत प्रयत्न करणारा सुपुत्र परत आपल्यात आलेला पाहून कोणास धन्य वाटणार नाही? त्याच्या उदाहरणाने, पवित्र दर्शनाने, कोणास कर्तव्यस्फूर्ती होणार नाही? अशाच पवित्र व उदात्त प्रसंगांनी लोकांस कर्तव्यक्षम होता येते. पुण्यास जेथे त्यांनी शिक्षणविषयक कामगिरी केली, जेथे त्यांनी राजकारणाचे धडे घेतले, जेथे त्यांचे सहकारी, मित्र आणि राजकारणातील प्रतिपक्षीही होते अशा पुण्यपावन पुण्यास त्यांचे फार थाटाचे स्वागत झाले. महाराष्ट्रास वंदनीय झालेले डॉ. देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली त्यांस मानपत्र अर्पण करण्यात आले. या समारंभात टिळकांनी प्रामुख्याने भाग घेतला होता.

विलायतेत किंवा इतर देशांत अशा प्रकारच्या चळवळी केल्यामुळे कसे फायदे आहेत व या कामाची कशी जरुरी आहे हे त्यांनी आपल्या भाषणात दिग्दर्शित केले.

गोपाळरावांस विश्रांती घेण्यास सवड नव्हतीच. राष्ट्रीय सभेचे ते नियोजित अध्यक्ष होते. त्यांस आपले भाषण तयार करावयाचे होते. ते कलकत्त्यास गेले. बंगालची परिस्थिती त्यांनी प्रत्यक्ष पाहिली. तेथील पुढाऱ्यांशी विचारविनिमय केला. आणि तदनंतर आपले भाषण लिहून काढले. भाषण लिहून काढल्यानंतर ते पुढाऱ्यांसह बनारसला गेले.

बनारसला गोपाळरावांचे अलौकिक स्वागत झाले. गोपाळरावांच्या श्रमांचे फळ त्यांना मिळाले. ते या अध्यक्षपदासाठी हपापलेले नव्हते. परंतु देशाने त्यांच्या कामगिरीचा गौरव केला. काम करण्याने मनुष्य खचत नसतो. परंतु कामे करून सवरून जर दुसऱ्याने त्या कामाचा उल्लेखही केला नाही तर मात्र मन खट्टू होते. मनाचा उत्साह मंदावतो. आईची चार कामे करावयास या मुलास लाज वाटत नाही किंवा श्रमाची तो पर्वा करीत नाही; परंतु पाठीवर हात फिरवून आईने 'दमलास हो बाळ, जरा बस आता.' असे शब्द काढले की, मुलाच्या लहानशा हृदयात आनंदास पारावार राहत नाही. दुप्पट कार्य करण्यास त्यास हुषारी येते. उल्हास द्विगुणित होतो. तीच गोष्ट गोखल्यांसारख्या हळुवार मनाच्या लोकांची असते. आपल्या कामाची वाहवा होवो न होवो, ते लोकास रुचो वा न रुचो, कार्य करीत राहावयाचे. अशा धमकीने केवळ निःसंग ते काम करणारा एकादाच; जवळ जवळ नाहीच म्हटले तरी चालेल. गोखले हे मुलाप्रमाणे होते. आपल्या कामगिरीचा गौरव झाला हे पाहून त्यांस गहिवर आलेला होता. काशीसारख्या पुरातन काळापासून पवित्र झालेल्या नगरीत, जेथे विश्वंभराचे वास्तव्य, जेथे गंगेचा गंभीर प्रवाह, अशा पुण्यपावन ठिकाणी, गोखल्यांसारखा तरुण, उत्साही व देहाची सुद्धा पर्वा न करता देशकार्य करणारा पुढारी राष्ट्रीय सभेचा अध्यक्ष नेमण्यात आला होता.

परंतु यंदाच्या काँग्रेसचे काम फार बिकट होते. राष्ट्रात पूर्वीपासून दिसून येणारे मतभेद आता अधिक स्पष्टपणे दिसू लागले. बहिष्कार बंगाल

प्रांतापुरता न ठेवता सर्वराष्ट्रीय करावा, राजपुत्राच्या स्वागतावर बहिष्कार घालावा वगैरे प्रश्नांवर मोठी रणे माजली. परंतु एकंदरीने सर्व सुरळीत पार पडले. गोखल्यांनी फेरोजशहांस तारा केल्या. परंतु फेरोजशहा या सभेस हजर राहिले नाहीत. गोखल्यांस वाटत होते की, या वेळेस फेरोजशहांसारखा वजनदार गृहस्थ आपणास सल्ला देण्यास असेल तर काम जास्त सुरळीत पार पडेल. परंतु तितकी विशेष भानगड झालीच नाही.

गोखल्यांचे अध्यक्षपदावरून वाचण्यात आलेले भाषण फारच सणसणीत होते. आपल्या व्याख्यानाच्या आरंभी कर्झनशाहीची अवरंगजेबशाहीशी त्यांनी मार्मिक व यथार्थ तुलना केली. अवरंगजेब कर्तबगार होता, परंतु घमेंड व सर्वांचा संशय या दोन कारणांनी त्याची कारकीर्द सुखावह झाली नाही. खुद्द त्याच्या कारकीर्दीत बंडे वगैरे विशेष झाली नाहीत, तरी त्याच्या पाठीमागे सर्वत्र बजबजपुरीच माजली. कर्झन गेले खरे परंतु त्यांच्या नंतर आलेल्या मिंटोसाहेबांच्या कारकीर्दीत अराजकतेला व्यक्त स्वरूप आले. कर्झनच्या कारकीर्दीत मनात बीजारोपण झाले, मिंटो साहेबांच्या कारकीर्दीत त्याचा रोपटा झाला. कर्झनची कृष्णकृत्ये व त्यांची फळे यांची निस्तरानिस्तर मिंटो साहेबांस करावी लागली. लॉर्ड कर्झनच्या योग्य गुणाची गोपाळरावांनी तारीफ केली. परंतु त्या गुणांचे चीज झाले नाही. ‘ But the gods are jealous and amidst such lavish endowments, they withehld from him a sympathetic imagination without which no man can ever understand an alien people.’ सुशिक्षितांचे मत बाजूला लोटणे मुत्सद्देगिरीचे होणार नाही असे म्हणणारे कर्झन त्याच मताची कायदेबाज पायमल्ली करण्यात सर्वांवर ताण कसे करते झाले याचे त्यानी उत्कृष्ट चित्र रेखाटले. कर्झन साहेबांनी मुंबईच्या चरम भाषणात असे उद्गार काढिले की, मी शिक्षणात जास्त पैसा खर्च केला. परंतु शिक्षणात अडीच लक्ष रुपये जास्त खर्च करण्यास दिले तर लष्कराकडे पन्नास लक्ष जास्त खर्च केले! युरोपियन लोकांसाठी तर इतक्या नवीन जागा निर्माण केल्या की बोलून सोय नाही. आधीच नोकरीवर होते त्यांचे पगार वाढविले आणि हे सर्व का? तर ‘ He did not regard it as wisdom or statesmanship in the interests of India itself to do so. ( to

do so means—offering political concessions to the people of India.)' नंतर बंगालच्या फाळणीकडे गोखले वळले. या बाबतीत सरकारशी नित्य सहकार्य करणाऱ्यांची मतेही सरकारने कशी धुडकावली, सर्व जनतेचें मत कसे तृणवत् लेखले हे सांगून गोपाळरावांस खालील उद्गार काढावे लागले :—

' If men, whom any other country would delight to honour are to be thus made to realize the utter humiliation and helplessness of there position in their own, if the opinions of such men are to be brushed aside, if all Indians are to be treated as no better than dumb, driven cattle, then all I can say is "Good-bye to all hope of co-operating in any way with the bureaucracy in the interests of the people." शत संवत्सर राज्य चालवून जर हाच शेरा या राज्यपद्धतीवर मारावा लागतो तर ही राज्यपद्धती किती घातुक, किती दुष्ट असेल याची कल्पना करा.

बंगालची विभागणी करण्याची तीन मुख्य कारणे त्यांनी सांगितली. बंगालला फोडणे, आसामची भरभराट दाखविणे, आणि सिव्हिल सर्व्हंटांचा फायदा. खरे पाहिले तर बिहार, ओरिसा, छोटानागपूर हे तीन प्रांत एकीकडे काढून त्यांचा निराळा प्रांत बनविला पाहिजे होता. परंतु तसे केल्यास सिव्हिल सर्व्हंटांचा घुस्सा होणार होता. या फाळणीमुळे कर्झन-साहेबांस किती गोष्टी साधावयाच्या होत्या पहा :—

"This fair Province has been dismembered to destroy growing solidarity of the people, check their national aspirations and weaken their power of co-operating for national ends, to lesson the influence of their educated classes with their countrymen and reduce the political importance of Calcutta."

१६ आक्टोबर १९०५ रोजी फक्त सरकारी सभासद हजर असता हा कायदा पास करण्यात आला, आणि तो दिवस बंगालमध्ये सुतकासारखा

पाळण्यात आला. परंतु या काळ्यातूनही पांढरे बाहेर पडले. या कडू कवंडलामध्येही एक अमृताची बी सांपडली.

" For the first time since British rule began, all sections of the Indian community, without distinction of caste or creed have been moved by a common impulse and without the stimulus of external pressure, to act together in offering resistance to a common wrong.— The most astounding fact of the situation is that the public life of this country has received an accession of strength of great importance, and for this all India owes a deep debt of gratitude to Bengal."

नंतर गोपाळराव स्वदेशी आणि बहिष्कार यांकडे वळले. त्यांनी सांगितले की, ज्या प्रसंगी सर्व लोक एका झेंड्याखाली जमा होतात, अशा वेळी बहिष्कार हा कायदेशीर आहे. स्वदेशीमधील पवित्र भावना आणि आर्थिक फायदाही त्यांनी स्पष्ट केला. नंतर आपले ध्येय काय असावे याची त्यांनी मीमांसा केली. लोकांस जास्त जास्त हक्क दिल्याशिवाय ते हक्कांस लायक होत नाहीत. ' केल्याने होत आहे रे, आधी केलेचि पाहिजे.' " It is liberty alone which fits men for liberty, ' हे ग्लॅडस्टनचे सूत्र आहे. परंतु तुम्ही आधी घरात पोहावयास शिका म्हणजे मग आम्ही तुम्हांस सागरात नेऊ अशा प्रकारचे आमच्या अधिकाऱ्यांचे म्हणणे असते. हिंदुस्तानास दिलेल्या वचनांचा वेळोवेळी कसा भंग केला गेला हे जगजाहीरच आहे. गोड गोड थापा मारून वेळ मारून नेणे हे सरकारचे काम आणि ते त्याने यथायोग्य केले. नोकरशाही लोकांत मिसळण्यास पुढे येत नाही; लोकांनी भीत भीत, नमून त्यांच्या पुढे वागले पाहिजे, अशी स्थिती आली आहे. ही स्थिती पालटली पाहिजे. आपणांस ताबडतोब काही हक्क तरी मिळाले पाहिजेत. ते कोणचे असावेत या गोष्टीचेही त्यांनी स्पष्टीकरण केले. जिल्हा-बोर्डांची त्यांनी फार जरूरी दाखविली. हिंदुस्तानचा बराचसा राज्यकारभार डिस्ट्रिक्ट अधिकाऱ्यांकडून हाकला जातो. त्यांस सल्ला देण्यास आणि पुढे त्यांच्यावर ताबा ठेवण्यास या जिल्हाबोर्डांचा फार उपयोग होईल असे

रानड्यांस वाटत असे. ही महत्त्वाची सुधारणा गोपाळरावांनी लोकांपुढे मांडली. इंग्लंडमधील परिस्थितीही आपणांस अनुकूल आहे; स्टेट सेक्रेटरी, अंडर सेक्रेटरी हिंदुस्तानच्या भवितव्यतेविषयी उदार धोरण बाळगणारे आहेत असे त्यांनी दाखविले. विशेषत: मोर्ले साहेबांविषयी गोखल्यांनी फारच आदर दाखविला. पण पुष्कळदा या जगात जसे दिसते तसे नसते. मोर्ले तत्त्वज्ञ असले, राज्यकारभार बराचसा लोकांच्या हातात पाहिजे असे बर्कच्या अध्ययनाने, व ग्लॅडस्टनच्या शिकवणुकीने जरी त्यांचे मत बनले असले, तरी सेक्रेटरीच्या जागेवर येताच, या जागेला चिकटलेले संकुचित-पणा, मतक्षुद्रता, अनुदारता हे दुर्गुण त्यांना येऊन चिकटले. हे दुर्गुण दूर लोटण्याचे त्यांस सामर्थ्य नव्हते. बदललेल्या परिस्थितीत जो आपले स्वत:चे उदार विचार कायम ठेवून तदनुरूप कृती करण्याची खटपट करितो तोच महा-पुरुष होय. मोर्ले अर्थात् या कोटीतले नव्हते. ते पुस्तकी पंडित होते. त्यांना वांगी फक्त पुराणाचे वेळी निषिद्ध होती. परंतु गोखले भोळे ! त्यांना मोर्ले साहेबां-विषयी फार आशा वाटत होती. आपल्या देशास हा काही तरी भरभक्कम सुधारणा देईल असे गोपाळरावांस वाटत होते. त्यांचे हृदय खालीवर होत होते:—

" And as regards the new Secretary of State for India, what shall I say ? Large numbers of educated men in this country feel towards Mr. Morley as towards a Master; and the heart hopes and yet it trembles, as it had never hoped or trembled before. He, the reverent student of Burke, the disciple of Mill, the friend and biographer of Gladstone,--will he courageously apply their principles and his own to the Government of this country, or will he too succumb to the influences of the Indian office around him, and thus cast a cruel blast on hopes, which his own writings have done so much to foster ? We shall see. "

धैर्याने ग्लॅडस्टन–बर्कची तत्त्वे येथील राज्यकारभारास लावण्यास मोर्ले कचरले. त्यांच्यावर सभोवारच्या प्रभावळीची छाया पडली. त्यांना शेजा-

त्यांचा, सहकाऱ्यांचा गुण लागला. या बाबतीत टिळक हेच जास्त धोरणी, दूरदृष्टी ठरले. टिळकांस मनुष्यस्वभाव बरोबर माहीत. त्यांनी 'तत्त्वज्ञ आणि मुत्सद्दी' हा सुंदर लेख लिहून मोर्ले साहेबांविषयी अवास्तव कल्पना करण्यात हशील नाही, एखादा तुकडा फेकील तोंडावर—त्याचीही खात्री देववत नाही असे जे प्रतिपादिले तेच पुढे खरे ठरले.

नंतर सरतेशेवटी रानड्यांच्या रसाळ, सुंदर व स्फूर्तिदायक शब्दांनी त्यांनी समारोप केला; आणि कितीही बिकट परिस्थिती आली तरी निराश न होण्यास त्यांनी सांगितले. गोखल्यांचे भाषण फार जोरदार होते. त्यांचे आशापूर्ण उत्साही मन त्यात दिसत होते. राजकारणात लागणारी अचूक दृष्टी त्यांस नसली तरी एकंदर परिस्थितीचे समालोचन त्यांनी चांगले केले. या भाषणावर टीका करिताना चिरोल साहेब लिहितात :—

'It must have been a proud moment for Mr. Tilak when the very man who had often fought so courageously against his inflamatory methods and reactionary tendencies in the Deccan, Mr. Gokhale, played into his hands and from the presidential chair at Benares got up to commend the boycott as a political weapon used for a definite political purpose'

परंतु गोखल्यांनी अध्यक्षपदावरून बहिष्कार न्याय्य आहे असे जे जाहीर केले ते का याची काहीशी कारणमीमांसा जी चिरोल साहेबांनी लाविली आहे ती पहा. ते म्हणतात :—

"Not even Mr. Gokhale with all his moral and intellectual to force could stern the flowing tide of Tilak's popularity in the Deccan ; and in order not to be swept under, he was perhaps often compelled like many other Moderates to go further than his own judgement could have approved."

ही मीमांसा बरोबर आहे असे आम्हांस वाटत नाही. नवीन पक्षाच्या जोरकस प्रवाहात आपण नाहीसे होऊन जाऊ नये, या हेतूसाठी काही गोपाळरावांनी बहिष्काराचे समर्थन केले नाही. त्यांना खरोखरच बहिष्कार

न्याय्य वाटत होता. फक्त त्याचा उपयोग जेव्हा सर्व राष्ट्रास आग लागली असेल, आणि सर्वांचे ऐक्य असेल तेव्हाच व्हावा, नाही तर ते अस्त्र विफल ठरेल असे त्यांचे म्हणणे होते. असो. एकंदरीत बनारसची कॉंग्रेस आपल्या गोड व मृदु स्वभावाने गोखल्यांनी नीट पार पाडली हे त्यांस खरोखर भूषणावह झाले. अशा जोमाची व इतकी यशस्वी राष्ट्रीय सभा वीस वर्षांत झाली नव्हती. यंदाच्या कॉंग्रेसचा विशेष हा होता की, मुसलमानांच्या हिताविषयीही सभेने जागरूकता दर्शविली. हिंदुस्तानातून यात्रेकरिता बाहेर जाणाऱ्या मुसलमानांवर क्वॉरंटाइनचा त्रास—नसती पीडा लादली होती. ही पीडा, हे गाऱ्हाणे दूर केले जावे अशा अर्थाचा ठराव पास करण्यात आला.

१९०५ च्या अखेरीस लॉर्ड मिंटो हे गव्हर्नर जनरल झाले होते. कर्झन व किचनेर यांचा झगडा होऊन, हा तेजस्वी व घमंडानंदन गव्हर्नर जनरल एकदाचा निघून गेला. सर्वांचा तळतळाट आपल्या डोक्यावर त्याने घेतला होता. त्याच्यावर लोक दातओठ खात होते. त्यास शिव्याशाप देत होते. सर्वत्र असंतोषाच्या प्रचंड लाटा आदळत होत्या आणि सर्व देश हादरून गेला होता. हिंदुस्तानचा शनी कर्झन जरी निघून गेला तरी तेथील संताप थोडाच शमणार ? आग लावणारा जरी गेला, तरी आग थोडीच विझणार ? सर्प पळाला तरी त्याने मनसुराद विष हिंदुस्तानच्या हृदयात ओतलेच होते. सर्व देश दुःखावेगाने कण्हत होता. यामुळे नवीन गव्हर्नर जनरलने कसे धोरण ठेवावे याबद्दल गोपाळरावांनी त्यास कौन्सिलमध्ये सल्ला दिला. १९०६ मध्ये मिंटोच्या कारकीर्दीतील त्यांचे पहिले भाषण झाले. या व्याख्यानात सर्व प्रांतातील कर—जमिनीवरील कर—जे होते त्यांची माहिती सांगून हे कर कमी करण्यात यावे, मिठावरील कर जास्त कमी व्हावा आणि जमिनीवरील आकारास काही तरी एक मर्यादा घालावी असे त्यांनी सांगितले. ईजिप्तमध्ये जशा शेतकऱ्यांसाठी पतपेढ्या असतात, तशा, आपल्या देशात सरकारने स्थापन कराव्यां; कालव्यांची सुधारणा करावी; पाटबंधारे जास्त वाढवावे; शेतीमध्ये सुधारणा घडवून आणाव्या; धंदेशिक्षण आणि औद्योगिक शिक्षण यावर पुष्कळ पैसा खर्च करून देशात या ज्ञानाची वाढ होईल असे करावे यासाठी

अविरत प्रयत्न करणे सरकारचे कर्तव्य आहे; प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत असावे; आरोग्याची सोय करणे, चांगल्या पाण्याचा पुरवठा होण्याची व्यवस्था करणे इत्यादी शेकडो बाबींत सरकारने सुधारणा करण्यासाठी झटून प्रजेचा दुवा घ्यावा; सरतेशेवटी गोखले म्हणतात, "My Lord, the whole East is to-day throbbing with a new impulse vibrating with a new passion–and it is not to be expected that India alone should continue unaffected by changes that are in the very air around us. We could not remain outside this influence even if we would. We would not so remain even if we could. I trust the Government will read aright the significance of the profound and far-reaching change which is taking place in the public opinion of the country. A volume of new feeling is gathering which requires to be treated with care. New generatoions are rising up whose notions of the character and ideals of British rule are derived from their experience of the last few years, and whose minds are not restrained by the thought of the great work which England has on the whole accomplished in the past in this land. I fully believe that it is in the power of the Government to give a turn to this feeling which will make it a source of strength and not of weakness to the Empire. One thing, however, is clear. Such a result will not be achieved by any methods of repression. What the country needs at this moment above everything else is a Government, national in spirit even though it may be foreign in personnel—Government that will enable us to feel that *our* interests are the first consideration with it, and that *our* wishes and opinions are to it a matter of some account. My Lord, I have ventured to make these observations, because the present situation fills me with great anxie-

ty. I can only raise my humble voice by way of warning, by way of appeal : the rest lies on the knees of the gods."

या गोखल्यांच्या अर्थपूर्ण शब्दांचा मिंटोच्या मनावर योग्य तो परिणाम झाल्याविना राहिला नसेल असे आम्हांस वाटते.

कौन्सिमधले काम आटोपून गोखले स्वतःच्या जबाबदारीवर पुनः तिसऱ्याने इंग्लंडला निघून गेले. मोर्लेमिंटोची कारकीर्द सुरू झाली होती. हिंदुस्तानास काही तरी नवीन राजकीय हक्क मिळणार अशी दाट वदंता होती. गोखले १९०५ मध्ये जेव्हा इंग्लंडमध्ये होते तेव्हाच त्यांच्या मित्रांनी त्यांस इंग्लंडमध्ये येण्यास सुचविले होते. त्या वेळेस त्यांनी सार्वजनिक अशी भाषणे वगैरे केली नाहीत. त्यांचे काम आतून-भेटी, मुलाखती यांच्या रूपाने-चालले होते.

गोखले इंग्लंडला गेले परंतु इकडे हिंदुस्तानात कोण हलकल्लोळ सुरू झाला ! सर जे. बॅम्फील्ड फुल्लर हे बंगालमध्ये दंडुकेशाही गाजवीत होते. दडपशाहीला ऊत आला होता. सरकार केवळ निष्ठुर बनले होते. या फुल्लर साहेबांच्या हाताखालचे अधिकारीही त्यांस शोभेसेच होते. इतक्यात सर्वांचे लक्ष बारिसालकडे वेधले. बारिसालमध्ये काय बरे चालले होते ? बाबू अश्विनीकुमार दत्तांसारख्या लोकप्रिय पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखाली तेथे बहिष्काराची चळवळ जोरात चालू होती. या वाढत्या चळवळीचे अधिकाऱ्यांस वैषम्य वाटू लागणे साहजिक होते. लवकरच खुद्द बारिसाल येथे प्रांतिक सभा भरण्याचे घाटत होते. अविचारी लोक एक अडचण दूर करण्यासाठी दुसऱ्या हजार निर्माण करतात. सरकारचे तसेच झाले. अत्यंत शांतपणे बारिसालच्या रस्त्यातून पुढाऱ्यांची मिरवणूक चालू होती तरी पोलिसांनी पुढाऱ्यांचा अपमान केला. सन्मान्य लोकांवर काठीचा प्रयोग झाला. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या हुकुमाने सुरेंद्रनाथांस गिरफदार करण्यात आले. मॅजिस्ट्रेटने सुरेंद्रनाथांचा अपमान केला तेव्हा सुरेंद्रनाथांनी त्यांचाही केला. ताबडतोब सुरेंद्रनाथांस दंड ठोठावण्यांत आला. सभा बिगरपरवाना भरलेली असल्यामुळे, या सभेस हजर राहण्याबद्दल त्यांस दुसरा एक दंड ठोठावण्यात आला. मॅजिस्ट्रेटने दाखविलेला हा

व्यक्तिद्वेष लोकांच्या मनांस जास्तच चिडविण्यास कारणीभूत झाला. परंतु येवढ्यानेच काय झाले ? इमर्सन साहेबांनी सभा उधळून लाविली. ही गाऱ्हाणी फुल्लर साहेबांस दूर करिता आली असती. मागील आठवणी, व्रण बुजविता आले असते. परंतु फुल्लरांनी फूस दिली. गुरखे आणि पोलीस शहरावर सोडण्यात आले. लोकांस दहशत घालणारी सरकारी अधिकाऱ्यांची भाषणे, कडक जाहीरनामे, शाळेतील विद्यार्थ्यांवर खटले यांचे सत्र सर्रहा सुरू झाले. हायकोर्टाच्या निकालांनी, किंवा मोर्ले साहेबांच्या शिफारशींनी या गोष्टी कमी झाल्या नाहीत. परंतु इतक्यात एकदम फुल्लर साहेब यांनी राजीनामा दिला. या राजीनाम्याचा खुलासा मोर्लेसाहेबांनी आपल्या आठवणीत केला आहे. सिराजगंज येथील शाळांतील काही विद्यार्थ्यांस बंडखोर वर्तणुकीबद्दल गुन्हेगार ठरविण्यात आले. ज्या शाळांत ही मुले होती त्या शाळांचा कलकत्ता युनिव्हर्सिटीशी असलेला संबंध युनिव्हर्सिटीने तोडून टाकावा असे फुल्लर साहेबांनी युनिव्हर्सिटीला फर्मावले. या वेळेस हिंदुस्तान सरकार मध्ये पडले. युनिव्हर्सिटीचे नवीन कायदे होईपर्यंत थांबा असे हिंदुस्तानसरकारने फुल्लरांस लिहिले. परंतु फुल्लर फुगले. त्यांनी 'मी जसे लिहिलेले आहे तसे युनिव्हार्सिटीने वागलेच पाहिजे, नाही तर माझा राजीनामा मंजूर करा,' अशी धमकी दिली. परंतु आश्चर्य हे की, त्यांचा राजीनामा ताबडतोब मंजूर करण्यात आला. फुल्लर साहेब जेव्हा विलायतेत मोर्ले यांच्या मुलाखतीस गेले तेव्हा ते म्हणाले, 'माझा राजीनामा मंजूर होईल असे माझ्या ध्यानीमनीही नव्हते.' मोर्ले साहेबांनी पटकन् उत्तर दिले, 'I don't believe it is for the good of prestige to back up every official whatever he does, right or wrong.' 'अधिकाऱ्याने काहीही केले तरी त्याची प्रतिष्ठा राहण्यासाठी त्याच्या प्रत्येक कृत्याचे समर्थन करणे इष्ट नाही.'

फुल्लर साहेब हिंदुस्तानात हलकल्लोळ करीत असताना, गोखल्यांनी इंग्लंडमध्ये त्यांच्या विरुद्ध चळवळ केली. अशा अधिकाऱ्यास कामावरून दूर करा अशी त्यांनी आग्रहाची, निकडीची विनंती केली. या फुल्लर साहेबांबद्दल मोर्ले लिहितात :—

'He was quite well-fitted for Government work of or-

dinary scope, but I fear, no more fitted to manage the state of things in E. Bengal than am I to drive an engine." 'माझी आगगाडीचा ड्रायव्हर होण्याची जितकी लायकी, तितकीच पूर्व बंगालचा कारभार पाहण्यासाठी फुल्लरांची लायकी होती. सरकारचे साधारण काम मात्र त्यांस चांगले करता आले असते.' स्वतः मोर्ले साहेबांचे जर हे मत तर हिंदुस्तानांतील लोकांचे या साहेबबहादुराविषयी काय मत झाले असेल ?

फुल्लर साहेबांचे जरी स्वदेशी प्रयाण झाले तरी बंगालची फाळणी पुढे बादशहा हिंदुस्तानात येईपर्यंत रद्द झाली नाही. ही न होण्याचे कारण स्वतः कर्झन साहेबांनी दिले आहे. किचनेरबरोबरच्या झगड्यात कर्झन नामोहरम झाले. मानधन कर्झन राजीनामा देऊन गेले. त्यांस थोडाबहुत तरी संतोष व्हावा म्हणून, जिच्यासाठी कर्झनानी रात्रीचा दिवस केला, सर्व राष्ट्राचा विरोधही जुमानला नाही, अशी बंगालची फाळणी रद्द करण्यात आली नाही. कर्झन साहेब जून ३०, १९०८ रोजी इंग्लंडमध्ये म्हणाले की, "That measure had been thrown as a sap to soothe my wounded feeling rather than on grounds of political propriety or expediency." मोर्ले साहेब ही फाळणी रद्द करणार असे वाटत होते व अशी दाट वदंताही होती. परंतु कोठे माशी शिंकली कोण जाणे! ज्या गोष्टीमुळे अनर्थपरंपरा ओढवली ती गोष्ट दूर करणे या तत्त्वज्ञ मुत्सद्याच्या कां जिवावर आले कोणास कळे ? येवढे खरे की, हा व्रण आणखी पाचसहा वर्षे बुजावयाचा नव्हता.

परंतु गोखल्यांचा इंग्लंडमध्ये जाण्यात हा मुख्य हेतू नव्हता. उदार पक्षाच्या मंत्रिमंडळाकडून आणा अर्धा आणा राजकीय हक्क मिळाले तर पहावे यासाठी ते गेले होते. या बाजूने शक्य ती खटपट त्यांना करावयाची होती. त्यांनी पुष्कळ प्रमुख लोकांच्या भेटी घेतल्या. हिंदुस्तानातील स्थिती कशी आहे, राज्यकारभार कशा धोरणाने चालतो, हे राज्यकारभाराचे यंत्र कसे अहितकारक आहे हे त्यांनी दाखवून दिले. मोर्ले

साहेबांची पहिली मुलाखत त्यांनी गेल्या वर्षीच घेतली होती. नोव्हेंबरमध्ये ते मोर्लेसाहेबांस भेटून अर्धा तास त्यांचे संभाषण झाले होते. या भाषणाविषयी ' Immensely interesting ' असे मोर्ले लिहितात. या वर्षी त्यांची पहिली भेट मे च्या ७–८ तारखेस झाली. मोर्ले साहेबांस हिंदुस्थानविषयक प्रश्न सोडविण्यास गोखल्यांची पुष्कळ मदत झाली यात शंका नाही. गोखले व मोर्ले यांच्या एकंदर पाच मुलाखती झाल्या. शेवटची मुलाखत १ आगष्ट रोजी झाली. मोर्ले साहेब मिंटो यास लिहितात : ' आपण गोखल्यांची मिळते घेऊन त्यांची मर्जी राखिली पाहिजे. यात आपला फार फायदा आहे. गोखल्यांची हाऊस ऑफ कॉमन्समधील लोकांवर छाप पडली आहे, आणि माझ्या हिंदुस्तानविषयक भाषणाची त्यांनी तरफदारी केली आहे, ' ते पुढे लिहितात, ' He has a politician's head ; appreciates executive responsibility, has an eye for the tactics of practical common sense. ' गोखल्यांनी हिंदुस्तानास वसाहतीचे स्वराज्य प्राप्त करून घेणे हे आपले ध्येय आहे असे मोर्ले यांस स्पष्टपणे सांगितले. परंतु तत्त्वज्ञ मोर्ले काय म्हणतो पहा :— I equally made no secret of my conviction, that for many a day to come—long beyond the short span of time that may be left to us—this was a mere dream.' वसाहतीचा दर्जा हिंदुस्तानास देणे म्हणजे मोर्ले यांस स्वप्न वाटत होते. या वेळेस मंत्रिमंडळाने किंवा पार्लमेंटने जास्त सुधारणांचे हक्कही दिले असते. परंतु देणारे देते आणि कोठावळ्याचे पोट दुखते ! मोर्ले साहेबांस हिंदुस्तान योग्य दिसत नव्हता. त्यांस हिंदुस्तानास अल्प स्वल्प अधिकार देणेच हिताचे वाटत होते. मोर्ले साहेबांचा कंजूषपणा पाहिला म्हणजे छानदार लिहिणारा गडी मनाने किती कृपण व संकुचित असतो हे आढळून या बहुरूपी जगाची गंमत वाटते. आपल्या सुंदर व तत्त्वपूर्ण विचारांनी जगास झुलविणाऱ्या कलमकुशाग्रणींचे हे कार्पण्य व व्यवहारातील अनाठायी कठोरता पाहून मन उद्विग्न होते व या तकलुपी, वरपांगी लिहिणारांची कीव येते.

मोर्ले साहेबांस हिंदुस्तानास थोडे हक्क देण्यास ही वेळ योग्य आहे, असे स्पष्ट दिसत होते. ते जरा ऐटीने गोखल्यांस म्हणतात, ' ज्याच्यावर

मंत्रिमंडळाचा आणि कॉमन्स सभेचा विश्वास आहे असा सेक्रेटरी सुदैवाने तुम्हांस लाभला आहे, तुमचा व्हाइसरॉय हाही सुधारणा द्याव्या त्या मताचा आहे. देशातील इतर सरकारी अधिकारी व्हाइसरॉयच्या विरुद्ध जाणार नाहीत. परंतु या सुधारणा देण्याच्या बाबतीत येऊन जाऊन अडथळा येईल, मोडता येईल तो तुमच्या देशातील वेड्या व जहाल लोकांचा.' मोर्लेसाहेब म्हणतात—

'Only one thing can spoil it. Perversity and unreason in your friends. If they keep up the ferment in E. Bengal that will only make it hard, or even impossible for Government to move a step. *I ask you for no sort of engagement*; you must of course be the judge of your own duty, and I am aware that you have your own difficulties. So be it. We are quite earnest in our resolution to make an effective move. If your speakers or your newspapers set to work to belittle what we do, to clamour for the impossible then all will go wrong.'

मोर्ले याची मुत्सद्देगिरी वरील उताऱ्यात आहे. 'तुमच्या देशातील अत्याचार बंद करा, नाहीतर काही देत नाही.' अशी ही धमकी होती. गोखल्यांनी कबूल केले की, मी हिंदुस्तानातील माझ्या मित्रांस लिहितो की, शांतता राखा. ही कामगिरी करीत असताना गोपाळराव इतर कामे करीत होते. त्यांच्या खटपटीने आणि वजनाने सभाबंदीचा कायदा रद्द करण्यात आला; राष्ट्रीय गीते आणि मिरवणुकी यांस येणारे अडथळे नाहीसे झाले. शाळांतून हाकलून दिलेल्या मुलांना पुनः शाळेत जाण्याचा परवाना मिळाला.

अशा प्रकारे मोर्ले साहेबांजवळ खलबते व मुलाखती चालू असता अन्य द्वारे देशसेवा करण्याचे आपले कर्तव्य स्वसुखनिरभिलाषी गोखले करीत होते. लंडनमध्ये 'ईस्ट इंडिया असोसिएशन' म्हणून एक संस्था आहे. मिस मॅनिंग या सन्मान्य स्त्रीच्या देखरेखीखाली या संस्थेची वार्षिक सभा

' इम्पीरियल इन्स्टिट्यूट ' मध्ये भरली होती. या सभेपुढे गोपाळरावांनी स्वराज्य ( Self Government ) या विषयावर एक निबंध वाचला. हा निबंध फार उत्कृष्ट आहे. त्यांत ब्रिटिश राजसत्ता हिंदुस्तानात आल्यापासून तिचे थोडक्यात पर्यालोचन केले आहे. नंतर निरनिराळ्या वेळी दिलेली वचने, व जाहीरनामे यांची आठवण देऊन—' Good Government could never be a substitute for Government by the people themselves. ' हे इंग्लंडच्या प्रधानाचे महत्त्वाचे वाक्य त्यात सांगितले आहे. हिंदुस्तानातील सर्व बड्या जागा गोऱ्यांनी अडविल्या आहेत, जास्त अडवू पाहत आहेत आणि तरुण, सुशिक्षित व लायक माणसांस चांगल्या जागा मिळत नाहीत; उद्योगधंदे बुडत चालले; दारिद्र्य वाढत चालले; शिक्षणाच्या नावाने तर आवळ्यायेवढे पूज्य; असा सर्वत्र नन्नाचा पाढा हिंदुस्तानात ऐकू येत होता. असे का व्हावे ? जपानने आपली सर्वतोपरी भरभराट पाचपन्नास वर्षांत करून दाखविली आणि जगास थक्क केले. हिंदुस्तानामध्ये हे निदान सुधारलेल्या राज्यकर्त्यांच्या शंभर वर्षांच्या कारकीर्दीत तरी झाले पाहिजे होत, परंतु झाले नाही आणि आणखी शंभर वर्षें जरी गेली तरी होईल असे दिसत नाही. लोक सुशिक्षित होऊ द्यात मग आम्ही त्यांस जास्त जास्त शिक्षण मिळाले म्हणजे राज्यकारभारातही घेऊ. परंतु हे शिक्षण मिळणार कधी ? आणि ते जर कधीच मिळणार नसेल तर राज्यकारभारातही भाग कधीच मिळणार नाही हे उघड आहे. गोपाळराव म्हणाले : आम्हांस काही एकदम आजच स्वराज्य नको. परंतु आज काही तरी जास्त हक्क दिल्याखेरीज गत्यंतर नाही. हे हक्क म्हणजे गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलात, एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलमध्ये आणि स्टेट सेक्रेटरी-च्याही कौन्सिलात भरपूर सुधारणा करणे, त्याप्रमाणेच जिल्हाधिकाऱ्यांस मदत व सल्ला देण्यास प्रांतानिहाय व जिल्हानिहाय बोर्डे असावी. प्रथम दोन तीन वर्षे ही केवळ सल्ला देणारी असावी. परंतु पुढे त्या बोर्डांचा जिल्हाधिकाऱ्यांवर दाबही असावा. अशा प्रकारच्या सुधारणा अत्यंत जरूरीच्या म्हणून गोपाळ-रावांनी सुचविल्या. यानंतर थोड्या दिवसांनी गोखले हिंदुस्तानात परत आले.

डिसेंबरमध्ये १९०६ ची अत्यंत संस्मरणीय कॉंग्रेस कलकत्त्यास भरावयाची होती. या वर्षी नवीन राष्ट्रीय पक्षाचे प्रणेते टिळक हेच अध्यक्ष व्हावयाला

पाहिजे होते. टिळकांनी बनारसच्या कॉंग्रेसच्या वेळीच बहिष्कारावर निराळा ठराव व्हावा असा हट्ट धरला होता, आणि हा बहिष्कार सर्वप्रांतीय व्हावा असे त्यांचे रास्त म्हणणे होते. याच गोष्टीने बंगालला खरी सहानुभूती दाखविता येणे शक्य होते. परंतु त्या वेळी बहिष्काराचा निराळा ठराव पास झाला नाही. कॉंग्रेसमध्ये बहिष्कार या शब्दाला मान्यता मिळाली, आणि गोखल्यांनी अध्यक्षस्थानावरून त्या शब्दास संमती दिली यावरच टिळक यांनी त्या वेळेस संतोष मानिला. पुढच्या वर्षी आणखी पुढे जाऊ अशी त्यांनी मनी गाठ बांधून ठेविली. टिळकच अध्यक्ष पाहिजेत असा पालबाबूंनी धोशा आरंभिला. मुबईच्या फेरोजशहांस हे पसंत नव्हते. आता राष्ट्रीय सभेवर मोठी आपत्ती कोसळणार असे त्यांस वाटू लागले. टिळकांस अध्यक्ष होऊ देता कामा नये यासाठी त्यांनी निराळाच व्यूह रचला. मुंबईच्या सिंहाला बंगालच्या सुरेंद्राने साहाय्य देण्याचे ठरविले. अँग्लो-इंडियन पत्रेही प्रागतिकांना गोंजारू लागली. या जहाल मंडळींना जर कॉंग्रेस अनुकूल झाली तर राष्ट्राचे तारू भडकेल आणि त्याला नीट तारून नेणे अशक्य होईल अशी त्यांनी हाकाटी सुरू केली. याच पत्रांनी १९०५ मध्ये गोखल्यांसारख्यांसही गालिप्रदान करण्यास मागेपुढे पाहिले नाही. कारण त्यांनी बहिष्कार न्याय्य ठरविला होता. परंतु आता राष्ट्रीय पक्ष प्रबळ होणार हे पाहून या अँग्लो-इंडियनांस उकळी फुटली आणि प्रेमाचे भरते आले. परंतु ‘ अंतरींचा हेतु वेगळाचि ’ हे इंगितज्ञांसच समजून येते. सुरेंद्रनाथांचे उजवे हात जे भूपेंद्रनाथ बसू त्यांनी दादाभाईंस तार केली. ‘ राष्ट्रीय सभा मोठ्या आपत्तीत आहे. आपण तीस तारणार नाही का ? ’ अशा अर्थाची ही तार होती. ही तार करताना देशातील इतर पुढाऱ्यांचा, स्वागतकमिटीचा, कोणाचाही सल्ला घेण्यात आला नव्हता; देशावर येणाऱ्या आपत्तीमुळे या देशभक्तांस धीर धरवला नाही आणि दादाभाईंस अध्यक्ष होण्यास त्यांनी बोलाविले. दादाभाईंसारखा देशाच्यासाठी सर्व आयुष्य घालविणारा महर्षी अशा वेळी नकार कसा देईल ? त्यांनी अध्यक्ष होण्याचे कबूल केले. दादाभाईंच्या अध्यक्षस्थानी-योजनेस विरोध कोण आणि कोणत्या तोंडाने करणार? परंतु हे एकंदर करणे कपट-नाटक होते असे म्हणण्यास आम्हांस यत्किंचित्‌ही दिक्कत वाटत नाही. हे देशातील रास्त मतास

पायांखाली तुडविण्यासारखे होते. सरकारच्या कृष्णकारस्थानांसच काही हसावयास नको ! परंतु करावयाचे काय ? आपलेच दात आणि आपलेच ओठ ! आजपर्यंत ज्या कॉंग्रेसमध्ये ' हम करे सो कायदा ' असे वागलो त्याच कॉंग्रेसमध्ये आपणांस मान वाकवावी लागेल ही कल्पनाच या पुढाऱ्यांस सहन होत नव्हती. आजपर्यंत जसे चालले तसेच पुढे चालावे असे यांचे पोक्त सांगणे असे. परंतु काळ बदलत आहे याकडे यांचे लक्षच नसे. १८८५ ते १९०६ या वीस वर्षांत हिंदुस्तानात किती तफावत पडली होती हे या पुढाऱ्यांनी जर पाहिले असते, आणि सरकारची वाढती बेपर्वाई जर निःपक्षपातपणे पाहिली असती तर कॉंग्रेसच्या धोरणात फरक करणे त्यांसही इष्ट वाटले असते. परंतु एकाच वस्तूचे निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळे प्रतिबिंब पडते, हा प्रकृतिभेद आहे; आणि ' स्वभावो दुरतिक्रमः ' हा अबाधित नियम आहे; असो.

राष्ट्रीय सभा भरली. नवीन पक्षाचे तेथे संख्याधिक्य होते. अध्यक्ष दादाभाई हे तर केवळ शांतिब्रह्म ! त्यांनी आपल्या पवित्र व स्फूर्तिदायक वाणीने स्वराज्याचा सोज्वळ मंत्र सांगितला, हे पाहून इंग्लिश पत्रे जळफळू लागली. इंग्लिशमन पत्र तर ' दादाभाईंनी आगीत तेलच ओतले ' असे बहकू लागले ! ' Being called upon to quench he flames of hatred towards the British Rule in India, he only used kerosine for that purpose." टिळक व पाल यानीं राष्ट्रीय पक्षाची बैठक भरवून या कॉंग्रेसमध्ये स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण हे तीन ठराव पसार करून घ्यावयाचे ठरविले. यांपैकी तिसरा ठराव विशेष खडाजंगी न होता पास झाला. परंतु खडाजंगी जी झाली ती उरलेल्या दोन मुद्द्यांवर. सोवळ्या मवाळांना हे ठराव सर्वराष्ट्रीय करणे अहितकारक वाटत होते. बंगालमधील बहिष्कार–चळवळ न्याय्य आहे असा ठराव पास झाला. या ठरावांत इतर प्रांतांनी बहिष्कार सुरू करावा असे नव्हते; अगर सुरू केला तर वाईट असेही नव्हते, परंतु जे कृत्य बंगालमध्ये चांगले तेच इतर प्रांतांत तरी कसे वाईट ठरेल ? बंगालमध्ये फाळणी हे एक जास्त कारण होते. परंतु फाळणीखेरीज अशी शेकडो दुःख दरएक प्रांतात होती की, त्यासाठीही बहिष्कार–चळवळ उचलणे न्याय्य

होते. स्वदेशीचा ठराव विषयनियामक कमिटीत जेव्हा आणला गेला तेव्हा त्यात, ' स्वार्थत्याग करूनही स्वदेशीच वापरणे इष्ट आहे ' असे शब्द घाला असा टिळकांनी आग्रह धरला, परंतु टिळकांची ही सूचना एकदम फेटाळण्यात आली. टिळकांनी मते मोजा असा आग्रह धरला; परंतु त्यांचे म्हणणे मान्य करण्यात आले नाही. या एकाच गोष्टीवरून मताधिक्याने कोणतीही गोष्ट करण्याचे या सोवळ्या मंडळींच्या कसे जिवावर येते ते स्पष्ट दिसते. टिळक, पाल, अश्विनीकुमार दत्त वगैरे राष्ट्रीय पक्षाची प्रमुख मंडळी उठून गेली आणि भर सभेत आपण ही सूचना पुढे मांडणार असे टिळकांनी अध्यक्षांस कळविले. परंतु अध्यक्षांनी स्वतःच ही सूचना ठरावात घालून दिली आणि तंटा विकोपास जाऊ दिला नाही. रास्त व न्याय्य गोष्टीसही नेमस्त कसे आढेवेढे घेत व अरेरावी करीत हे या गोष्टीवरून सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट होते.

आम्हांस या बहिष्कारावरच्या ठरावाचे राहून राहून आश्चर्य वाटते. स्वदेशी काय किंवा बहिष्कार काय सर्वराष्ट्रीय केल्याशिवाय त्यास जोर कसा यावा? एकाच प्रांताने उचल करून कसे भागणार? सर्व शरीराचे अवयव जेव्हा आपआपली कामे बंद करतील तेव्हाच जीवराजा ताळ्यावर येईल; परंतु एक हातच म्हणेल की, आपण काही करणार नाही, आणि इतर सर्व अवयव मात्र निमूटपणे आपआपली कामे करू लागतील तर शेवटी हातासच ताळ्यावर–मूळपदावर यावे लागेल. सर्वांनी जोराचा प्रतिकार केला पाहिजे. इतर प्रांतांच्या फुकाच्या–आणि मोठ्या मुष्किलीने मिळविलेल्या–शाब्दिक सहानुभूतीची किंमत कवडीइतकीही नाही असे आमचे प्रामाणिक मत आहे, मग इतरांस कसेही वाटो. जेव्हा बहिष्कार सर्वराष्ट्रीय आहे अस राष्ट्रीय सभेत काही मंडळी बोलू लागली तेव्हा गोखल्यांस खाली बसवेना. ते ताडकन् उभे राहिले आणि म्हणाले ' **बहिष्कार हा सर्वराष्ट्रीय नाही**. जो असे म्हणत असेल तो ते स्वतःच्या वैयक्तिक जबाबदारीवर म्हणत असला पाहिजे. कॉंग्रेसने असे नमूद केलेले नाही.' कॉंग्रेसने या प्रश्नावर मूक वृत्ती स्वीकारली. बंगालमधील चळवळ न्याय्य आहे येवढेच कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेचे म्हणणे पडले.

यानंतरची १९०७ सालची सभा लजपतराय लाहोरला बोलावीत होते. परंतु नागपूर हे ठिकाण सोईस्कर पाहून तेच कायम करण्यात आले. आणि पुढील वर्षाचे अध्यक्ष रासबिहारी घोष हे असावे असे पुढारी मंडळीने ठरवून आपसात दिलजमाई केली. आपआपल्या प्रांतिक परिषदातून कलकत्त्याचे ठराव हाणून पाडण्याचेही त्यांनी ठरवून टाकले. १९०६ च्या राष्ट्रीय सभेत राष्ट्रीय पक्षाचे बळ चांगलेच दिसून आले. पुढील वर्षी राष्ट्रीय पक्षाचे बळ कमी करून काँग्रेस आपल्याच हातात ठेवावयाची व तदनुसार वर्षभर सारखे प्रयत्न करावयाचे असे प्रागतिक पक्षाने ठरवून टाकले.

# गोखल्यांचा देशभर व्याख्यानांचा दौरा

गोखल्यांनी जेव्हा हे नवीन पक्षाचे बळ पाहिले तेव्हा काँग्रेसला सरकारची सहानुभूती मिळणार नाही अशी भीती त्यांस वाटू लागली. त्यांना मोर्ले साहेबांनी असे निक्षून सांगितले होते की जर हिंदुस्तानातील लोक भलतीकडेच वाहवत जाऊन सरकारवर शिव्याशापांचा भडिमार चालू ठेवतील तर हिंदुस्तानास कोणतेही हक्क मिळणे शक्य नाही. लॉर्ड मिंटो यांचा पुतळा अनावृत करावयाच्या वेळेस लॉर्ड हार्डिंज यांनीही याच प्रकारचे शब्द काढले. ते म्हणाले—" His task was rendered more difficult by a small body of the extremists, who hoped to wring concessions from the Government by acts of violence and crime. To a weakar man it might have appeared necessary on the appearance of the new agitation not only to meet it with repressive measures sufficient to ensure the preservation of public safety, but also to withhold all concessions, even those aspirations which he regarded as legitimate, for fear that he and his Government might be accused of yielding to threats and violence what they were unwilling to grant spontaneously.'

गोखल्यांच्या मनात हेच विचार आले. आपण हिंदुस्तानातील लोकांची मने क्षुब्ध होऊ देणार नाही अशी मोर्ले साहेबांस त्यांनी हमी दिली होती. आपल्या देशातील सुशिक्षित तरुणांस ताळ्यावर आणावे; त्यांस सर्वत्र निराशा, घनदाट अंधकार असे जे भासत आहे, तो भास नाहीसा करून, आशेचे

सोनेरी किरण त्यांस दाखवावे असे त्यांच्या मनाने घेतले. त्याचप्रमाणे आपण स्वराज्य–वसाहतीचे स्वराज्य–मागत आहो, परंतु ते चालविण्याची खरी पात्रता आपल्या अंगी कितपत आहे; आपणांत तंटे, भांडणे किती आहेत; परस्परांवर विश्वास नाही, परस्परांवर श्रद्धा नाही प्रेम नाही, लोभ नाही–अशा स्थितीत परमेश्वरी घटनेने आपल्या हातात सूत्रे आली, तरी सुयंत्रित व चांगला कारभार हाकण्यास आपण कितपत पात्र ठरू याची मनोमय साक्ष तरुणांस त्यांना पटवून द्यावयाची होती. **आधी लायक व्हा; मग मागा–हिरावून घ्या–वाटेल ते करा.** परंतु जे राखण्यास आपण अद्याप समर्थ नाही, ते मागण्यात तादृश फायदा नाही. हा उपदेश तरुणांस करण्यासाठी गोपाळरावांनी उत्तर-हिंदुस्तानात दौरा काढला. पंजाब आणि संयुक्तप्रांत यातील मुख्य मुख्य शहरी त्यांनी फेब्रुवारी महिना व्याख्याने देण्यात खर्च केला. अलाहाबाद, लखनौ, आग्रा, दिल्ली, लाहोर, अमृतसर वगैरे ठिकाणी त्यांनी स्फूर्तिदायक व्याख्याने दिली. देशाची सद्यस्थिती, स्वदेशी, हिंदुमुसलमानांचे ऐक्य आणि सुशिक्षितांचे, व विद्यार्थ्यांचे कर्तव्य या चतुःसूत्रीवर त्यांचा भर होता.

देशाच्या दुःस्थितीने गोखल्यांचे अंतःकरण पिळवटून निघत नसेल काय? आपल्या मायभूमीस भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा, क्षणक्षणी, पदोपदी होणारा उपमर्द, यांनी त्यांस संताप येत नसेल का? देशातील अठराविश्वे दारिद्र्य, अज्ञान, साफ बुडून गेलेले उद्योगधंदे, वाढती मृत्युसंख्या–एक का दोन, हजारो गोष्टी त्यांच्या अंतःकरणास विंचवाच्या नांगीप्रमाणे दंश करीत असतील; परंतु ते निराश होत नव्हते. आणि इतरांनीही निराश होऊ नये असे त्यांचे सांगणे होते. 'Indians should rise to the fullest height of their stature and be in their country what other people are in theirs.' ज्याप्रमाणे इतर देशांतील लोक मान वर काढून मोठ्या ऐटीने वागतात तसेच आपलेही लोक व्हावेत हीच त्यांचीही मनीषा होती. ही गोष्ट साध्य होण्यास आपणांस आपला कारभार चालविण्यास हक्क पाहिजेत हेही त्यांस मान्य होते, परंतु ते हक्क सांभाळण्यासाठी आपण प्रथम वळण लावून घेऊ या, समर्थ होऊ या, असे ते उपदेशीत होते. आपल्यामध्ये उत्साह, तेज, धैर्य आहे असे नवीन तरुणांवरून दिसते. कारण हे गुण नसते तर ते अत्याचारासही प्रवृत्त

होते ना. परंतु या पृथ्वीमोल गुणांना चांगल्या मार्गाने जाऊ द्या. ब्रिटिशांच्या सत्तेखाली आपण आलो—ही एक तपश्चर्या आहे. आता खडतर तपश्चर्या केली नाही तर या तपश्चर्येचे मिळणारे गोड फळ स्वराज्य ते कसे मिळेल ? आणि मिळाले तरी कसे पचेल ? ही तपश्चर्या अव्यंग व्हावी एतदर्थ तुम्ही आधी ऐक्य संपादन करा. आपसातील कलह एकमेकांशी मिळते घेऊन मिटविण्यास आपण शिकले पाहिजे. आपण सर्व भाऊ भाऊ आहो, आपण प्रथम हिंदी आहो, आणि मग हिंदु, पारशी, मुसलमान, शीख, ख्रिश्चन आहो असे प्रत्येक सुजाण अंतःकरणास पटले पाहिजे; आणि पटून या तत्त्वाचा परिपाक पदोपदी वर्तणुकीत दिसला पाहिजे. न्याय आणि प्रीति ही आपली ब्रीदवचने असावी. धर्म किंवा पंथ यातच आपण गुरफटून जाऊ नये. जपानचे प्रख्यात आरमारी सेनापती टोगो हे धर्माने ख्रिश्चन होते. त्यांस एकाने विचारले, काय हो तुम्ही ख्रिस्तानुयायी असून रशियाशी का लढता ? रशिया तर ख्रिस्तधर्मी आहे. हा थोर देशभक्त म्हणाला ' मी प्रथम जपानी आहे; नंतर ख्रिस्ती आहे. ' ' I am a Japanese first and a Christian afterwards, ' हे शब्द आपल्या देशातील लोकांनी हृत्पटावर खोदून ठेवून, तदनुरूप वागण्याचा शक्य तो प्रयत्न केला पाहिजे. आपल्या प्रेमसिंधूत सर्व हिंदुस्तानच्या जनतेस डुंबण्यास अवकाश पाहिजे. या गोष्टी आपणांस अशक्य वाटतात काय ? कल्पना—साम्राज्यात, रामाच्या राज्यातच या गोष्टी सुसाध्य अशी आपली दृढ कल्पना झाली आहे काय ? झाली असेल तर सर्वच ग्रंथ आटोपला म्हणावयाचा ! हिंदुस्तानास जगाच्या संस्कृतीत एक महत्त्वाचे कार्य करावयाचे आहे, आणि त्यासाठीच तो जगला आहे; व जगणार आहे. ते कार्य कोणते ? तर जगाला प्रेम आणि सत्य यांचा धडा द्यावयाचा; आध्यात्मिक ज्ञान सर्वांस शिकवावयाचे. रामतीर्थ, विवेकानंद यांनी हेच उच्च रवाने व उल्हासाने सांगितले. रानड्यांनी आपल्या व्याख्यानातून हीच इच्छा पुनः पुनः प्रदर्शित केली आहे. आशा आणि श्रद्धा यांना अंतःकरणांत पट्टाभिषेक करा. आशा अमर असावी. निराशा आणि अडचणी या कोणाच्या मार्गात येत नाहीत ? सर्वांच्याच मार्गात येतात. अशाही वेळी आपण आशापूर्ण राहून योग्य मार्गाने गेले पाहिजे. परमेश्वरावर दृढ भरंवसा ठेवून आपल्या

पवित्र ध्येयासाठी झटले पाहिजे. समाजाची सर्वांगीण उन्नती व्हावी एतदर्थ आपणांमध्ये नैतिक बळ व शिस्त उत्पन्न करणे फार अगत्याचे आहे. गोपाळरावांचे प्रत्येक वेळी सांगणे असे की, ' आपल्या लोकांमधून नैतिक सामर्थ्य कमी होत चालले आहे. ते मिळविल्याशिवाय अंगीकृत कार्यात जोम उत्पन्न करणे अशक्यप्रायच होय. ' महात्मा गांधींची आज सुद्धा हीच सांगी आहे, की ' आपण अंतःकरणातून परमात्म्याला–प्रेमाला आणि ऐक्याला–धुडकावून देऊन येथे सैतानाला अधिष्ठित केले आहे. ' म्हणून प्रत्येक देशभक्ताने, देशाच्या प्रत्येक कैवाऱ्याने प्रथमतः लोकात उच्च मनोवृत्तीचे बीजारोपण केले पाहिजे. संकुचित भावना व क्षुद्र विचार यांची मगर-मिठी आपणांस जर अद्याप सोडविता येणार नाही तर आपला भाग्योदय कसा होणार ? लोकांस असा उपदेश करणे अपमानास्पद आहे असे काही पुढाऱ्यांसही वाटते. परंतु ही गोष्ट बोलून दाखविलीच पाहिजे. वरपांगी देशभक्तीचा भोपळा फोडलाच पाहिजे. जे सूर्यप्रकाशाप्रमाणे स्पष्ट आहे ते बोलण्यास व ते नाहीसे करण्यास झटणे हे प्रत्येक सुजाण व देशप्रेमी माण-साचे कर्तव्यकर्म होय.

आपण नवीन जगात शिरत आहो. नवीन जगात येताना, नवीन कल्पना ग्रहण करिताना आपणास किंमतही जबर द्यावी लागणार आहे. औद्योगिक, व्यापारविषयक, अथवा शैक्षणिक व्यापारविषयक कोणतीही चळवळ असो, **आपल्या प्रत्येक चळवळीत शिस्त, स्वार्थत्याग व कुशलता हे गुण प्रामुख्याने चमकले पाहिजेत.** हे गुण नसल्यामुळेच आपणास अपयश येते. पुष्कळ वेळी आपणात सचोटी नाही असेही दिसून येते. गीतेत सांगितल्या-प्रमाणे ' योगः कर्मसु कौशलम् '–योग्य तऱ्हेने, कुशलतेने आपले कार्य तडीस नेणे म्हणजेच योगाचरण करणे होय. परंतु ही गोष्ट अद्याप आपणांस साधत नाही. या गोष्टी व त्यांच्या जोडीला–आपणांस ' अधोगः ' नेणाऱ्या–दुसऱ्या शेकडो गोष्टी आहेत. डोळे उघडे ठेवावे, मन निर्विकार करून विचार करावा म्हणजे ही कारणे दिसून येतील.

आपणांवर विपत्ती कोसळत आहे. यामुळे गोखले खचून जात नसत किंवा निराश होत नसत; निराश होणे त्यांना माहीतच नव्हते. आपण हाल-

अपेष्टांतूनच पुढे गेले पाहिजे. मोठ्या कष्टाने, श्रमाने जे आपण मिळवू त्यालाच किंमत आहे. आपली मिळकत " Hollowed by sacrifice and Sanctified by suffering " अशी असावी. वसाहतींचा दर्जा प्राप्त करून घेणे हे आपले ध्येय आहे, आणि सर्व सनदशीर मार्गांनी आपण ते मिळविण्यासाठी—हे ध्येय गाठण्यासाठी झटले पाहिजे.

वरीलप्रमाणे गोखल्यांनी आपल्या व्याख्यानांत ठिकठिकाणी उपदेश केला. टिळकांनीही या वेळेस आपणास 'वसाहतीचे स्वराज्य मिळवावयाचे आहे' असे लिहिले होते. अलाहाबादच्या व्याख्यानात गोखल्यांनी या गोष्टीचा आनंदाने उल्लेख केला. याच व्याख्यानात त्यांनी दुसऱ्याही कांही महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख केला आहे. युद्ध, परकी राष्ट्राबरोबर युद्धविषयक संधान, बंड आणि अत्याचार या चार गोष्टी वगळून जे काही आपण करू ते सर्व सनदशीर आहे. सरकारास अर्ज व विनंत्या करणे या गोष्टीपासून तो थेट कर न देणे या गोष्टीपर्यंत सर्व काही सनदशीर आहे. कर न देणे हे कायदेशीर आहे असे या व्याख्यानात गोखल्यांनी स्पष्टच म्हटले आहे. परंतु त्यांचे एक म्हणणे असे की—'Everything that was constitutional was not necessarily wise and expedient '—म्हणजे जे जे सनदशीर आहे ते ते सर्व शहाणपणाचे किंवा आज जरुरीचे आहे असे नाही. आम्हांस अमुक द्या असे सरकारला सांगण्यापेक्षा, प्रथम या सर्व कल्पनांचा जनतेत फैलाव केला पाहिजे. आपल्या मागे सर्व जनता उभी आहे असे सरकारास समजले पाहिजे म्हणजे मग आपल्या न्याय्य आकांक्षा सरकार अगदीच लाथाडील असे नाही.

सरकारी शिक्षणसंस्थांवर बहिष्कार घालणे हेही घातुक आहे असे त्यांनी अलाहाबाद येथे स्पष्ट सांगितले. " The building up of National Schools and Colleges all over the country out of private resources, on any scale worth speaking about, would take years and years of time and a tremendous amount of sacrifice on the part of the people and before anything substantial had been done, to talk of boycotting existing

institutions was sheer madness." स्वार्थत्याग लोकोत्तर असला पाहिजे. लोकात स्वार्थत्याग कितपत आहे हे अजमावण्यासाठी करबंदीचा जालीम उपाय सुरू करून पहा असे गोखल्यांनी या भाषणात सुचविले. कारण हा मार्ग सुचविल्यावर प्रत्येकावर जबाबदारी येईल आणि टाळा-टाळीस वाव राहणार नाही. लोकांची तयारी जर दिसणार नाही तर इतर गोष्टींनी—शाळांवर बहिष्कार, कोर्टावर बहिष्कार, असल्या क्षुल्लक बहिष्कारांनी काही एक होणार नाही. त्यांनी या आपल्या स्मरणीय व्याख्यानात सरतेशेवटी मोठ्या कळकळीने सांगितले. 'आपसातील भेदभाव आता विसरा व एक व्हा. क्षुल्लक गोष्टीसाठी रक्तपातावर जाऊ नका. जो स्वदेशीचे व्रत आचरतो, जो स्वार्थत्याग दाखवितो, जो देशाची राजकीय, औद्योगिक, सामाजिक कोणत्या तरी रीतीने उन्नती व एकीकरण करण्याचा प्रयत्न करितो तो देशप्रेमी समजा—तो देशभक्त आहे असे समजा, 'Nation building is nowhere an easy task.' हे त्यांचे वाक्य किती अर्थगंभीर आहे ! क्षणात हिंदुस्तानचे नंदनवन बनविता येईल काय ? बोलल्याबरोबर चुटकीसरशी होण्यासारख्या या गोष्टी नव्हेत. व्यक्तीला आपला उद्देश सिद्धीस नेण्यासाठी जर कित्येक वर्षे लागतात, तर राष्ट्र-पुरुषास आपले उद्दिष्ट गाठण्यास किती काळ पाहिजे, किती पिढ्या गेल्या पाहिजेत ? आज आपणांस सुखाचा घास मिळणार नाही, परंतु आपल्या नातवंडांस—भावी पिढ्यांस आनंदाचा दिवस दिसावा यासाठी झगडा. प्रयत्न करा. **या कामी सबंध आयुष्ये खर्च करावी लागतात, आपण म्हणजे खत आहो.** या खतामुळे पुढे पीक येईल व आपणांस आपली मुलेबाळे दुवा देतील.

या दौऱ्यात एक महत्त्वाची गोष्ट गोपाळरावांस साध्य झाली. मुसलमान बंधूंची मने त्यांनी काबीज केली. मुसलमानांच्या मनात हिंदू पुढाऱ्यांविषयी जी अढी बसली होती ती अढी गोखल्यांच्या भाषणाने बरीच नाहीशी झाली. गाठीचा पीळ उलगडत चालला. मन थोडे साफ झाले. सर्व देशाकडे आपलेपणाने पाहणारा महात्मा त्यांस दिसला. जुनी भांडणे उकरून द्वेषाग्नी प्रज्वलित करणाऱ्यांपेक्षा नवीन ध्येयाकडे सर्वांची दृष्टी वेधणारा हा उदारमती त्यांनी डोळे भरून पाहिला. त्यांना कौतुक वाटले

व समाधान झाले. प्रत्येकजण प्रथम हिंदी आहे, आणि मग तो हिंदू, पारशी, मुसलमान आहे हे त्यांचे सोनेरी सूत्र त्यांच्या मनश्चक्षूंस सुखवू लागले. गोखल्यांच्या स्वतःच्या आचरणात, उद्गारात हे सर्व उतरलेले होते. अलीगडसारख्या शहरी त्यांचे जंगी स्वागत झाले. आपलेही हितसंबंध या पुढाऱ्याच्या दृष्टीतून वगळले जात नाहीत हे त्यांस पूर्णपणे पटले. देशास जसा पाहिजे तसा हा नेता आहे असा त्यांनी मनात कयास बांधला. पंथ, जाती यांच्यावर उड्डाण करणारा व केवळ भविष्यत् कालाकडेच नजर देऊन आपल्या गतीस वळण देणारा असा हा लोकधुरीण जेव्हा त्यांनी पाहिला तेव्हा त्यांच्या आनंदास भरते आले. हजारो लोक मिरवणुकीत सामील झाले. पंथभेद विसरून, गोपाळरावांच्या गाडीचे घोडे सोडून, या हिंदभूच्या सुपुत्राची गाडी त्यांनी ओढिली. भव्य व शोभिवंत कमानी उभारल्या होत्या; हत्ती झुलत होते. अशा प्रकारे थाटाचे स्वागत ज्यांस मुसलमान लोकांनी मनापासून दिले असे गोखले हे पहिलेच हिंदी पुढारी होत. मानपत्रे, मुलाखती यांची गर्दी उसळली. गोपाळरावांस या सर्व मानमरातबाचा वीट आला असेल, परंतु त्यांचे तरुण मन, त्यांचे उत्साही हृदय या सर्व देखाव्याने उचंबळले यात शंका नाही. आपण योग्य प्रयत्न केला, कच न खाता जर लोकांस नेटाने उपदेश केला, मार्ग दाखविला तर ते आपल्या पाठोपाठ येतील असे त्यांस वाटले. स्वतःच्या बडेजावाने ते फुगले नाहीत; की चढेल झाले नाहीत. **त्यांनी तर देशासाठी सर्वस्व सोडले होते.** देशाशिवाय अन्य कोणत्याही गोष्टी त्यांस सुचत नव्हत्या. **त्याच गोष्टीचा त्यांस ध्यास लागला होता.** व देशाचे तारू अत्याचाराच्या खडकावर आपटू नये यासाठी त्यांनी हा दौरा काढला. त्यात आपल्यास यश आले असे वाटून त्यांस क्षणभर बरे वाटले.

# कौन्सिलातील कामगिरी

हा दौरा संपल्यानंतर त्यांस विसावा घेण्यास फुरसत कोठे होती? कौन्सिलचे काम मार्च महिन्यात सुरू झाले. या वर्षी मिठावरील कर एक रुपया-पर्यंत कमी करण्यात आला त्याबद्दल गोखल्यांनी प्रथम समाधान दर्शविले. मोर्ले साहेबांनी सुद्धा १९०६ साली इंग्लंडमध्ये केलेल्या अंदाजपत्रकावरील भाषणात हा मिठावरील कर साफ कमी केला पाहिजे अशा तऱ्हेचे शब्द उच्चारले होते. ते म्हणतात, "I cannot regard, and I will not regard with satisfaction or even with patience, the continuance at a high scale of a tax on a prime necessity of life." ते पुढे म्हणतात, "I am glad to think that the very able and expert financial member of the Viceroy's council hopes to make further reductions in the duty, even though he cannot go so far as I should like to go, and sweep the thing away altogether." मोर्ले साहेबांच्या या भाषणाचा उल्लेख करून गोपाळरावांनीही मिठावरील कर पुढे मागे अजिबात नाहीसा होईल अशी आशा प्रदर्शित केली. परंतु मिठावरील कर जरी कमी झाला तरीही गरीब लोकांवर कराचे ओझे जास्त पडतेच असे गोखल्यांनी सांगितले. फॉरेस्ट कायद्यामुळे गवताची काडी व लाकडाची काटकीही गरीब लोकांस मिळणे दुरापास्त होते. गुरांस चरावयास पुरेशी कुरणे नाहीत. 'Under Forests they have been deprived of their immemorial right to free grazing and free fuel' —आपल्या निर्णयसिंधूत 'वनानि गिरयो नद्यस्तीर्थान्यासतनानि च। देवखाताश्च

गर्ताश्च न स्वाम्यं तेषु विद्यते ।। ” असा नियम दिला आहे. परंतु बड्या अंमलदारांचे अवाढव्य पगार, लष्कराचे लाड पुरविण्यासाठी होणारा अपरंपार खर्च वगैरे भरून काढण्यासाठी, हें पवित्र प्रजानुरंजन–कार्य सिद्धीस, जावे एतदर्थ **सध्याच्या नीतिमान सरकारने या सर्व ठिकाणी कर बसविले आहेत.** यामुळे प्रत्येक गोष्टीची महर्घता वाढली. आणि यामुळे ‘These classes consist almost entirely of a broken and exhausted peasantry, without heart and without resource, and sunk hopelessly in a morass of indebtedness, ’ रेल्वेसंबंधी काही टीका करून मग ते आरोग्याकडे वळले. खजिन्यातील शिल्लकेचे हे नववे वर्ष होते. नऊ वर्षे सारखी शिल्लक पडत आहे, परंतु या शिल्लकेच्या उपयोग बहुतेक रेल्वे वाढविण्याकडे करण्यात आला. ही शिल्लक पडते याचे कारण “ A surplus is so much more money taken from the people, either through miscalculation or in other ways, than was needed for the reqeirements of the Government, and as it is not possible to return this money to the taxpayers in a direct form, what the Government is bound to do with it is to apply it to purposes which are most calculated to benefit the mass of the people.” ही शिल्लक लोकांच्या कल्याणार्थ कशी खर्च होईल इकडेच खरे पाहिले तर सरकारचे लक्ष पाहिजे. रेल्वेच्या दळणवळणापेक्षा देशातील आरोग्य वाढविणे हे सरकारचे सहस्रपट अधिक जवळचे व पवित्र कर्तव्य आहे. लाखो लोक प्लेग, कॉलरा, हिवताप यांनी मरत असता, तिकडे रेल्वे बांधून काय करणार ? असा सवाल गोखल्यांनी विचारला. हिंदुस्तानातील भयंकर मृत्युसंख्या पाहून सरकारच्या चित्तास काहीच वाटू नये हे आश्चर्य होय. सरकार ‘ आम्ही राष्ट्रीय कर्ज वारतो ’ असे सांगते. परंतु इतर देशांच्या मानाने हे कर्ज काही फारसे नाही. गोखले म्हणतात, ‘ The further reduction of this small debt, is not a matter of urgency and can well wait, when the money devoted to it, may be far better employed in saving the lives of the people.’ **स्थानिक संस्थांना**

आरोग्य सुधारणे अशक्यप्राय आहे हेही त्यांनी स्पष्ट सांगितले. **जेव्हा जेव्हा शिल्लक उरेल तेव्हा तेव्हा** ती प्रांतिक सरकारात वाटावी आणि **तिचा लोकांच्या आयुरारोग्यार्थ उपयोग होणे हे अत्यंत इष्ट व जरूरीचे आहे.** रेल्वेसाठी निराळे कर्ज काढावे परंतु ते कर्ज शेतकऱ्यांच्या पैशातून वारणे म्हणजे महापाप होय. रेल्वे भरभराटत आहेत, त्यांच्या नफ्यामधून हळूहळू कर्ज बारावे किंवा व्याज भरावे. परंतु गोखले म्हणतात, 'It seems to me most unfair that the loans thus raised should be supplemented by the proceeds of taxation.'

यानंतर रुप्याच्या नाण्यापासून—टांकसाळीपासून दरवर्षी होणारा पांच-सहा कोटींचा फायदा हा कशासाठी खर्च व्हायचा ते सरकारने सांगितले पाहिजे, असे सांगून गोखल्यांनी त्याच्या उपयोगाची दिशा दाखविली की, 'The Government ought to adhere to the idea of the fund merely serving as a guarantee for the maintenance of a stable exchange' सरकारने पुढील साली तरी या बाबतीत आपला विचार सांगावा असे म्हणून ते दुसऱ्या प्रश्नाकडे वळले.

अफूचे येणारे जे उत्पन्न आहे त्यासंबंधी ते म्हणाले, 'I confess I have always felt a sense of deep humiliation at the thought of this revenue, derived as it is practically from the degradation and moral ruin of the people of China.' हिंदुस्तानने जर हा व्यापार सोडला तर त्याचे जे नुकसान होईल त्याची भरपाई करण्यासाठी, हिंदुस्तान सरकारला ब्रिटिश खजिन्यातून काही रक्कम बहाल करण्यात यावी असे जे कित्येक ठिकाणी ध्वनित करण्यात येत होते त्यासंबंधी गोखल्यांनी आपले म्हणणे सांगितले, की इंग्लंडकडून अशी मदत मिळणे हे अशक्याहून अशक्य. बरे, समजा एक वेळ हे शक्य झाले, सूर्य पश्चिमेस उगवला, तरी आपणांस हा पैसा घेणे रास्त नाही. चीनवर अफूचा व्यापार लादण्यांत जरी इंग्लंडने तोफबाजी दाखविली, तरी या व्यापारापासून येणारे उत्पन्न फक्त हिंदुस्तानला मिळते. आणि यासाठी **हा अन्याय्य व पापमूलक पैसा कोणाकडून पैही न घेता अपाण सोडून**

**देण्यास तयार झाले पाहिजे.** ‘ For that would be only another name for charity—when in the interests of humanity this wretched traffic has got to be abolished. ’

नंतर ते सैन्य कमी करावे या नेहमीच्या प्रश्नाकडे वळले. हिंदुस्तानातील सैन्यासंबंधी लक्षात घेण्यासारख्या चार गोष्टी असतात. शिपायाला शक्य तितका पैसा मिळावा, कारण त्यायोगे तो तडफदार व उल्लसित राहतो. नंतर हिंदुस्तानातील गोऱ्या लोकांची सुरक्षितता. या गोऱ्यांस आपले संरक्षण कसे आहे इकडे लक्ष देण्यास फावते परंतु त्यासाठी गरीब लोकांवर करांचे ओझे किती पडते आहे इकडे लक्ष देण्यास त्यांस सवड नसते. नंतर एतद्देशीयांचा प्रश्न. त्यांस पैसा द्यावा लागतो, परंतु ह्या पैशातून होणाऱ्या सुखसोयी, हक्क वगैरे बाबतींत त्यांच्या तोंडाला पानेच पुसली जातात. आणि त्यानंतर हिंदुस्तानसरकारची दृष्टि-हे चार प्रश्न आहेत.

सैन्य व लष्कर यांसंबंधी उदार विचार परिस्थितीमुळे जे सुचावयास पाहिजेत ते सरकारास सुचत नसल्याने सुचविणे भाग होते. रशियाच्या स्वारीचा आता मागमूसही उरला नसून जपानचा विजय, आणि चीन व इराण यातील जागृती या गोष्टींमुळे युरोपियनांस आपले पाय पूर्वीप्रमाणे जलदीने पसरण्यास मिळणे शक्य राहिलेले नाही. १८ वे शतक आणि १९ वे शतक यांचा इतिहास जर तुलनात्मक दृष्टीने पाहिला तर असे दिसून येते की, युरोपमधील जनता केवळ राजा आणि प्रधान यांच्या हाताखाली वागणारी राहिली नाही. लढाई म्हणजे काय हे आता जनतेस कळू लागले आहे. यासाठी हिंदुस्तानातील लष्कर कमी करून खर्च कमी करणे रास्त व प्रसंगोचित आहे. त्याचप्रमाणे लष्करचा काही खर्च इंग्लंडने सोसला पाहिजे. लष्करमधला एतद्देशीय अधिकाऱ्यांचा दर्जा वाढविणे फार न्याय्य व जरूर आहे. याहून सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे हळूहळू लोकांस पुनः शस्त्रे वापरण्याची परवानगी देणे. **सर्व देशाला निःशस्त्र, निर्बल, निस्तेज करणे हे केवढे अघोर कृत्य आहे ?** सेनापतिसाहेबांनी ‘ गोखल्यांची मागणी दरवर्षी ऐकतो आहो ’ असे म्हटले होते. त्यास उद्देशून गोखले म्हणाले, ‘ But, my Lord, is it *my* fault that these things have to be

pressed again and again on the attention of the Government? If His Excellency would like to hear less of these complaints the remedy lies to a certain extent in his own hands.'

सरकारने प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत करण्यासंबंधीच्या उदार धोरणास संमती, मान्यता दाखविली याबद्दल गोखल्यांनी सरकारचे आभार मानले. थोड्याच दिवसांत आपली इच्छा परिपूर्ण होवो अशी इच्छा त्यांनी प्रदर्शित केली. 'No real economic or social development of a people is possible without the education of the masses. Such education is the foundation and necessary antecedent of increased economic activity in all branches of national production, in agriculture, small industries, manufactures and commerce.'

या प्रकारे अनेक प्रश्नांचा ऊहापोह करून गोपाळराव सद्यःस्थितीकडे वळले. ज्याप्रमाणे जातीजातींमध्ये एकमेकात न मिसळण्याची प्रबळ प्रवृत्ती असते, त्याप्रमाणे हिंदुस्तानच्या जातिभेदावर कोरडे ओढणाऱ्या व टीका करणाऱ्या या गोऱ्या अधिकाऱ्यांनी स्वतःची वेगळी जात बनविली आहे. त्यांच्या खुर्चीशेजारी कोणी बसता कामा नये. अधिकाराची जागा सदैव गोऱ्यांसच प्राप्त व्हावयाची. हे सिव्हिल सर्व्हंट—सनदी नोकर सांगतात की, आम्ही सद्यःस्थितीत सुखी आहो; व रयतेनेही सुखी असावे. गव्हर्नर वा गव्हर्नर जनरलचे कान फुंकणारे हेच गृहस्थ असतात. यासाठी जी सुधारणा या सनदी नोकरांस नापसंत ती घडून येणे म्हणजे महाकर्म कठिण. कोणतीही मागणी असो, ती फेटाळून लावण्यास हे अस्तन्या सारून बसलेलेच. परंतु जनता खवळली आहे. अशा वेळी काही तरी सुधारणा द्याव्या असे सरकारास वाटते आहे हे सुचिन्ह समजले पाहिजे. परंतु सुधारणा पोचट नसून भरीव—महत्त्वाच्या असाव्या असे सांगण्यापलीकडे गोखल्यांस काय करता येणे शक्य होते? त्यांनी एक इशारा देऊन आपले हे वार्षिक भाषण संपविले.

सैन्यात हिंदू लोकांस अधिकार द्या, सर्वांस दरवाजे उघडे ठेवा वगैरे गोखल्यांच्या म्हणण्यास उत्तर देतांना लॉर्ड किचनेर साहेब जरा गरम होऊन बोलले. गोखल्यांच्या म्हणण्यास दर्भंग्याच्या महाराजांनी संमती दिली. व सांगितले की हिंदी लोकांस, सुशिक्षितांस लष्करी शिक्षण दिलेच पाहिजे. परंतु गोखल्यांच्या या भाषणावर 'पायोनिअर' ने कुत्सित टीका केली. 'पायोनिअर' म्हणतो, 'Mr. Gokhale has not forgotten presumably a certain event known as the Indian mutiny. The creation of a citizen—army must be preceded by a guarantee of its loyalty and who is to guarantee the loyalty when the most eminent leaders of the people are men imbibed with the spirit of ill will and distrust as Mr. Gokhale ? If this is the attitude of the men at the top what language is likely to be held by those lower down the ladder ? The citizen-army would not be worth its rifles if it did not make immediate use of its power to turn against a conglomeration of abuses and oppression such as the Government is constantly portrayed by those who always claim to be speaking in the name of the entire people of India. Is the Government to pave the way itself for the catastrophe or shall it not rather wait until there are more evidences of sound sense and public spirit among the enlightened before commencing experiment ?'

या 'पायोनिअर'च्या पाणचटा, चटोर व चारगट लिहिण्यास 'हिंदुस्तान रिव्ह्यूने थोडक्यात पण मुद्दसूद उत्तर देऊन थप्पड लगाविली. 'हिंदुस्तान

रिव्ह्यू म्हणतो, 'But evidently Pioneer forgets that but for the splendid and deep loyalty of the princes and the people except perhaps in Oudh—as distinguished from the soldiers during the dark days of 1857, the map of India would have been differently coloured. It is well-known, although Pioneer chooses to forget it for the moment that the Mutiny of 1857 was not a national movement.' हिंदुस्तानात राजपुत्र आला तो म्हणतो, 'We shall never forget the affectionate greetings of India and Burma,' जॉन ब्राइट म्हणत असे की, 'You may govern India if you like for the good of England, but the good of England must come through the channels of the good of India.' परंतु एकाद्याने जरी असे उद्गार काढण्याचे नीतिधैर्य दाखविले तरी हिंदुस्तानवर जे अधिकारी येतात ते बहुधा हिंदुस्तानच्या हितास 'अब्रह्मण्यम्' समजणारेच असतात. इंग्लंडची तुंबडी भरली, गोऱ्यांचे गाल वर आले आणि लाल झाले की, पोटाची दामटी वळलेल्या हिंदुस्ताननें ढेकर दिलाच असे या बहादुरांना वाटते! परमेश्वर हेच चक्र उलटे फिरवील आणि याच चक्राला कधी तरी उलटी कलाटणी मिळेल अशा विश्वासावर दृष्टी ठेवून अवनत राष्ट्रांनी पाय हलविले पाहिजेत. दुसरे काय?

# भारत-सेवक समाज.

या वर्षातील अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे सर्व्हंट ऑफ इंडि
सोसायटीच्या सभासदांचे प्रथम संमेलन-अधिवेशन पुणे येथे भरले.
संस्था-हा भारतसेवक समाज १९०५ साली जून महिन्यात स्था
करण्यात आला होता. या वर्षी एप्रिल ते सप्टेंबरपर्यंत सर्व सभा
जमले आणि नियम, घटना वगैरे सर्व ठरविण्यांत आले. सर्व्हंट अ
इंडिया सोसायटीचे ध्येय, पूर्वी काँग्रेस स्थापण्याच्या आधी बंगा
तरुणांस उद्देशून ह्यूम साहेबांनी जे पत्रक काढले होते तदनुरूप बरे
होते असे फेरोजशहांचे चरित्रकार मोदी हे म्हणतात. 'It may
mentioned—that the lines suggested by Mr. Hume we
more or less adopted by Mr. G. K. Gokhale nearly thr
decades later in his Servants of India Society.

ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत वसाहतींचा दर्जा प्राप्त करून घेणे हे यांत
सभासदांचे ध्येय आहे. या ध्येयाच्या सिद्धीसाठी वर्षेच्या वर्षे अविश्र
परिश्रम झाले पाहिजेत, आणि देशाची संघटना केली पाहिजे. जे लोक
कार्यास येऊन मिळतील त्यांच्यावर संकटे कोसळतील, मोह आवरण घा
पाहील; परंतु संकटांस टाळून व मोहास न भाळून आपले पवित्र कर्त
सिद्धीस नेण्यासाठी प्रत्येक सभासदाने झटावयाचे. कुचराई करावया
नाही.

या सर्व गोष्टींची जाणीव हिंदुस्तानातील लोकांस पटविली पाहिजे
ज्याप्रमाणे धर्मप्रसारार्थ सर्वसंगपरित्याग करून कामे करणारे लोक असता

तद्वत् जनसेवा ही जनार्दनसेवाच आहे अशा उत्कट भावनेने लोकांनी आता पुढे यावे. देशप्रेमापुढे इतर सर्व गोष्टी तुच्छ, कवडीमोल वाटल्या पाहिजेत. स्वार्थत्यागपूर्वक काम करा म्हणजे ते कार्य पवित्र आहे.

एवंप्रकारे उच्च ध्येय डोळ्यांसमोर ठेवून निधड्या छातीने, व परमेश्वरावर दृढ श्रद्धा ठेवून प्रत्येक देशहितचिंतकाने कामास आरंभ करावा, आणि आपल्या कामात रमण्यात सात्त्विक आनंद मानून सुखी व्हावे.

सनदशीर मार्गाने चळवळ करून देशाची सर्वांगीण उन्नती करणे, व ती उन्नती करण्यासाठी देशातील तरुणांस तयार करणे हे संस्थेचे ध्येय आहे. एतदर्थ खालील गोष्टी सभासदाने कराव्या :—

( १ ) आपल्या स्वतःच्या उदाहरणाने लोकांत खरीखुरी देशभक्ती उत्पन्न करणे आणि तदर्थ त्यांस स्वार्थत्याग करण्यास शिकविणे.

( २ ) लोकांस राजकीय शिक्षण देणे आणि समाजात चळवळ करून लोकमत तयार करणे.

( ३ ) निरनिराळ्या जातीजातींतील विरोध काढून टाकून सलोखा व प्रेमभावना उत्पन्न करणे.

( ४ ) मागसलेल्या जातीत शिक्षणाचा फैलाव करणे; औद्योगिक धंदे-शिक्षणासंबंधी जास्त सुसंघटित प्रयत्न करणे.

( ५ ) अस्पृश्यांची सर्वतोपरी सुधारणा करणे.

संस्थेचे हे पांच उद्देश आहेत.

संस्थेची मुख्य कचेरी पुणे येथे असावयाची. तेथे राहावयास वसतिगृह व अभ्यासासाठी उत्तम पुस्तकालय असेल.

( १ ) सोसायटीचा एक ‘ फर्स्ट मेंबर ’ म्हणजे मुख्य अधिकारी असावयाचा व तो जन्मपावेतो असावयाचा.

( २ ) साधारण सभासद.

( ३ ) विद्यार्थी.

समाजाचे हे तीन घटक होत. प्रत्येक विद्यार्थ्यास पाच वर्षे शिक्षण देण्यात येईल.

संस्थेचे सर्व नियम वगैरे फर्स्ट मेंबर आणि तीन साधारण सभासद यांच्या अनुमतीने व सल्ल्याने होतील. बहुतेक सर्व सत्ता फर्स्ट मेंबरच्या हातात राहील. तीन मेंबरांचे एक कौन्सिल असेल. या कौन्सिलने शिफारस केल्याशिवाय कोणालाही सभासद करून घेता येणार नाही. प्रत्येक सभासदाने खालील शपथ घ्यावयाची असते :—

१. माझ्या डोळ्यांपुढे सदैव देशाच्याच कल्याणाची गोष्ट प्रथम राहील; मजमध्ये जे कांही उत्कृष्ट आहे ते ते सर्व मी आपल्या देशाच्या सेवेस अर्पण करीन.

२. देशाची सेवा करिताना स्वार्थलोलुपता मी मनात येऊ देणार नाही.

३. सर्व हिंदी लोकांस मी भाऊ असे समजेन, आणि सर्वांच्या उन्नतीसाठी, पंथ व जात बाजूस ठेवून मी प्रयत्न करीन.

४. माझ्या किंवा माझ्या कुटुंबासाठी सोसायटी जे काही देईल त्यातच मी आनंद मानीन. स्वत:साठी याहून अधिक पैसा मिळविण्याच्या भरीस मी पडणार नाही.

५. मी आपले खासगी आचरण पवित्र ठेवीन.

६. मी कोणाबरोबर खासगी, व्यक्तिगत भांडणे भांडणार नाही.

७. सोसायटीचे ध्येय सदोदित मी डोळ्यांसमोर ठेवीन. शक्य तितक्या कळकळीने व उत्कटतेने मी सोसायटीच्या अभिवृद्ध्यर्थ प्रयत्न करीन. सोसायटीच्या ध्येयाला प्रतिकूल असे मी काही करणार नाही.

१८९७ पासून गोपाळरावांच्या मनात असा एकादा राजकीय पंथ निर्माण करावा असे घोळत होते. त्या वेळचा त्यांचा विचार रामदासी पंथाप्रमाणे होता. बारा वर्षांची, बुद्धिमान् व पाणीदार मुले आपल्याजवळ ठेवावयाची; त्यांच्या पालकांपासून आम्ही मुलांस परत नेणार नाही असा करार करून घ्यावयाचा; नंतर या मुलांस सर्व प्रकारचे राजकीय शिक्षण द्यावयाचे; इंग्रजी शिकवावयाचे आणि आठ दहा वर्षे दृढ अध्ययन झाल्यावर निरनिराळ्या ठिकाणी कामे करण्यासाठी हे राजकीय संदेशवाहक पाठवून देऊन एकीकरण करावयाचे; असा त्यांचा प्रथम मानस होता; या मुलांचा

सर्व खर्च कसा चालवयाचा ? याकरिता गोपाळरावांनी एक युक्ती योजिली होती. त्यांनी आपले संबंधी दत्तोपंत वेलणकर यांस पुण्यास बोलाविले. दत्तोपंत हे गोखल्यांच्या बंधूंचे जांवई. त्यांनी दत्तोपंत यांस भांडवल देऊन काही मोठ्या प्रमाणावर उद्योगधंदा करा असे सांगितले, आणि या धंद्याच्या फायद्यातून या मुलांचा खर्च चालवावयाचे ठरविले. गोपाळरावाची महत्त्वाकांक्षा जबर आणि ते आपल्या मनात कल्पनाही मोठ्या मांडीत; परंतु हे शक्य कितपत आहे हे त्यांस मागाहून कळे. रानडे यांचे मेमोरिअल करताना प्रयोगशाळेसंबंधी त्यांचे असेच मोठे विचारहोते. परंतु त्यांतून काय निष्पन्न झाले ? असो. पुढे गोपाळराव कौन्सिलमध्ये गेले. मोठ्या लोकांशी वावरू लागले. हळू हळू त्यांचे तेज फाकू लागले. त्यांचे विचार आता बदलले. लहान मुले घेण्याऐवजी बी. ए. वगैरे झालेली, शिकलेली, तरुणबांड मंडळीच आपल्या पंथात घ्यावी; त्यांस राजकीय शिक्षण दोन तीन वर्षे द्यावे; त्यांच्या निर्वाहाची तरतूद करून त्यांस देशसेवा हेच एक कर्तव्य, ध्येय दाखवून द्यावे असे ठरले आणि वरीलप्रमाणे नियम वगैरे झाले.

हा भारतसेवक समाज निर्माण करिताना गोखल्यांच्या डोळ्यांपुढे युरोपातील जेसुइट लोकांचे प्रयत्न बहुधा असावे. खरोखर या जेसुइट लोकांचा इतिहास फार स्फूर्तिदायक आहे. आपली घरेदारे, आपला देश सोडून लांबलांबच्या देशांत सेंट झेविअरसारखे लोक केवळ एकाच ध्येयाने प्रेरित होऊन—परक्या लोकात, प्रतिकूल परिस्थितीस न जुमानता, जात; ज्यांची भाषा भिन्न, रीतिरिवाज भिन्न, त्यांस त्यांची भाषा शिकून उपदेश करणें, त्यांच्या भाषांची व्याकरणे लिहिणे, त्यांस सुशिक्षित करण्यासाठी शाळा उघडणे या गोष्टींची कोण मनुष्य प्रशंसा करणार नाही ? मनुष्यमात्राचे कल्याण—आपआपल्या बुद्धीप्रमाणे, व समजुतीनुसार करण्याची ही केवढी महनीय इच्छा ? या सदिच्छेचे कौतुक कोण करणार नाही ? मिशनरी लोक परक्याच्या प्रांतात जाऊन जर इतकी खटपट करतात तर आपल्याच देशात, ज्यांची मनें आपण जाणतो; ज्यांचे आचारविचार व स्वभाव आपणांस पूर्ण माहीत आहेत, जे आपल्याच धर्माचे व हाडामांसाचे, ज्यांचे व आपले हितसंबंध एकत्र निगडित झाले आहेत त्यांच्यामध्ये कार्य करण्याची स्फूर्ती आपणांस का होऊं नये ?

या जेसुइट लोकांपेक्षा कदाचित् रामदासी पंथ गोपाळरावांच्या मनश्चक्षूंसमोर जास्त प्रामुख्याने असावा. रामदासांचे सतराव्या शतकांतील कार्य पाहिले की, मन चकित होते. दळणवळणाची नीट साधने नसताना, व मुसलमानांचें वर्चस्व सर्वत्र स्थापित झालेले असताना त्यांनी अकराशे मठ स्थापले. असा एकही देशाचा भाग सोडला नाही की, जेथे मठ नाही. जे जे भरभराटीचे मुसलमानी शहर असेल तेथे तेथे समर्थांचे दोन मठ असावयाचेच.या मठांचे एकीकरण केले, प्रत्येकास शिस्त लाविली मठांतून ग्रंथालये उघडली, आणि एक प्रकारे सर्व प्रकारचे नवचैतन्य राष्ट्रात खेळविले, नसानसातून जीवनरस ओतला. समर्थ एकटे भिक्षेच्या बळावर कोणापाशी विशेष याचना न करिता जे करू शकले ते सध्यांच्या सुशिक्षणाच्या वाढत्या काळात, दळणवळणाची साधने अनुकूल असता का करता येऊ नये ? करता येईल, परंतु प्रयत्न झाले पाहिजेत. 'जो तो बुद्धीच सांगतो' हा मामला मोडून जे आपला नेता सांगेल तद्नुसार वागणे हेच अनुयायांचे काम असावे आणि अशा रीतीने संघटित काम सूत्र-पद्धतीने जर केले तर होईल असे गोपाळरावांस वाटले असावे. एकएकट्यांनी प्रयत्न करणे आणि एकमेकांच्या प्रयत्नांची एकमेकांस ओळख नसणे या तऱ्हेने पाऊल पुढे पडावयाचे नाही. एकाच विचाराचे, एकाच ध्येयाचे, एकाच उच्च मनोवृत्तीने भारून गेलेले लोक जर देशसेवेचे कंकण करी बांधितील तर देशाची बरीच सुधारणा हा हा म्हणता होईल. '**सामर्थ्य आहे चळवळीचे। जो जो करील तयाचे**'—चळवळीत व संघटनेतच सामर्थ्य असते. 'वन्हि तो चेतवावा रे, चेतविताचि चेततो'—एकदा काडी लावून द्या की काम झाले ! देशातील अज्ञानाला प्रत्येकाने काडी लावावी की ज्ञानाचा उजेड आलाच. '**यत्न तो देव जाणावा**' हे समर्थांचे अमोल उपदेशवचन आपण डोळ्यांआड करून भागणार नाही. आणि समर्थांनी ज्या गोष्टीवर विशेष जोर दिला ती गोष्ट ही की, 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे'—जसे सांगाल तसे वागा. उच्चाराप्रमाणे आचार असेल तर तुमच्या सांगीचा जास्त परिणाम होईल. प्रतिज्ञापत्रकात या गोष्टीचा समावेश आहे. आधुनिक पद्धतीचा रामदास पंथ गोपाळरावांनी निर्माण केला. या तरुणांचा शिक्षणक्रमही मोठ्या मार्मिकतेने आखला

होता. ज्या शिस्तींतून गोखले स्वतः गेले तीच शिस्त इतर कार्यकर्त्यांस लावणे त्यांस इष्ट व जरूर वाटलें. **पांच वर्षें विद्यार्थ्यानें-देशसेवकानें सर्व प्रश्नांचा सांगोपांग अभ्यास करावा. आणि मग लेखणी व जिव्हा यांस चालना द्यावी.** म्हणजे तो जे बोलेल त्याचा लोकांस विचार करावाच लागेल. कारण त्याचे लिहिणे व बोलणे भारदस्त व विचारार्हच असेल. बेझंट-बाई म्हणतात : " For one thing, I would ask you specially to help this young society. It is because he demanded that everyone who came into it should study before he acted and should konw before he spoke. Five years of silence he imposed on those who came to him before they might write or speak or try to guide their fellowmen and there he showed his wisdom and the secret of his power for he never spoke save with knowledge behind speaking, and those who try to emulate his example must also learn before they begin to teach. " अशा रीतीने तरुण सुशिक्षित करावयाचे. नंतर देशासाठी, त्यांनी सोसायटीच्या भिक्षा-झोळीतून जो घास मिळेल त्यावर तृप्त राहून निरहंकार वृत्तीने आणि निरपेक्षपणे काम करणे हे कठिण तर खरेच, परंतु असे करण्यासाठी जेव्हा हजारो तरुण पुढे येतील तेव्हाच थोडा तरी भाग्योदय जवळ आला असे म्हणता येईल. स्वप्नात सुद्धा देशाचे विचारच मनी यावे, खेळावे, आणि कल्पनांना मूर्त स्वरूप देण्यात जागृतपणाचा वेळ जावा-यापेक्षा उच्चतम आयुष्यक्रम कोणता आहे ? या कठिण कार्याला लोक वाहून घेतील की नाही अशी शंका चिरोलसाहेबांनी आपल्या पुस्तकात प्रदर्शित केली आहे, लोक परमेश्वरप्राप्तीकरिता-पारलौकिक हितास्तव स्वार्थावर निखारा ठेवितील, घरदार सोडतील, मानापमानाचे गाठोडे गुंडाळतील; परंतु जेथे पार-लौकिक हिताचा प्रश्न नाही; जनसेवेचे खडतर व्रत-ऐहिक कामच जेथे आहे तेथे लोक धावणार नाहीत, असे हिंदी मनाबद्दल कोती समजूत करून घेणाऱ्या चिरोलसाहेबांस वाटले, ते म्हणतात :—

" Will ' The Servants of India ' find the same permanent

inspirations in the cult of an Indian Motherland, however highly spiritualized, that has no rewards to offer either in this world or in any other ?"

'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी' असे आमच्येकडेही सांगतात. परोपकार करणे म्हणजे परमेश्वरासच संतुष्ट करणे हे हिंदवासी पूर्णपणे जाणतात. भारतसेवक समाजाच्या नियमावलीत 'God' हा शब्द कोठेही नसला, तरी ज्या ईश्वराच्या लेकरांसाठी, ज्यांच्या हितासाठी हा संघ स्थापन झाला होता, त्या संघात सामील होण्याने आपल्या देशाचेच नव्हे तर परमेश्वराने नेमून दिलेलें, त्याला आवडेल असेच काम आपण करीत आहो ही प्रत्येकाची भावना न होणे अपरिहार्य आहे. समष्टीच्या हितात व्यष्टीचे हित विसरणे, समष्टीचे हित तेच व्यष्टीचे हित असो वा नसो, व्यक्तीने तेच विशेषतः करावे असे आमचा धर्म शिकवितो. व्यष्टीचे हित व्यष्टीने अंतरंगी सुधारत जाणे यात आहे व तदनुसार नंतर इतरांस मार्ग दाखविणे म्हणजेच समष्टीचे हित. चिरोलसाहेबांस ही शंका का आली हे आम्हास समजत नाही. 'जे का रंजले गांजले, त्यांसी म्हणे जो आपुले । तोचि साधु ओळखावा, देव तेथेचि जाणावा ॥,' किंवा 'दया क्षमा शांती । तेथे देवाची वसती ॥' या व अशा प्रकारच्या शेकडो उद्गारांवरून हिंदुधर्माचे उज्ज्वल स्वरूप हेच दिसते की, ईश्वर स्वर्गात विलसत नसून, तो प्रत्येकाच्या हृदयसिंहासनावर अधिष्ठित झालेला आहे. तेव्हा वरच्या अभंगात दर्शविल्याप्रमाणे जो सर्वांस आपल्या कुटुंबाप्रमाणे लेखतो त्याच्या जवळ पारलौकिक प्रश्नच उरत नाही. परलोकात जे मिळवावयाचे ते त्याच्या हृदयमंदिरात येऊन बसलेलेच असते. हिंदू लोकांस जनसेवा म्हणजे धार्मिक भावनामय परमेश्वरास आवडणारे कृत्यच वाटते. **भिकाऱ्याला दान करणे किंवा रस्त्यावरचा दगड दूर करणे या साध्या गोष्टीतही धार्मिक भावना आहे.** जर साधारण मनुष्यालाही प्रत्येक गोष्ट धर्ममय वाटते तर जनसेवेसारखे लोकोत्तर नैष्ठिक व्रत ज्याने घेतले त्याला धार्मिक स्फूर्ति का वाटू नये ?

या संस्थेसाठी गोपाळरावांनी पैसे कसे मिळवले हे त्यांचे त्यांनाच

माहीत, त्यांना फार श्रम झाले, अत्यंत दगदग झाली. परंतु पोटच्या पोरा-पेक्षाही संस्था त्यांना प्यारी. स्वतःचे स्मारकच त्यांनी जणु उभारून ठेवले. आपले कर्तृत्व, आपली ध्येये, आपले जीवनसर्वस्व त्यांनी येथे ओतले, गोखल्यांस मुंबईच्या धनिक लोकांचा पाठिंबा चांगलाच असे. पारशी समाजातही त्यांचे वजन होते. गोखल्यांनी पैसे मागितले म्हणजे त्यास नकार कोण दाखविणार? अशा प्रकारचा **निःसंग भिकारी दारी येणे म्हणजेच खरोखर भाग्य**! गोखले पुष्कळदा स्वतःच वाटेल तो आकडा घालून श्रीमंत शेटजीकडे पाठवीत व लगेच शेटजीकडून पैसे येत. तुम्ही पैशाचे काय करता असे कोण विचारील? त्याशिवाय जोपर्यंत वरिष्ठ कायदे-कौन्सिल कलकत्त्यास होते, तोपर्यंत दर वर्षी कौन्सिलच्या बैठकीहून परत येताना गोपाळराव धनसंपन्न बंगाली जमीनदारांकडून, व लक्षाधीशांकडून दहावीस हजार रुपये घेऊन यावयाचे. गोपाळराव जोपर्यंत हयात होते तोपर्यंत पुष्कळ बंगाली लोक दर वर्षी नियमाने पैसे पाठवीत असत. गोखल्यांच्या या **भारतसेवक समाजासाठी इंग्लंडातील एका गरीब बाईने एक गिनी पाठवून दिली होती.** राजवाडे यांच्या ग्रंथप्रकाशनासाठी चिपळूणच्या एका गरीब माणसाने असेच एकदा चार आणे दिले होते. गोपाळरावांस त्या गिनीचे फार कौतुक वाटले व ते म्हणाले, 'This is real affection' यांनाच कामाची माहिती खरी समजली. आता संस्थेला कायमचे स्वरूप आले आहे. निसर्गसौंदर्य, शुद्ध हवा, गावापासून जरा दूर जागा, राजकीय स्वरूपाच्या ग्रंथांचा, रिपोर्टांचा, सर्व प्रकारच्या कागदपत्रांचा व उत्तमोत्तम ग्रंथांचा संग्रह व निरनिराळ्या वर्तमानपत्रांच्या फायली, मासिके अशी येथे सर्व जय्यत तयारी आहे. काम करणाऱ्याला येथे पूर्ण वाव आहे. इच्छा व उद्योग यांची जोड मात्र लाभली पाहिजे. नाही तर जड पुस्तकांचा काय फायदा?

गोपाळरावांच्या भारतसेवक समाजाचे हे पहिले अधिवेशन पार पडत असता सर्व देशाला आग लागली होती. बाबू बिपिनचंद्र पाल हे मद्रासच्या समुद्रकिनाऱ्यावर आपल्या जळजळीत व्याख्यानांनी तरुणांची मने पेटवून देत होते. पालबाबूंचे अमोघ व अचूक परिणामकारी वक्तृत्व आणि तरुण लोकांची उत्साही व भावनापूर्ण मने, मग काय विचारता? वक्तृत्वाने केलेले असे परिणाम हिंदुस्तानच्या इतिहासात अपूर्व होत. ज्या धोक्याची सूचना

कौन्सिलमधील भाषणात गोखल्यांनी दिली होती, ती संकटे भराभर येऊ लागली. **वक्तृत्वाचा गडगडाट आणि ओजस्वी, तेजस्वी लेखणीचा चमचमाट** देशातील स्थिती कशी आहे आणि वारा कोणत्या दिशेने वाहत आहे हे दाखवू लागला. कोठे ना कोठे सर्वत्र धामधूम चालू होती. खुद्द मुंबईमध्ये मुंबईच्या म्युनिसिपालिटीचे केवळ जीव की प्राण जे मेथा, त्यांच्यावर अधिकारी वर्गाने काही लोकांस खाकोटीत घेऊन गिल्ला चालविला होता. या गोष्टीचा निषेध करण्यासाठी मुंबईस जंगी जाहीर सभा भरली होती. गोपाळराव तेथे अध्यक्ष झाले.

या गडबडीत असता गोपाळरावांवर एक अकल्पित कौटुंबिक आपत्ती कोसळली. त्यांचे वडील बंधू गोविंदराव—ज्यांनी त्यांस वडिलांच्या मागे शिक्षणाची गोड फळे चाखविली, व वडील आहेत कीं नाहीत याची स्मृतीही होऊ दिली नाही, असे पितृतुल्य बंधू हा लोक सोडून २१ जून १९०७ रोजी गेले. घरी गरिबी होती तरी गोपाळास त्यांनी कधी उणे पडू दिले नव्हते. असा उदार मनाचा, प्रेमळ भाऊ मरण पावल्यामुळे, हळुवार मनाच्या गोपाळरावांस फार शोक झाला. त्यांच्या मनाला धक्का बसला. भावाच्या मुलांमाणसांस आता गोपाळराव हेच आधार होते. देशातील बिकट परिस्थितीमुळे त्यांस चार अश्रू ढाळण्यासही फुरसत नव्हती.

पंजाबमध्ये असंतोषाच्या लाटा उसळत होत्या. कॉलनायझेशनचे बिल व लँड ॲक्विझिशन बिलांत दुरुस्ती करण्याचे बिल यांनी पंजाबात फार खळबळ माजली. लोकांस संताप आला. सरकारने दडपशाहीचे सत्र सुरू केले. लाला लजपतराय व अजितसिंग या दोन पुढाऱ्यांना अटक करण्यात येऊन त्यांस शिक्षा झाली.

पंजाबमध्ये जमीनमहसुलामध्ये वाढ करण्यात आली. बारीदोआब कालव्याच्या पाण्याचे दर वाढविण्यात आले. याच सुमारास कॉलनायझेशन बिल पंजाबसरकारने पुढे आणले. परंतु लॉर्ड मिंटो यांनी या बिलास संमती देण्याचे नाकारले. कालव्याच्या पाण्याचे दर वाढले तेव्हा आम्ही कर देत नाही असे जमीनदार म्हणू लागले आणि सरकारनेही माघार

घेतली. पंजाबात असंतोष पसरविण्यास मुख्यतः जबाबदार जर कोणी असेल तर सरकारच्या पुढ्यातील 'सिव्हिल आणि मिलिटरी गॅझेट' हेच होय. हिंदुस्थानांतील सुशिक्षितांस शेलक्या शिव्यांचा अहेर करण्यात या गॅझेटाने खरोखरच आघाडी मारली. 'बडबडये पदवीधर' ( Babbling B. A. s. ), हलकट जातीचे ( Base-born ), निंदास्पद सुशिक्षित वीर ( An unhonoured nobility of the school ), दास ( Serfs ), रडतराव, ( Beggars on horseback ), अंत्यज वर्ग ( Servile classes), कलंकित जात ( A class that carries stigma )—एक का दीन हजारो गालिप्रदाने गॅझेट रोज देत होता. सर डेन्सिल बेट्सन यांच्याकडे पंजाबी लोकांनी याबद्दल दोनदा अर्ज केले. परंतु या लिखाणाबद्दल खेद प्रदर्शित करण्यापलीकडे त्यांनी जास्त काय करावे अशी तुमची अपेक्षा आहे असे त्यांनी नक्राश्रु ढाळले. परंतु हिंदी पत्रांच्या मुस्कटदाबीस मात्र पारावार राहिला नाही. 'इंडिया' पत्रात एक पत्र छापल्याबद्दल त्याच्या संपादकास–पिण्डीदास यांस पाच वर्षांची सजा समर्पण करण्यात आली. छापणारा 'दीनानाथ' यास दोन वर्षे तुरुंगवासाच्या सुखाचा आस्वाद घेण्यास माबाप व न्यायनिष्ठुर सरकारने पाठवून दिले. 'पंजाबी' पत्रानें वेठीस मजूर लावण्याच्या दुष्ट कृत्यावर टीका कली. दोन लोक या वेठीसाठी मारले गेले हे लिहिल्याबद्दल सदरहू पत्राचे मालक 'लाला जसवंतराय' यांस एक हजार रुपये दंड व सहा माहिन्यांची शिक्षा झाली. संपादक के. के. आठवले यांस दोनशें रुपये दंड व सहा महिने शिक्षा झाली. ही गोष्ट एंप्रिल १६, १९०७ रोजी झाली. परंतु ही धरपकड संपते न संपते तोच रावळपिंडीस दंगे झाले. मे महिन्यात ही खळबळ झाली. अजितसिंग यांनी ( Indian Patriot's Association ) 'हिंदी देशभक्तांची सभा' स्थापिली होती. तिचा मुख्य उद्देश शेतकऱ्यांची गाऱ्हाणी दूर करणे हा होता. लायलपूर मुक्कामी लालाजी मार्चच्या २२ तारखेस गेले होते. तेथे त्यांनी एक जोरदार भाषण करून 'अधिकारी हे जनतेला जबाबदार असले पाहिजेत.' ( Officials are servants of the public ) असे स्पष्ट बजाविले. या गोष्टीमुळे सरकारचा अजितसिंग व लालाजी यांच्यावर डोळा राहिला. एप्रिल सात

आणि एकवीस या दोन दिवशी अजितसिंग आणि हंसराज सोहानी यांनी पुनः व्याख्याने दिली. डेप्युटी कमिशनर यांनी अध्यक्ष आणि दोन वकील–यांस बोलावून आणले. सहा वकील मेच्या तीन तारखेपासून आक्टोबरच्या एक तारखेपर्यंत तुरुंगात डांबून ठेवले. त्यांच्यापैकी एक-जण गतप्राण झाला. आणखी साठ लोक रावळपिंडीस पकडले गेले. तिघा जणांस सात वर्षांची शिक्षा दिली. या खटल्यासाठी दिल्लीचे सेशन्स जज्ज मार्टिनो यांस स्पेशल जज्ज नेमले होते. मेच्या ९ तारखेस लालाजी व अजितसिंग यांच्यावर कोणताही आरोप शाबीत न करता त्यांस एकदम हद्दपार करण्यात आले. मेच्या ११ तार-खेस व्हाइसरॉयांनी पंजाबमध्ये सभाबंदीचा हुकूम फर्माविला. लालाजींचा अपराध न दाखविताही शिक्षा सांगण्याबद्दल मोर्ले साहेबांनी १८१८ च्या रेग्युलेशनकडे बोट दाखविले. सभा भरवावयाची झाल्यास सात दिवस सरका-रला आगाऊ कळविले पाहिजे, असे जाहीर झाले. मेच्या २७ तारखेस व्हाइस-रॉयने शहाणपणाने कॉलनायझेशन बिलास शेवटचा नकार दर्शविला, ही गोष्ट अलाहिदा. पण एकंदरीत पंजाबात असंतोष माजून राहिला होता. एतद्देशी-यांस न्याय कसा तो मिळतच नव्हता. लालाजींसारख्या दिलदार माणसास हद्दपार करणे व तेही विनाचौकशी, हे पाहून ‘ गॅझेट ’ ला तर आनंदाच्या उकळ्या फुटल्या. ते लिहिते, ‘ Lala Lajpatroy simply becomes honest. ’ थोरो या प्रख्यात व थोर अमेरिकनाने एके ठिकाणी म्हटले आहे की ‘ ज्या राज्यात कोणीही अन्यायाने पकडला जातो, अशा राज्यात सच्चा व सचोटीचा जो माणूस असतो त्यास राहण्यास कारागृह हेच योग्य स्थान होय. (Under a Government which imprisons any unjustly the true place for a just man is also a prison.) प्रत्येक चळवळीत ज्याने पुढाकार घ्यावा मग ती चळवळ, धार्मिक, शैक्षणिक राजकीय, सामाजिक, कसलीही असो, जो म्हणजे लाखातही न मिळणारे माणिक, ज्याच्यावर आरोप करण्यास डोळ्यात तेल घालून बसले तरी तिळभर सुद्धा जागा सापडावयाची नाही.असा मनुष्य सरकारच्या डोळ्यांत साहजिकच खुपावयाचा ! मॉडर्न रिव्ह्यू म्हणतो, ‘ Every child must pray for his well-being and that of the cause and the

country, and the sacred word 'a prisoner for country's sake' must shine about his name like a radiant aurora.' सरकारचा अशा लोकांवर दात, परंतु स्वतःची कार्टी मात्र शेफारून ठेवलेली! नेव्हिन्सन म्हणतो 'But in none of the Indian papers have I seen more deliberate attempts to stir up race-hatred and incite to violence than in Anglo-Indian papers which suffer nothing. If the Indian Press is violent Anglo-Indian Press is almost invariably insolent and provocative. ' ब्रिटिश सिंह एका पंजाखाली पंजाबला चिरडून टाकीत असता, तिकडे दुसऱ्या पंजाने बंगालला चिरडीत होता. फाळणीपासूनच बंगालचे नशीब फिरलेले! सरकार नेहमी मुसलमानांचाच पक्षपात करावयाचे. मुसलमानांसच जास्त जागा द्यावयाच्या. १५ मे १९०६ रोजी सरकारने एक सर्क्युलर काढले की, मुसलमानांची ठरीव संख्या भरून निघेपर्यंत हिंदूंस नौकरी द्यावयाची नाही. मुसलमानांचे पुढारी सरकारच्या कच्छपी लागून आत्महित करण्यास मुसलमानांस सांगत. सय्यद अहंमदांचे अभिमानाचे व ताठ्याचे उद्गार वाचा की मुसलमानी कावा कसा आहे तो लक्षात येईल. ते म्हणतात :—' My brother Musalmans, I again remind you that you have ruled nations' and have for centuries help different countries in your grasp. For seven hundred years in India you have had imperial sway. You know what it is to rule. Be not unjust to that nation which is ruling over you. You can appreciate these matters; but they cannot who have never held a country in their hands nor won a victory. ' फाळणी ही मुसलमानांच्या पथ्यावरच पडली. त्यांचे नुकसान काहीच नव्हते. फाळणीनंतर स्वदेशी आली. मुसलमान स्वदेशी स्वीकारीनात. त्यांच्यावर सार्वजनिक बहिष्कार टाकून त्यांस जिन्नस मिळू नये असे करण्यात आले. शेवटी डाक्याचा नबाब सलीमउल्ला याच्या चिथावणीने कोमिल्ला येथे दंगे झाले. त्यात मुसलमानांनी अनन्वित प्रकार केले. सरकारचीही त्यांस फूस होती. जखम पसरत चालली, अंतःकरण सळसळू लागले, आणि आधीच बिथरलेला बंगाल बेताल झाला, बेभान झाला, भावनांनी भारून गेला.

लोकांचा इंग्रज सरकारवरचा विश्वास समूळ नाहीसा झाला होता. तेजस्वी लेखक आपल्या रसरशीत व स्फूर्तिदायक लेखांनी तरुणांची मने वाटेल त्या स्वार्थत्यागास तयार करण्याचे काम करीत होते. स्वदेशीचे व्रत, व शक्तिदेवीची उपासना यांचा उपदेश जोराने होऊ लागला. खरोखर हे स्वदेशीचे व्रत महाराष्ट्रात फार पूर्वीपासून सुरू झाले होते. लॉर्ड रिपनच्या कारकिर्दीत आपल्याकडील **सुप्रसिद्ध देशसेवक विश्वनाथ नारायण मंडलीक** हे एकदा कलकत्त्यास गेले होते. त्या वेळेस ज्या बंगाली गृहस्थाकडे ते उतरले होते, ते गृहस्थ त्यांची जाडीभरडी धोतरे पाहून चकित झाले. त्यांच्या प्रश्नास मंडलिकांनी खालील उत्तर दिले :— 'I must wear these thick clothes, as my country's mills cannot yet produce any finer fabric." '**जोपर्यंत देशांत तलम कापड होणार नाही तोपर्यंत मला असेच जाडेभरडे कापड वापरावे लागणार आणि मी वापरीन.**' परंतु बंगालमध्ये हे स्वदेशी व्रत बहिष्कारापासून सुरू झाले; आणि लोकांची भावनामय मने या नवीन उपदेशाने भारून गेली. संध्या, नवशक्ती, युगांतर यांसारखी वृत्तपत्रे खरोखरच अपूर्व होती. नवशक्तीमध्ये अरविंद घोष पुष्कळ वेळा लिहीत असत. युगांतर हे सर्वांत जास्त लोकप्रिय होते. १९०६ मध्ये वीरेंद्रकुमार घोष आणि जग प्रसिद्ध विवेकानंदाचे एकच एक बंधू भूपेंद्रनाथ दत्त हे या पत्राचे संपादक होते. या वृत्तपत्रातून एकच सूर वाहत होता. सर्वांच्या लेखण्या एकाच प्रकारचे वाङ्मय निर्माण करीत होत्या. 'जशास तसे,' 'टोल्यास टोला' हा उपदेश यांतून केलेला होता. रामदासी बाणा या वृत्तपत्रांनी उचलला होता. त्यांची भाषा अनुपमेय होती. त्यांचे विचार हृदयभेदक व कार्यप्रवर्तक होते; शिथिल झालेल्या अंतःकरणांत अलोट सामर्थ्यांचे पूर वाहविण्याचें त्यांत सामर्थ्य होते. हे स्वदेशीचे व्रत लहानथोरांच्या मनात इतके बिंबले की, काय सांगावे ? एका लहान मुलाने आईस विचारले, '**काय ग आई, हा डांस स्वदेशी आहे का विलायती**' '**स्वदेशी हां बाळ.**' '**हो का ? तर मग मी त्यास मारणार नाही !**' असे बाळ बोलले. ज्यांनी आपल्या प्रतिभावान् विचारांनी वातावरण एकरूप केले त्यांची धन्य होय. त्यांचे लेख कशा प्रकारचे होते याचा नमुना पाहा :

"सध्याच्या काळी रास्तपणा रसातळास जात आहे आणि अन्याय बोकाळत आहे. मूठभर परकीय लोक कोट्यवधी लोकांस त्यांचे सर्वस्व हरण करून नागवीत आहेत. त्यांची नोकरी म्हणजे तर मोठा चरक आहे, आणि या चरकातून असंख्य लोकांची हाडे हरहमेश भरडली जात आहेत. दास्यपंकात खितपत पडलेले हे राष्ट्र ! या राष्ट्राची नैतिक, बौद्धिक, शारीरिक, आर्थिक, स्वावलंबनात्मक, सर्व सद्गुणांची खच्ची करून, या राष्ट्राला कायमचे पंगू करावे किंवा शक्य तर नामशेषही करावे, यासाठी हे मूठभर लोक आटोकाट प्रयत्न करीत आहेत. भारतवासीयांनो ! कच का खाता ? या अन्यायाविरुद्ध चालून जाऊन तुमच्यावर कोसळणाऱ्या आपत्तींना तुम्ही तोंड द्या. मित्रांनो, अंतःकरणात भीतीस यत्किंचित्ही थारा देऊ नका. **परमेश्वराच्या लाडक्या भूमीत दिवसाढवळ्या चाललेला हा अन्याय परमेश्वराला पाहवणार नाही. तो** स्वस्थ बसणार नाही. भगवंताने गीतेत दिलेल्या वचनावर पूर्ण भरवसा ठेवा, आणि त्याला आळवा. त्याच्या शक्तीची आराधना करा म्हणजे **या अन्यायाला पदतळी तुडविण्यासाठी तो तुमच्यामध्ये अवतीर्ण होईल. भिऊ नका. मानवी अंतःकरणात जेव्हा दैवी तेज चमकू लागते, तेव्हा त्यांच्या हातून अशक्य अशा गोष्टीही लीलेने घडतात.**"

या प्रकारचे उतारे भरभरून येऊ लागले. युगांतरासारखे वृत्तपत्र कधी होणार नाही. त्यातील भाषासरणी केवळ तेजोमयी होती. सरकारचा भाषांतरकार म्हणतो, 'I had never before read, in Bengali, language so lofty, so pathetic, so stirring that it was impossible to convey it in an English Garb.' त्याचा खप पन्नास हजारांच्या वर गेला.

पंजाबचे कॉलनायझेशनचे बिल व पाण्यावर वाढलेल्या कराचे बिल लोकांनी कसे मागे घ्यावयास लावले हे बंगाली लोकांनी पाहिले. 'वंदे मातरम्' पत्र म्हणते,

"In Bengal we have agitated for two years; first, with repeated petitions, with countless protest meetings, with in-

numerable wails and entreaties from press and platform, but that could not help us; insult and ridicule were our only gain. Then we tried every lawful means of concrete protest, every kind of passive resistanse within the law to show that we were in earnest. Result :—nil. But in the Punjab they petitioned and protested only for a few weeks and then went in for Europeans, their persons, their property, everything connected with them, Result:—the water-tax postponed : the Colonisation Bill cancelled.' हे पाहून बंगाली तरुणांनी ठरविले की, **काट्याने काटा काढावयास धर्म आड येत नाही.** "The law of the English is established on brute force, and if to liberate ourselves we too must use brute force, it is right that we should do so." इंग्लिशांचा कायदा पाशवी सामर्थ्यावर अधिष्ठित आहे; यापासून स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्यासाठी आपण पाशवी सामर्थ्याचा अवलंब केला तर ते न्याय्य आहे, असे तत्त्व प्रतिपादन करण्यात येऊ लागले. स्वातंत्र्य म्हणजे बडबड नव्हे. **विनंती, अर्ज, सभा यांनी स्वातंत्र्य मिळत नसते. रक्ताचा सडा शिंपडावा लागतो. शिरकमळांची माळा स्वातंत्र्य-देवीला अर्पण करावी लागते. या स्वातंत्र्यासाठी मारता मारता मरावे आणि कीर्तिरूपाने उरावे किंवा कीर्तीचाही मोह न धरिता मरून जावे.** महाराष्ट्रातही हीच लाट उसळली. शत्रूशी, जर तो कपटी असेल तर, कपट करण्यास काही हरकत नाही; ही राजनीती आहे, आणि **राजनीतीमध्ये पापपुण्याचा फारसा प्रश्न नसतो.** त्यातून या गोष्टी सर्व समाजासाठी आहेत. आमच्या प्राचीन ग्रंथांतही, याच उपदेशाचे धडे दिले आहेत. '**व्रजन्ति ते मूढधियः पराभवं । भवन्ति मायाविषु ये न मायिनः' असे भारवी किरातार्जुनीयात सांगतो.** आपणास स्वातंत्र्य पाहिजे असेल, देशास तारावयाचे असेल तर साळसूदपणा दूर सारून दण्डनीतीचाच अवलंब कसेही करून केला पाहिजे. इटली-मध्ये मॅझिनीसारख्या राष्ट्रसेवकांनी गुप्त मंडळ्याच कायदेशीर ठरविल्या-नाहीत काय ? मॅझिनी नीतिज्ञ नव्हता असे कोण म्हणेल ? दास्य-

मग्न राष्ट्राने असे उपाय स्वीकारणे पाप नव्हे हे क्रांतिकारक पक्षाचे राजकीय तत्त्वज्ञान महाराष्ट्रातील तरुणांत पसरू लागले. परिस्थितीची बंधने, शक्याशक्यता वगैरेंचा भावनावश तरुणास विसर पडत चालला. दूरदर्शीपणाचा शांतिवाद त्यांस रुचेना. या विलक्षण खळबळीने निद्रावश देश हालू लागला. अजगराप्रमाणे सुस्त पडलेल्या या देशाला त्याचे लचके तोडीत असतानाही आजपर्यंत शुद्ध नव्हती; ती शुद्ध त्यास आली. लोक डोळे चोळून पाहू लागले; कान टवकारून ऐकू लागले; त्यांस एकच सूर सर्वत्र ऐकू आला; एकच प्रसंग त्यांस दिसला; सरकारची दडपशाही आणि तिचा प्रतिकार करण्यासाठी तयार होणारे तरुण. नेमस्त पक्ष तर या चळवळीने हतबुद्ध झाला. कलकत्त्याची काँग्रेस संपली त्याच वेळेस पुढील साली बहिष्कार वगैरे ठराव हाणून पाडावयाचे असे त्यांनी संगनमत केले होते; त्याचप्रमाणे त्यांनी खटाटोपही चालविला होता. निरनिराळ्या प्रांतिक सभांच्या हकीकती वाचल्या म्हणजे हे सर्व सुसंगतपणे लक्षात येते. सुरतेस प्रांतिक सभा भरली त्या वेळेस टिळकांस तेथे हजर राहता आले नाही, आणि मेथांनी बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण हे दोन्ही ठराव मोठ्या शिताफीने बगळले. वऱ्हाडच्या प्रांतिक सभेत ‘ वन्दे मातरम् ’ सारख्या पदावर रणे माजली. परंतु खापर्डे हे हजर असल्यामुळे नेमस्तांची डाळ फारशी शिजली नाही. अलाहाबादच्या प्रांतिक सभेत मदन मोहन मालवीयांनी दोनशे प्रतिनिधींस, सभेस अडचण येईल म्हणून परवानगी दिली नाही ! संयुक्तप्रांताच्या प्रकृतीस बहिष्कार मानवणार नाही अशी त्यांनी आधीपासूनच हाकाटी चालविली होती. कलकत्त्यास मोठ्या शर्थीने टिळकांनी जे ठराव पास करून घेतले ते एवंप्रकारे येत्या राष्ट्रीय सभेत हाणून पाडण्यासाठी हा सर्व खटाटोप होता, असे राष्ट्रीय पक्षाने जाहीर केले.

या वर्षीची राष्ट्रीय सभा खरे पाहिले म्हणजे नागपुरास भरावयाची. परंतु नागपुरास स्वागत कमिटीच्या बैठकीत जे अपरिहार्य व अश्लाघ्य प्रकार झाले ते पाहून येथे राष्ट्रीय सभा सुरक्षित भरू शकणार नाही असे पुष्कळांस वाटले. मुंबईस एक पुढाऱ्यांची सभा भरली. टिळकही या सभेस हजर होते. आणि राष्ट्रीय सभा सुरतेस भरावयाची असे जाहीर झाले.

या मुंबईच्या कॉंग्रेस कमिटीच्या बैठकीत टिळक, खापर्डे यांनी राष्ट्रीय सभा सुरतेस नेण्याच्या योजनेस विरोध केला. नागपूरची अब्रू राखण्यासाठी आम्ही कोणत्याही अटीवर तडजोड करण्यास तयार आहो असे नागपूरच्या राष्ट्रीय पक्षाने कळविले. कारण राष्ट्रीय पक्षास न कळविता नागपूरच्या मवाळ पक्षाने स्वतंत्रपणे राष्ट्रीय सभेच्या कमिटीस तार केली होती की, ' येथे राष्ट्रीय सभा भरविणे अशक्य आहे, ' परंतु राष्ट्रीय पक्षाचे काही एक चालले नाही व कमिटीत मताधिक्य नेमस्तांचे असल्यामुळे सुरत हीच जागा ठरली. नागपूरच्या स्वागत कमिटीने टिळकांस अध्यक्ष नेमले असते; परंतु आता राशबिहारी घोष हे नियोजित अध्यक्ष असे जाहीर झाले.

परंतु इतक्यात इकडे बंगालमध्ये दडपशाहीस ऊत आला. मुसल-मानांनी त्यांच्या स्वभावानुसार वेडे बनून अनन्वित दंगे केले. डाक्याचा नबाब सलिमउल्ला म्हणजे एक अपूर्व चीज होती. त्याने मुसलमानांस चिथावून दिले. कोमिल्ला येथे दंगे झाले. जे होऊ नयेत ते प्रकार घडले. बंगाली लोकांची भावनापूर्ण मने बेहोष झाली. संताप साठवेना. तो उतू जाऊ लागला. युगान्तराच्या संपादकांस शिक्षा झाली. संध्या पत्राचा संपादक आपली बाजूही न्यायसभेत पुढे मांडण्यास कबूल नव्हता. " He did not think that in carrying on the God-appointed mission of स्वराज्य he was in any way responsible to the alien rulers. " **" ईश्वराने नेमून दिलेले स्वराज्यमंत्रप्रसाराचे पवित्र कार्य मी करीत आहे. परकीय सत्ताधाऱ्यांची माझ्यावर काडीइतकीही सत्ता नाही. "** बाबू अरविंद घोष यांसही कैद करण्यात आले. अशा प्रकारे भराभर नानाप्रकारच्या उद्वेगकारक परंतु स्फूर्तिदायक गोष्टी दररोज कानी येऊ लागल्या. शिक्षा देण्यात सुद्धा सारासार विचारास थाराच नसे. ज्याप्रमाणे इंग्लंडांत **काकडी चोरण्याबद्दल फासावर लटकण्याची पाळी** येई तशाच मासल्याची तऱ्हा येथे झाली. एके ठिकाणी चार मुलांनी, वाण्याची चवदा आणे किंमतीची विलायती साखर नासली म्हणून तीन आणि चार महि-न्यांच्या शिक्षा त्यांस दिल्या. परंतु ज्यांस अशा शिक्षा होतात ते लोकांस ललामभूत होतात. लोक त्यांस मिरवितात आणि सरकारचीच मानखंडना होते. परंतु निर्लज्ज सरकारास त्याचे काय होय ? सरकारने सभाबंदीचा

कायदा १ नोव्हेंबर १९०७ रोजी पास केला. गोखले यांनी या कायद्यास कसून विरोध केला; राशबिहारींनीही विरोध केला, परंतु सरकार थोडीच भीक घालणार? कितीही विरोध करा, सरकारला हवे ते करण्यास सामर्थ्य आहे.

लाला लजपतराय व अजितसिंग यांस सहा महिन्यांनी नोव्हेंबरच्या ११ तारखेस मुक्त करण्यात आले. लाला लजपतराय व गोखले हे मित्र होते. इंग्लंडांत १९०५ मध्ये जेव्हा गोखले मुंबई प्रांतातर्फे चळवळ करण्यास गेले होते त्या वेळी पंजाबतर्फे लजपतराय गेले होते. त्या वेळेस एकमेकांची एकमेकांस मदत झाली होती. लालाजींस नाहक होणारा जाच नाहीसा व्हावा म्हणून गोखल्यांनी 'टाइम्स' मध्ये एक पत्र प्रसिद्ध केले होते. परंतु त्याचा तादृश उपयोग झाला नाही.

लालाजींची सुटका झाल्यावर राष्ट्रीय सभेस निराळाच रंग चढू लागला. सुरतचे राष्ट्रीय पक्षाचे लोक म्हणू लागले, 'आम्हांस लालाजी अध्यक्ष पाहिजेत. **देशसेवेसाठी त्यांस अंदमान पाहावे लागले तेव्हा आपण त्यांस राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षत्वाचा मान देऊन त्यांचा गौरव करणे व कृतज्ञता व्यक्त करणे हे आपले कर्तव्य होय**' लालाजींस मानमरातबाची मातब्बरी नव्हती. परंतु निरपेक्ष सेवा करणारा जो असतो त्याच्यासाठी वैभव चालून येते. राष्ट्रीय पक्षाची ही मागणी नेमस्त मान्य करीनात. गोखल्यांनी समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. शेवटी 'लालाजी अध्यक्ष होण्यास तयार असतील तर तुम्ही खुशाल त्यांस अध्यक्ष करा' असे त्यांनी सांगितले. राष्ट्रीय पक्ष पेचात सापडला. जर मवाळ पक्षाचे आपणास पाठबळ नसेल तर लालाजी अध्यक्ष होण्यास कसे तयार होतील? लालाजीस असे अपमानास्पद स्थान स्वीकारा असे सांगण्यास राष्ट्रीय पक्ष धजला नाही.

सर्व प्रयत्न हरले तेव्हा राशबिहारी हे अध्यक्ष आम्हांस पसंत नाहीत असे राष्ट्रीय पक्ष म्हणू लागला. याला एक कारणही त्यास सापडले. नियोजित अध्यक्ष राशबिहारी घोष यांनी राष्ट्रीय पक्षासंबंधी अनुदार उद्गार कौन्सिलमध्ये उच्चारले होते. राष्ट्रीय पक्ष झाला तरी तो देशासाठीच

तळमळत होता. चुकत असला तरी स्वार्थासाठी झुरत नव्हता; तर मातृभूच्या उद्धारासाठीच. आपसांत कितीही भांडणे झाली तरी आपणां दोघांसही चिरण्यास जो शत्रूप्रमाणे टपला आहे, त्याच्या जवळ एकमेकांची नालस्ती करणे म्हणजे फार निंद्य गोष्ट होय असे आम्हांस वाटते. या बाबतीत ना. गोखले हे जास्त थोर मनाचे होते. ते नेव्हिन्सन साहेबांजवळ टिळकपक्षाविषयी बोलताना म्हणाले, 'But we are not likely to denounce a section of our own people in the face of the bureaucracy. For, after all they have in the view the same great object as ourselves'. राष्ट्रीय पक्षाने लालाजी अध्यक्ष व्हावे म्हणून सुचाविले. पण त्याचे म्हणणे गोखल्यांनी सयुक्तिकपणे खोडून काढले. सर्व स्वागतकमिटीने राशबिहारी यांस अध्यक्ष निवडले असता आता लालाजींस अध्यक्ष करण्याने पुष्कळ लोकांची मने दुखवतील. लालाजींस आज जी सर्व राष्ट्राची सहानुभूती पाहिजे ती नाहीशी होईल. लालाजींस विनापराध हद्दपार केले, याचा सरकारास जाब विचारताना सर्वांनी लालाजींस पाठिंबा दिला पाहिजे असे गोखल्यांचे म्हणणे होते. लालाजींस अध्यक्ष करण्यास गोखले भीत होते, असा त्यांच्यावर पुष्कळांनी आरोप केला आहे. परंतु गोखले इतके भ्याड खास नव्हते. ते लालाजींचे स्नेही होते, व त्यांच्या सुटकेसाठी त्यांनी प्रयत्नही केले होते. लालाजींस गोखले जर सरकारच्या मोहबतीखातर भिते तर त्यांच्या सोडवणुकीसाठी त्यांनी टाइम्समध्ये पत्र का प्रसिद्ध केले असते? परंतु एका चरित्रकाराने म्हटल्याप्रमाणे 'People always are misunderstood. They are blameless, but their conduct is misrepresented. They are conscious of having felt precisely the reverse of what is attributed to them: and they wonder that they are not known better.' याप्रमाणे गोखल्यांच्या सद्धेतूचाही विपर्यास करण्यात आला.

परंतु शेवटी लालाजींनी स्वतःच मनाच्या थोरपणाने 'मी अध्यक्ष होत नाही,' असे जाहीर केले. या करण्यामुळे तर राष्ट्रीय पक्ष फारच चिरडीस गेला. कलकत्त्याचे पास झालेले स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण, बहिष्कार, स्वराज्य, वगैरे ठराव येथे नापास होणार, ते ठराव पत्रिकेत घातलेलेही

नाहीत, अशी त्याने खोटीच आवई उठविली. खरे पाहिले तर कलकत्त्यास 'स्वराज्य' असा ठराव पास झालाच नव्हता. तो शब्द फक्त दादाभाईंच्या स्फूर्तिप्रद भाषणात बाहेर आला. बहिष्कार हा सर्वराष्ट्रीय करून सर्व सरकारी संस्थांवर घालावयाचा असे जरी राष्ट्रीय पक्षास वाटत होते तरी वस्तुतः ते तसे नव्हते. कारण कलकत्त्यास गोखल्यांनी उठून हे म्हणणे मोडून काढले होते. जे ठराव कलकत्त्यास ज्या स्वरूपात पास झाले तेच ठराव येथेही ठराव-पत्रिकेत घातले होते. कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेचा रिपोर्ट अद्याप प्रसिद्ध झाला नसल्यामुळे गोखल्यांस 'इंडिया' पत्रातून त्या वेळचे ठराव आपल्या ठरावपत्रिकेत घालावे लागले. असे करताना स्वदेशीच्या ठरावात, दादाभाईंनी स्वतः टिळकांच्या सांगीवरून घातलेले 'घस सोसूनही स्वदेशी वापरणे' हे शब्द गाळले गेले. परंतु इंडिया पत्रातील प्रसिद्ध झालेल्या ठरावातसुद्धा हे शब्द नव्हते. शिवाय ही ठरावपत्रिका म्हणजे काही वज्रलेप नव्हे की, त्यातील ठराव व त्यांची भाषा यांच्यावर रणे माजवावी. आजपर्यंत असे अनेकदा झाले असेल की, पत्रिकेत घातलेले ठराव विषयनियामक कमिटीत साफ बदलले; केव्हा नवीन शब्द घातले; केव्हा काही ठराव गाळले. तेव्हा विषयनियामक कमिटीच्या आधीच गोखल्यांवर आग पाखडणे न्याय्य नव्हते. या ठरावपत्रिकाही वेळेवर छापून मिळाल्या नाहीत त्यास गोखले काय करणार? जेव्हा छापून झाल्या तेव्हा ताबडतोब त्यानी एक प्रत टिळकांस दिली, एक लालाजींस दिली. यानंतर टिळकपक्षाचे असे म्हणणे पडले की जर कलकत्त्याचे ठराव त्याच स्वरूपात येथे पास होणार असतील तर अध्यक्षांच्या सूचनेस आम्ही विरोध करणार नाही; नाही तर आम्हांस अध्यक्ष पसंत नाहीत. परंतु सोळाशे सभासदांची हमी गोखले कशी बरे घेणार? असे विचारणे म्हणजे राष्ट्रीय सभा मोडण्यासारखेच होते आणि अखेर तसेच झाले. गोखल्यांनी पुष्कळ सभासदांस बोलावून सांगितले की ठराव मागे घेण्यात आलेले नाहीत, विषयनियामक कमिटी काय ठरवील ते खरे. शेवटी २७ वी तारीख उजाडली. अडीच वाजता सभेच्या कामास सुरुवात झाली. स्वागताध्यक्षाचे भाषण झाल्यावर, अंबालाल सक्करलाल यांनी अध्यक्षांची सूचना पुढे मांडली. डॉ. घोष यांचे नाव उच्चारताच 'नको

नको, ' असे उद्गार उठू लागले. परंतु त्यांनी या हलकल्लोळातून आपले भाषण कसेबसे संपविले. नंतर सुरेंद्रनाथ दुजोरा देण्यासाठी उठले. त्यांचे पहिलेच वाक्य उच्चारले जाते न जाते तोच, त्यांस खाली बसावयास लावण्यासाठी काही लोकांनी एकच गोंगाट सुरू केला, स्वागताध्यक्षाने पुनः पुनः शांत राहण्यासाठी लोकांस विनंती केली; परंतु काही उपयोग झाला नाही. सुरेंद्रनाथांनी विचारले, ' Have things come to such a pass ? ' त्यावर ' होय, होय, ' अशी उत्तरे मिळाली. शेवटी अध्यक्षांनी ' जर तुम्ही शांत राहणार नाही, तर मी सभा बरखास्त करीन ' असे सांगितले. सुरेंद्रनाथ बोलू लागले. परंतु त्यांचा खडा स्वरही लोकांच्या गर्जनेत विलीन झाला. अध्यक्षांनी सभा बरखास्त केली.

रात्री टिळक हे गोखले वगैरे मंडळींस भेटण्यासाठी जाणार होते, परंतु गोखल्यांनीच त्यांना झिडकारिले असे खोटेच प्रसृत करण्यात आले. गोखल्यांच्या जवळ टिळक यासंबंधी बोलले नाहीत; त्यांनी तशी इच्छा दर्शविली नाही; किंवा चिठी वगैरेही काही पाठविली नाही.

दुसऱ्या दिवशी एक वाजता पुनः सभेस आरंभ झाला. टिळकांनी, स्वागताध्यक्ष माळवी यांच्याजवळ एक चिठी दिली. परंतु ही चिठी सर्व कॉँग्रेस बंद ठेवा अशा अर्थाची आहे असे समजून माळवी यांनी बेकायदा ठरविली. सुरेंद्रनाथांचे भाषण झाले. पंडित मोतीलाल नेहरू यांचेही दुजोरा देण्यासाठी लहानसे भाषण झाले. नंतर मते मागण्यासाठी हा ठराव माळवींनी पुढे मांडला. ' नकारघंटा ' वाजू लागली; परंतु ही घंटा ' होय, होय 'च्या नगाऱ्यात फिकी पडली. अध्यक्ष निवडले गेले असे माळवींनी जाहीर केले. डॉ० घोष अध्यक्षस्थानी बसून आपले भाषण आरंभताहेत तोच टिळक व्यासपीठावर चमकू लागले. अध्यक्षांच्या निवडणुकीबद्दल आपण काही सूचना आणणार आहो, व आपण तशी आगाऊ लेखी खबर दिली होती, तेव्हा आपणास बोलू द्या असे ते म्हणाले, स्वागताध्यक्ष म्हणाले, तुमची चिठी अध्यक्षांच्या निवडणुकीबद्दल नसून, सर्व कॉँग्रेस थांबवावी अशी आहे. अध्यक्ष आता निवडले गेले आहेत, त्यांच्याविषयी आपणांस काहीही बोलता येणार नाही. टिळक

म्हणाले, 'माझा हक्क आहे. मी अध्यक्षांच्या निवडणुकीसाठीही चिठीत लेहिले आहे. अध्यक्षही 'आपण कायदेशीर वागत नाही; जाग्यावर जा.' असे टिळकांस सांगू लागले. परंतु लो. टिळक काय लेचेपेचे होते? धीराची मूर्ती, निश्चयाचे मेरूच ते. ते म्हणाले, 'माझे म्हणणे मी प्रतिनिधींसमोर मांडल्याखेरीज राहणार नाही.' झाले; एकच धुमाकूळ माजला. पुष्कळ लोक काठ्या, लाठ्या सरसावून हाणमार करू लागले. **टिळकांच्यावरही एक मनुष्य हल्ला करीत होता; परंतु गोखले मध्ये पडले.** खुर्च्या फेकल्या जाऊ लागल्या. इतक्यात एक लाल जोडा फेरोजशहांस चाटून, सुरेंद्रनाथांस लागला. गोखले हा सर्व प्रकार पाहून रागाने नुसते थरथर कापत होते. मेथा, गोखले वगैरे मंडळी मागील दरवाज्याने निघून गेली. टिळकांस त्यांच्या पक्षाच्या लोकांनी सुरक्षित नेले, शेवटी पोलिसांनी येऊन दंगल मोडली.

या तारखेस सायंकाळी पुष्कळसे पुढारी जमले. तेथे राष्ट्रीय पक्षाच्या पुष्कळ लोकांस हजर राहू दिले नाही; सुमारे ९०० प्रतिनिधींनी एक कमिटी नेमली आणि तिने सर्व घटना, नियम वगैरे करून, एप्रिलमध्ये सभा बोलवावी, व सर्वांनीं ते पास करावे असे ठरविले. अशा प्रकारे तेविसावी राष्ट्रीय सभा समाप्त झाली.

या एकंदर प्रकारामुळे मनास फार वाईट वाटते. टिळकांचा काही राष्ट्रीय सभा उधळून लावावी असा उद्देश असेलसे दिसत नाहीं. 'मी सभा मोडली' असे टिळकांनी लिहून दिले तर आपण ऐक्याला—समेटाला तयार आहो, असे राष्ट्रीय पक्षास कळविण्यात आले, तेव्हा टिळकांनी स्वतःच्या शिरावर राष्ट्रकार्याकारिता ही जोखम घेतली, आणि सुरेंद्रनाथ अश्विनीबाबू वगैरेंजवळ तसा लेखी कबुलीजवाब दिला. परंतु त्यांची कोणी गाठही घेतली नाही असे मोतीलाल बाबू 'Step in the steamer' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत सांगतात. नाना मतांच्या गलबल्यात सत्य शोधून काढणे फार कठिण आहे, परंतु टिळकांसारखा माणूस केवळ सभा उधळून लावण्यासाठी आलेला नसावा असे वाटते. बंगालमधून 'Blow up' अशी आलेली तार वाचून पुष्कळजण तारे तोडतात; परंतु यावरून काही टिळकां-

वर आरोप शाबीत होत नाही. बंगाल्यांमधील नवीन रक्ताचे—नवीन दमाचे लोक टिळकांच्याही पुढे गेले होते. टिळक स्पष्टपणे सांगत की, आपणांस साम्राज्यात राहावयाचे आहे; येथे प्रयत्न करून इंग्लंडमध्येही शिष्टमंडळे पाठविली पाहिजेत; यश येण्यास केव्हाही वेळ लागणारच. नवीन क्रांतिकारकांचा विचार सभा उधळून लावण्याचा असेल. आणि टिळक त्यांस पूज्य वाटत असल्यामुळे त्यांचे विचार टिळकांवरही पुष्कळ लोक लादू पाहतात, परंतु ' शिष्यापराधे गुरोर्दंडः ' असा हा प्रकार होय.

येवढे मात्र खरे की, टिळकांस काँग्रेसची गोगलगायी पद्धत पसंत नव्हती. चार दिवस जमून नुसते ठराव पास करून जावे आणि मग बॅरिस्टऱ्या, वकिल्या कराव्या याचा त्यांना तिटकारा येई. काँग्रेसच्या कामाचे लोण सर्व लोकांत जर पसरविले असेल तर ते टिळकांसारख्यांनीच. त्यांनीच व्याख्यानांनी व लेखांनी देशात काय चालले आहे याची लोकांस जाणीव करून दिली. अशा मनुष्याला काँग्रेसभंजक कसे म्हणावयाचे ? काँग्रेसला लोक येतात, आरती करितात आणि घरोघर जातात याविषयी काँग्रेसचे जनक ह्यूमसाहेब काय म्हणतात ते पहा :—" You meet in congress, you glow with a momentary enthusiasm. You speak much and eloquently. But the congress closes and every man of you goes off straight way on his private business. Years ago, I called on you to be up and doing ; years ago, I warned you that ' Nations ' by themselves are made; and have you heeded these counsels ? You have, indeed, ever eagerly clamoured for and vainly clutched at the crown, but how many of you will touch the cross, even with your finger tips ? " ह्यूमसाहेबांच्या या सणसणीत बोलांस मेथांनी मुंबईस उत्तरे देण्याचा प्रयत्न केला होता. परंतु अशी वक्तृत्वपूर्ण व नटवेगिरीची उत्तरे देऊन थोडेच भागणार आहे ? वस्तुस्थिती जगास दिसत होती. तेव्हा राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष देशासाठी तनमन झिजवणारे लालाजींसारखे होण्याऐवजी सर्वस्वावर निखारा ठेवण्यास तयार असलेल्या आपल्या राष्ट्रीय बंधूंची, भर कौन्सिलात नालस्ती करणारा व्हावा हे पाहून

टिळकांच्या पायाची आग मस्तकास का न जावी ? राष्ट्रीय सभेचा अध्यक्ष जर राष्ट्रीय पक्षास निंदितो तर सरकारास या सर्व पक्षाच्या पुढाऱ्यांस एका दावणीस बांधून अंदमानास पाठवून देण्यास काय हरकत ?

अंबिकाचरण मुजुमदार आपल्या पुस्तकात पोक्तपणे लिहितात :— " It is hardly–conceivable that a man of Bal Gangadhar Tilak's position and patrotism could have knowingly and willingly associated himself with any plan of action calculated to wreck the congress. " आम्हांस हे म्हणणे विचाराचे वाटते.

पुढे लवकरच अलाहाबाद येथे एप्रिल महिन्याच्या १८–१९ तारखेस सभा भरून, नवी घटना, ध्येय वगैरे ठरविण्यात आले. मॉडर्न रिव्ह्यूने या प्रकारच्या सभेस एकपक्षीय म्हटले आहे व ते खरे आहे. कारण ही काही अखिल राष्ट्राची सभा नव्हती. सुब्रह्मण्यम् अय्यर यांचे या वेळेस मॉडर्न रिव्ह्यूत पुनः प्रसिद्ध झालेले पत्र वाचण्यासारखे आहे. अशा रीतीने राष्ट्रीय पक्ष वगळला गेला. टिळक पुनः राष्ट्रीय पक्षाची जमवाजमव करते, पण त्यांस हे श्रम होऊ नयेत म्हणून सरकारने त्यांस सहा वर्षांची शिक्षा दिली ! राजकारणाच्या दंगलीत रंगलेला महात्मा तत्त्वज्ञानाच्या गहन गाठी सोडविण्यासाठी मंडालेच्या तुरुंगात निघून गेला !! राष्ट्रीय पक्ष पोरका झाला !!!

# उत्तरार्ध

## सुरत–कॉंग्रेसनंतर

पूर्वार्धामध्ये गोखल्यांचे चरित्र सुरतच्या कॉंग्रेसपर्यंत आले, तो प्रसंग अखिल हिंदुस्तानच्या राजकारणात अत्यंत महत्त्वाचा होता. राष्ट्रीय व प्रागतिक या पक्षातील भांडणे विकोपास जाऊन जोडेफेकीपर्यंत पाळी आली. अशा रीतीने कॉंग्रेस उधळून लावण्यात आल्यानंतर कॉंग्रेसच्या अधिकाऱ्यांनी–हे प्रागतिक पक्षाचे होते–कॉंग्रेसच्या भोवती क्रीडचे कुंपण घालून राष्ट्रीय पक्षाला मज्जाव केला. त्यामुळे राष्ट्रीय सभा सर्वस्वी प्रागतिकांच्या हाती गेली. दोन्ही पक्षांच्या दृष्टीने हा प्रसंग फार महत्त्वाचा होता. एका पक्षाचे पुढारी लोकमान्य टिळक व दुसऱ्या पक्षातील पुढारी नामदार गोखले या दोघांच्याही चरित्राला येथून वेगळे वळण लागले. एकाच्या कर्तबगारीला, देशसेवेला, राजकीय चरित्राला सहा वर्षे तुरुंगात गाडून टाकल्यामुळे आधीच विस्तार पावत असलेल्या दुसऱ्याच्या राजकीय कर्तबगारीला पूर्ण अवसर मिळून तिच्या विस्ताराला मर्यादाच राहिली नाही.

सुरतच्या भाऊबंदकीनंतरच्या उभ्या वर्षात गोखल्यांना एका क्षणाचीही फुरसत मिळाली नाही. मेथांच्या बाबतीत मुंबई कॉर्पोरेशनमध्ये झालेल्या प्रसंगी अध्यक्ष झाल्यावर ते काही दिवस विश्रांती घेण्यासाठी महाबळेश्वरी जाणार होते. परंतु मैमनसिंगकडे गडबड उडाल्यामुळे त्यांस तिकडे जाणे भाग पडले. त्यानंतर कॉंग्रेससाठी त्यांना फार श्रम करावे लागले.

मध्यंतरी सिमल्यास जाऊन त्यांस सभाबंदीच्या कायद्यास विरोध करावा लागला. १९०७ साल तर संपले, १९०८ साल उजाडले. मार्च महि-

ऱ्यात ते कौन्सिलच्या कामाकरिता निघून गेले. अद्यापपर्यंत मोठे लष्कर ठेवण्यास रशियाची भीती हे कारण दाखविण्यात येत असे. ती तर आता निघून गेली होती. परंतु देशात असंतोष माजला आहे, लोक नाना प्रकारच्या गोष्टी सांगताहेत, अशा वेळी सैन्य कमी करणे वेडेपणा आहे, असे आता कांगावखोर व निमित्तावरच्च टेकलेल्या सरकारचे म्हणणे पडले. यास गोखल्यांनी विरोध केला. शिक्षणाच्या बाबतीत सरकार अस्वलासारखे कसे सुस्त पडले आहे, सरकारला अद्याप जाणीव का होत नाही याचा खुलासा त्यांनी विचारला. संस्थानिकांनी सुद्धा आपापल्या चिमुकल्या संस्थानांत शिक्षण सक्तीचे केले आणि सरकारला लाजविले. परंतु सरकारास लाज असेल तर ना लाज वाटणार! इंग्लंडमधून येथे येताना सर्व लाज 'समुद्रास्तृप्यन्तु' करून मग हे देव मुंबापुरीच्या किनाऱ्यावर उतरतात. त्याचप्रमाणे धंदेशिक्षण, कलाशिक्षण देण्यात तर आमचे सरकार गोगलगाईच्या गतीने सुद्धा चालत नाही. ते स्थिर राहून पैसा कोठे आहे असे विचारते. गोखले म्हणतात, "My lord, I repeat, the money is there or can be found without difficulty. Only the will has to be there and then we shall not be found merely discussing the difficulties of the problem." नंतर त्यांनी शेतकऱ्यांच्या वाढत्या कर्जबाजारीपणास आळा घालण्याचे उपाय सुचविण्यास व ते ताबडतोब अंमलात आणण्यास सांगितले. सरतेशेवटी देशातील वाढत्या संतापाकडे ते वळले. सर्व सुशिक्षित लोक हळूहळू निराश होत जाऊन ब्रिटिश राज्यातील व्यवस्था त्यांस मरणप्राय वाटेल. 'But, sooner or later, mere order is bound to appear irksome to those who zealously cultivate the belief that there is no chance of better days for their country as long as existing arrangements continue.' मोर्ले साहेबांस न साजेशा त्यांच्या अंदाजपत्रकावरील भाषणाचा निराशेने गोखल्यांनी उल्लेख केला. इंग्लिशांवरील भक्ती, श्रद्धा, निष्ठा यांस मूठमाती देण्यात येत आहे; असे असता ज्या काही सुधारणा द्यावयाच्या असतील त्या त्वरित द्या. त्या उदार भावाने द्या. लोकास असे वाटू द्या की, "The people must be enabled to feel that *their* interests are, if not the only consideration, at any rate the main considera-

tion that weighs with the Government and this can only be brought about by a radical change in the spirit of administration." यानंतर शेवटची सूचना त्यांनी दिली ती अशी –"My lord, let not the words 'too late' be written on every one of the reforms. For while the Government stands considering-hesitating, receding, debating within itself 'to grant or not to grant, that is the question'—opportunities rush past it which can never be recalled. And the moving finger writes and having writ, moves on !"

याच वर्षी प्रेस ॲक्ट पास झाला. सर सत्येंद्र प्रसन्न सिंह यांनी हा कायदा पुढे मांडला; कारण ते 'लॉ मेंबर' होते. या ॲक्टला गोपाळरावांनी संमती दिली याचे पुष्कळांस आश्चर्य वाटले व वाटेल. परंतु सरकारने पुढे मांडलेला भरभक्कम पुरावा व सर्व वृत्तपत्रांतील ज्वलज्जहाल लेख वाचून गोखल्यांवर नैतिक जबाबदारी पडली आणि सरकारविरुद्ध असे लिहिणे केव्हाही अन्यायाचे आहे असे त्यांस वाटले. कोणत्या तोंडाने विरोध करू असे त्यांस झाले. गोपाळरावांचे हे करणे मेथांना आवडले नाही. जेव्हा गोपाळरावांनी आपण कशा परिस्थितीत संमती दिली हे सांगितले तेव्हा मेथा म्हणाले, "तुम्ही कायद्याला रुकार किंवा नकार काहीच द्यावयाचे नव्हते. तुम्ही स्वस्थ राहावयाचे. सरकारला तुमची फूस आहे असे जनतेस वाटते. आणि आपल्या कृत्याचे समर्थन सरकार करिते. आपल्या संमतीचा फायदा सरकार घेते, परंतु आपल्या म्हणण्यास संमती देऊन सरकार कधी भलेपणा घेते काय ? आपण जर एकादे गाऱ्हाणे मांडले तर त्याचा कसा बोजवारा उडतो ते आपण पाहतोच. तेव्हा सरकारास आपले म्हणणे मनातून जरी न्याय्य वाटत असले तरी ते आपणांस निराश करते, त्याप्रमाणे आपणही सरकारास वागविले पाहिजे." गोखल्यांचे काम नैतिक रीत्या समर्थनीय असेल, परंतु राजकारणदृष्ट्या चुकीचे ठरले. या मख्या, खाचाखोचा, टिळक, मेथा हेच जाणत. गोखले हे साधेसीधे. या साधेपणाचेच हे एक मासलेवाईक उदाहरण आहे.

मवाळांच्या राष्ट्रीय सभेचे खरे म्हटले म्हणजे आता अर्धराष्ट्रीय सभेचे—

काम झाल्यानंतर गोपाळरावांस पुनः इंग्लंडमध्ये जावे लागले. खुद्द लॉर्ड मिंटो यांनी गोपाळरावांस इंग्लंडमध्ये जाऊन मोर्ले साहेबांस सहाय्य करा असे सुचविले. हिंदुस्तानातील असंतोषामुळे व अत्याचारांमुळे सुधारणा कदाचित् मिळणार नाहीत या विचारानें तो प्रसंग टाळण्यासाठी गोखले विलायतेस गेले. मोर्ले साहेबांपुढे हिंदुस्तानची बाजू शक्य तितक्या जोराने त्यांनी पुढे मांडली. हिंदुस्तानातील लोकांचा ब्रिटिशांवरचा विश्वास उडत चालला आहे. अत्याचारांस ऊत येईल; तर वेळीच सावध राहून त्या लोकांचा उडणारा विश्वास पुनः संपादन करा. एकदा मन तुटले की ब्रह्मदेवासही सांधता येणे अशक्य आहे. एकमेकांची मने पुनः कधीही संयुक्त होणार नाहीत अशा तऱ्हेने तोडू नका. आणि मने तोडावयाची नसतील तर हिंदुस्तानास अधिक हक्क राज्यकारभारात देणे हेच रास्त व प्रसंगोचित आहे.

गोखले इंग्लंडमध्ये असता इकडे टिळकांस सहा वर्षे शिक्षा झाली. उतारवयात झालेली ही भयंकर शिक्षा पाहून नेमस्त लोकांनीही खेद व उद्विग्नता हिंदुस्तानात प्रगट केली. इंग्लंडमध्ये या शिक्षेबद्दल निषेधप्रदर्शक सभा भरविण्यात यावयाची होती. गोखले त्या सभेस हजर राहिले नाहीत, येवढेच नव्हे तर चकार शब्दही कोठे बोलले नाहीत. आपण टिळकांच्या शिक्षेविरुद्ध जर काही बोललो तर आपल्या शिष्टाईस बाध येईल असे त्यांस वाटले असावे. टिळकपक्षाशी आपला संबंध नाही असे दाखवून दिले पाहिजे याच हेतूने गोखल्यांनी या वेळी मौनव्रत स्वीकारले असे दिसते. काही असो; सहानुभूतीचा एक शब्दही गोखल्यांकडून टिळकांस मिळाला नाही हे खरे. टिळकांविषयी केवढी ही अनुदारता? देशासाठी आपण सुधारणा मागत आहो त्यांस, आपणाकडून टिळकांविषयी उदारता दर्शित झाली तर कदाचित खो बसेल, हा हेतू असो किंवा व्यक्तिगतच काही वाटत असेल कोणास माहीत! पण गोखल्यांनी आपल्या दुसऱ्या देशसेवकाबद्दल उदारता दर्शविण्याची संधी गमावली असे म्हटल्याविना राहावत नाही. मोर्ले साहेबांस गोपाळरावांनी ज्या सूचना केल्या त्या खालीलप्रमाणे होत्या. कौन्सिलात लोकनियुक्त प्रतिनिधींची वाढ करावी, गव्हर्नर जनरलच्या कार्यकारी मंडळात एतद्देशीय प्रतिनिधी असावे, स्टेटसेक्रेटरीच्या कौन्सिलमध्येही एक एतद्देशीय प्रतिनिधी असावा. या गोष्टी फार अगत्याच्या

होत्या. या दोनही ठिकाणी एतद्देशीय निवडण्यात येऊ लागले याचे बरेचसे श्रेय गोखल्यांस आहे. कारण मिंटो साहेब हे गव्हर्नर जनरलच्या कार्यकारी कौन्सिलात एतद्देशीय नेमण्यास फारसे अनुकूल नव्हते. मोर्ले, मिंटो साहेबांस लिहितात, जर आपण तेथील कार्यकारी मंडळात एतद्देशीय प्रतिनिधी घेण्यास तयार नसाल तर मी स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलात नेमणारच. गोपाळरावांस स्वतःस इंग्लंडमधील ही आपली शेवटली खेप असे वाटत होते. पुनः आता इंग्लंडमध्ये येण्याची मला जरूरी पडणार नाही असे ते बोलून दाखवीत होते. आता आपले शेष आयुष्य आपल्या देशातच लोकांच्या उन्नत्यर्थ अहर्निश झटण्यात दवडावयाचे असा त्यांनी मनाशी निश्चय पक्का केला. ज्या वेळेस ते मोर्ले साहेबांस भेटण्यासाठी म्हणून डिसेंबरच्या प्रारंभी गेले तेव्हा हा आपला मनोदय त्यांनी मोर्ले साहेबांस कळविला. मोर्ले साहेबांनी त्यांच्यापुढे सर्व सुधारणांचा पाढा वाचला नाही. परंतु त्या कोणत्या स्वरूपाच्या असतील याचा तर्क बांधणे कठीण नव्हते. मोर्ले लिहितात :—

"He thinks he will never come to England again; no more work to be done for India here, must work in his own country. This is the moment of crisis; if nothing comes of *our* attempt then the Extremists will have their way; confusion, danger and ruin will follow. On the whole his tone both attracted and impressed me." मोर्ले साहेबांनी मिंटोस एतद्देशीयांस विशेष जागा, बड्या पगाराच्या जागा देण्यास सुरुवात करा असे सुचविले. राज्यकारभारात हक्क असण्यापेक्षा पगारी जागांकडेच लोकांचे लक्ष जास्त असते. तेव्हा या प्रयोगाने लोकांस आशाळभूत बनवा म्हणजे झाले. परंतु मोर्ले साहेबांचा हा सल्ला इकडे थोडाच रुचणार आहे ! गोखल्यांच्या या वेळच्या इंग्लंडमधील कामगिरीचा सर्वांनी प्रशंसापर उल्लेख केला आहे. लॉर्ड रे साहेब, हार्डिंज साहेब यांनी गोखल्यांची कामगिरी किती महत्त्वाची होती हे स्पष्ट सांगितले आहे. लॉर्ड हार्डिंज म्हणतात, "I have always understood that he took a quiet but active part in the conver-

sations that led up to the reform of this and the other Indian Councils.'' विलायतेतील कामगिरी संपल्यानंतर गोखले मायभूमीस परत आले. १९०८ मध्ये हिंदुस्तानातील मुजफरपूर वगैरे ठिकाणचे अत्याचार पाहून मिंटो म्हणतात, 'I am determined that no anarchical crimes will for an instant deter me from endeavouring, to meet as best I can the political aspirations of honest reformers.' मिंटोच्या या उद्गारांनी गोखल्यांच्या जिवात जीव आला. आणि आपणांस नक्की हक्क मिळणार असे त्यांस वाटू लागले.

१९०९ च्या आरंभी त्यांस अमेरिकेत व्याख्याने देण्यासाठी मोठ्या मानाचे निमंत्रण आले होते. परंतु १९०८ च्या उत्तरार्धांत ज्या सुधारणा जाहीर करण्यात आल्या, त्यांचे नियम, कायदे वगैरे सर्व या वर्षी करावयाचे असल्यामुळे गोखल्यांस या विनंतीचा साभार स्वीकार करिता येईना. आपल्या देशातील काम सोडून अन्यत्र बडेजावासाठी गोपाळराव जातील ही कल्पनाही होत नाही. १९०९ च्या फेब्रुवारी महिन्यात, सुधारलेले बिल पार्लमेंटपुढे मांडण्यात आले. अल्प वादविवाद होऊन १९०९ च्या मे महिन्यात कायदा जाहीर करण्यात आला. १९०६ च्या मे महिन्यात मिंटो म्हणाले होते—'The possibility of the development of administrative machinery in accordance with new conditions.' याचा विचार करण्यात येईल. १९०७ मध्ये खर्डा तयार झाला. १९०८ मध्ये तो सुधारून नीट करण्यात आला. १९०९ च्या मे महिन्यात कायदा म्हणून पास झाला व तीन वर्षे या कायद्याचा बोलबाला होत होता. परंतु या कायद्याने जे दिले ते हिंदुस्तानातील नियम, घटना वगैरेंनी बरेचसे हिरावण्यात आले. यामुळे त्यात तथ्य असे विशेष राहिले नाही. सुधारणा संकुचित करण्यात आल्या. जणू हिंदुस्तानास हा घास पचणार नाही असे सरकारास वाटले! नेमस्त पुढाऱ्यांस, गोखल्यांस या गोष्टीचा फार संताप आला. परंतु संतापाव्यतिरिक्त दुसरे काय करणार! कदाचित् हे नियम घालण्यास देशातील वाढते अत्याचार कारण झाले असावे. बंगालमध्ये खून, दरवडे, बॉंब यांचा सर्वत्र धूमधडाका चालला होता. महाराष्ट्रात नाशिकसारख्या ठिकाणी कट उघडकीस आले. रोज

नित्य अत्याचारांची बातमी असावयाची. सरकारच्या कच्छपी असणारे देशी अधिकारी, गोरे लोक, यांचे बळी कोठे कोठे पडू लागले. या परिस्थितीत गोपाळरावांनी मुंबई व पुणे येथे व्याख्याने दिली. अशा क्रांतिकारक वातावरणात शांततेचा दीप दाखविणे किती कठीण असते ? भ्याड, सरकारशी हितगुज करणारे, देशद्रोही अशा पदव्या बहाल होत असतात. गोखल्यांस या गोष्टींची पर्वा नव्हती. लोकांच्या बेफाम मनास न रुचणारा परंतु परिणामी पथ्यकर असा उपदेश करण्यास ते कचरले नाहीत. या अत्याचारांनी सरकारचा एक रोमही वाकडा होणार नाही. आपले उमदे, वीर्याचे धैर्याचे शेकडो बांड, तरुण, मात्र प्राणांस मुकतील; फासावर लटकविले जातील; काळ्या पाण्यावर पोचविण्यात येतील. ज्या स्वार्थत्यागापासून यत्किंचित्ही फायदा नाही तो करण्यात स्वार्थनिरपेक्षता दिसली, प्राणांची बेपर्वाई दिसली तरी मातृभूमीचा फायदा नाही. आपणच आपल्या पायावर धोंडा पाडून घेत आहो असे त्यांनी सांगितले. आशावादी बनून प्रयत्न करा. सर्व लोकांत संघटना करा. आणि हे संघट्टन, ही एकी झाली, एका कार्यासाठी हजारो, लाखो लोक पुढे येऊ लागले की, करबंदीसारखी जी पूर्ण सनदशीर चळवळ आहे ती हाती घ्या. परंतु आज एक अधिकारी मारा आणि त्याबदला स्वतःचे तीन चार इसम फाशी, पांचसहा जन्मठेप काळ्या पाण्यावर, असे करून घेण्यात काय फायदा आहे ? या प्राणाहुतींनी निजलेले जागे होतील. या प्राणार्पणाने आळशी पुढे येतील. देशसेवेसाठी स्वार्थावर कसा बहिष्कार घालावा लागतो ते त्यांस समजेल. हा फायदा लहानसान नाही. आणि सर्वच वेळां फायदा काय हे पाहून चालत नाही. ज्या सरकारच्या राज्यात जगण्यासारखे काही नाही तेथे मेलेच पाहिजे अशी वृत्ती या तरुण वीरांनी दुसऱ्यात उत्पन्न केली खरी. परंतु त्यांचे हृदयद्रावक परिणाम ज्यांनी पाहिले व ऐकले ते कचरले. यापासून देशाची वास्तविक काही प्रगती होईल का ? अफाट सामर्थ्याच्या सरकारविरुद्ध असहाय, एकाकी व निःशस्त्र लोक कसे टिकणार ? हा मार्ग भावनेस पटला, हृदयास रुचला तरी बुद्धीस पटत नाही. अन्य मार्गांनी चला. खुनाने का कोठे स्वराज्य मिळते ? त्यासाठी मोठी बंडे करावी लागतात. बंड करण्यास शस्त्रे कोठे आहेत ? परकी सरकारासही आधी बोलाविता येत नाही. सारांश

काय, लढाईचा मार्ग आपणांस बहुतेक बंद आहे. त्या मार्गाने आपल्या प्रचंड देशास जाता येणार नाही. लढाई पुनः सुरू झाली तर सरकार जरा गांगरेल. समजा; फक्त बंगालमध्ये सुरू झाली आणि इतर प्रांत स्वस्थ राहिले तर काय होईल? बंगालचा मात्र नायनाट होईल. तेव्हा सर्व देशात एकच सूर निघावा, सर्वांच्या डोळ्यांसमोर एकच ध्येय असावे, एकच विचार मनात खेळावा, हिंदुमुसलमान एकदिल व्हावे, मग आपणांस उठाव करिता येईल. तोपर्यंत तुम्ही प्रयत्न करा, संघटित व्हा, स्वार्थत्याग शिका आणि शिकवा. हे दिवस तयारीचे आहेत. अद्याप शेकडा सत्तर लोकांस देशातील स्थितीची जाणीव देखील नाही. तेव्हा सर्वांस हलवून जागे करा. आणि हे कार्य झाले म्हणजे मग पुढे पाहता येईल. लोकांच्या मनास रुचेल असे बोलणे गोपाळरावांस आवडत नसे. स्वतःच्या बुद्धीस जे पटेल तेच ते सांगत. सध्या आपले बोल कटू वाटले, विषमय वाटले, तरी परिणामी तेच हितकर ठरतील असे त्यांस मनापासून वाटे. लोकांनी त्यांस माथेफिरू, सरकारलेला, असे म्हणण्यास कमी केले नाही. परंतु गोपाळराव हे रानड्यांचे शिष्य होते. ते आपला संताप आवरण्याचा प्रयत्न करीत.

१९१० साल आले; १९१० च्या जानेवारीत नवीन सुधारणांनुसार पहिले कौन्सिल भरले. या वर्षी एक नवीन प्रश्न पुढे आला. या सुमारास आफ्रिकन सरकार तेथे वसाहत करून राहणाऱ्या आशियातील लोकांविरुद्ध अत्यंत जुलमी कायदेकानू करीत होते. या नियमांची अंमलबजावणीही सक्तीने सुरू करण्यात येत होती. याला काय उपाय योजावा हे गोखले ठरवीत होते. या सर्व दुःखाच्या मुळाशी असणारी मुदतबंदीच काढून टाकावी असे त्यांस वाटले आणि त्याप्रमाणे त्यांनी हा निंद्य व अपमानास्पद प्रकार बंद व्हावा म्हणून ठराव आणला. तो पास झाला. त्यांचा दुसरा महत्त्वाचा ठराव म्हणजे प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत करावे यासाठी होता. सरकारकडून या ठरावातील तत्त्वास मान्यता मिळाली. परंतु अगदी नवीन योजना त्यांनी यंदा पुढे मांडली. ती डिस्ट्रिक्ट कौन्सिले, जिल्हा कौन्सिले स्थापण्याची होय. ही कल्पना पूर्वी रानड्यांनी पुढे मांडली होती. परंतु सरकारने त्या गोष्टीचा त्या वेळी विचार केला नाहीच. आणि लोकांसही त्याचा विसर पडत चालला होता. १९०५ साली

इंग्लंडमध्ये वाचलेल्या एका निबंधात गोखल्यांनी या सुधारणेचे महत्त्व सांगितले होते. हे जिल्हाधिकारी लोकांशी अपरिचित असतात व त्यांस लोकांच्या मनोवृत्तीची जाणीव होत आहे तोच त्यास अन्यत्र बदलण्यात येते. या जिल्हाधिकाऱ्यास जिल्ह्यातील गाऱ्हाणी समजणे फार अगत्याचे आहे. जिल्ह्यातील लोकमत कळावे, सल्ला मिळावा एतदर्थ ही कौन्सिले स्थापावयाची होती. खरोखर ही योजना फारच हितकारक होती. हिंदुस्तानातील बहुतेक कारभार या जिल्हाधिकाऱ्यांमार्फत हाकला जातो. त्यांस सल्ला देणारे मंडळ जर असेल तर फारच चांगले होईल. तीन वर्षे ही कौन्सिले केवळ सल्लागार असावी. पुढे त्यांचा जिल्हाधिकाऱ्यांवर ताबाही असावा असे गोखल्यांनी म्हटले होते. अर्थातच ठराव नापास झाला. म्युनिसिपालिटया व लोकलबोर्डें यांचीही सत्ता वाढवावी, त्यांस जास्त अधिकार देऊन त्यांची सांपत्तिक स्थिती सुधारावी अशी सरकारास त्यांनी विनंती केली. गोपाळरावांनी पुनः पुनः केलेल्या मागणीने शिक्षण व आरोग्य या दोन खात्यांवर जो खर्च झाला तितका पूर्वी कधीच झाला नव्हता. आक्टोबर १९१० मध्ये मिंटो हे स्वदेशी गेले. त्यांच्या जागी किचनेर हे येणार असे ऐकिवात होते. परंतु हिंदुस्तानच्या सुदैवाने लॉर्ड हार्डिंज हे गव्हर्नर जनरल झाले. १९११ च्या पहिल्याच बैठकीत, तात्पुरता केलेला सभाबंदीचा कायदा कायम करण्याविषयी बिल आले. गोखल्यांनी व पुष्कळांनी विरोध केला. कारण परिस्थिती बदलली होती. परंतु मजा ही की, पुष्कळ लोकप्रतिनिधींनी कायदा रद्द करू नये असे सांगितले.

५ जानेवारी १९११ रोजी राष्ट्रीय सभेतर्फे नेमस्तांचे एक शिष्टमंडळही गव्हर्नर जनरलच्या भेटीस गेले होते. ते म्हणाले :—"Reforms had given the Indian people, a larger opportunity than they had before of being associated with the Government in the administration of the country. Also reforms had done much to bring about a better understanding between the Government and the people. यानंतर सुधारणांसंबंधीं बंधनकारक असे जे कायदे १९०९ मध्ये करण्यात आले होते ते रद्द होतील अशी आशा त्याने शेवटी प्रदर्शित केली होती.

या साली त्यांनी युनिव्हर्सल रेसिस कॉंग्रेसपुढे एक सुंदर व विचारपरि-

प्लुत निबंध वाचला. पूर्व व पश्चिम संस्कृती व तदनुरोधाने एकमेकांस दुसऱ्यांच्या विचारांत व परिस्थितीत काय शिकण्यासारखे आहे याचे मार्मिक विवेचन त्यात त्यांनी केले. प्रत्येक राष्ट्राचा काही विशेष असतो. आणि प्रत्येक राष्ट्राने इतरांपासून शिकण्यासारखे पुष्कळ असते; सर्वगुणसंपन्न आपणच आहो असा अहंकार अंगी चिकटला की, प्रगती खुंटून परागती होऊ लागली असे समजावे. 'नेणपण सोडू नये' असे समर्थ सांगतात त्यांतील इंगित हेच आहे. आपल्यास शिकण्यासारखे जगात बहुत आहे; आपण काही गोष्टीत नेणते असू ही कल्पना घातुक नसून फायदेशीरच आहे. आधुनिक जीवनसंग्रामात आपला टिकाव लागावा असे आपणांस वाटत असेल तर शिस्त, तरबेजपणा, विश्वास, स्वावलंबन, शास्त्रीय ज्ञान आणि सहकार्य यांची कास धरल्याशिवाय गत्यंतर नाही.

या वर्षी कौन्सिलमध्ये शिक्षण सार्वत्रिक करावयाचे बिल त्यांनी पुनः पुढे मांडले; अर्थातच ते नापास झाले. परंतु त्यामुळे ते नाउमेद झाले नाहीत. दुप्पट जोर त्यांच्या अंगात संचारला. ते प्रथम मद्रासच्या बाजूला गेले व ठिकठिकाणी विद्यार्थ्यांपुढे त्यांनी देशभक्तीने भरलेली, मुद्देसूद आणि समतोल विचारसरणीची व्याख्याने दिली. प्रत्यक्ष कांही तरी काम करू लागा, कामाचे डोंगर आहेत; सुखस्वप्ने नकोत, देशाच्या भावी वैभवाची वर्णनेही नकोत, सद्यःस्थिती व परिस्थिती यांचा सम्यक् विचार करून कार्य-प्रवण व्हा; हेच पुनः पुनः न कंटाळता त्यांनी सांगितले.

या वर्षीचे त्यांचे दुसरे महत्त्वाचे काम म्हणजे त्यांनी सर्व देशभर हिंडून 'शैक्षणिक संघ' सर्वत्र स्थापन केले हे होय. देशास शिक्षणाशिवाय तरणो-पाय नाही. जनमन शिक्षित झाले पाहिजे. आपले पुढारी कशासाठी, कोणा-जवळ भांडत आहेत, का भांडत आहेत, याचा उलगडा त्यांस झाला पाहिजे. या सर्व गोष्टींस शिक्षणाशिवाय अन्य रामबाण उपाय नाही. हिंदुस्तानात शेकडा एकही मनुष्य लिहू वाचू शकत नाही ही केवढी लांछनास्पद व नामुष्कीची गोष्ट ! इतर देशांची स्थिती पाहून स्वतःकडे दृष्टी वळविली म्हणजे कोणाचे हृदय भडभडणार नाही ? त्याबरोबरच संतापही येईल. जपानचे तेजस्वी उदाहरण सदैव त्यांच्या दृष्टीपुढे असे. पन्नास वर्षांत अलौकिक व अपूर्व तयारी

करून जपान पहिल्या दर्जाचे राष्ट्र झाले, यांतील इंगित तेथै झालेला शिक्षण व धंदेशिक्षण यांचा फैलाव हेच. ते शिक्षणही मातृभाषेत दिले गेले. मातृभाषेतून शिक्षण दिल्याविना राष्ट्राची प्रगती झपाट्याने होणार नाही. जपानातील लोक जसे स्वाभिमानी आणि राष्ट्रप्रेमी असतात तसे आपले लोक का होऊ नयेत ? परंतु जपान स्वतंत्र आहे. ते आपल्या प्रजेच्या हितार्थ मनात आणील तर काय करणार नाही ? याच्या उलट आपली पिशवी परक्यांच्या हातात. लष्कराकडे जाणारा द्रव्याचा ओघ थांबेल तेव्हा शिक्षणाकडे पैसा देण्यास फावेल ! परंतु निराश होता कामा नये. कानीकपाळी पुनः पुनः ओरडणे हेच सध्याचे कर्तव्य आहे. देशभर शैक्षणिक संस्था काढून त्या संस्थांचे मत सरकारवर लादले पाहिजे. म्हणजे नैतिक जबाबदारीमधून आपण सुटलो. १९१२ साली हे बिल त्यांनी पुनः मांडले; परंतु ते नापास झाले. या बिलावरील त्यांचे भाषण फारच उत्कृष्ट आहे. लॉर्ड हार्डिंज म्हणतात, ‘ During my period of office the most important measure in which Mr. Gokhale was interested was the bill to make better provision for the extension of primary education. Though he failed in inducing the Council to accept the bill all those who heard him will remember the extra-ordinary force and ability with which he pressed his views. ’ ग्लॅडस्टन साहेबांनी आयरिश बिल जसे पुनःपुनः आणले– ‘प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ’ याचा दाखला जगास दाखविला–तद्वत् गोपाळरावांनी याही बाबतीत केले. गोपाळरावांचे जोराचे व नेटाने केलेले सर्व प्रयत्न विफल झाले. परंतु तरीही रॉबर्ट ब्रूसची गोष्ट त्यांस पूर्ण पटली होती. ‘ फिरून यत्न करून पहा ’ हें त्यांचे सूत्र होते. १९१२ सालची अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे मॉस्लेम लीगची लखनौ येथे भरलेली परिषद होय. ही बैठक २२ मार्च रोजी झाली. आतापर्यंतचे मॉस्लेम लीगचे कार्य अत्यंत संकुचित होते. राष्ट्रीय सभेस विरोध करावयाचा किंवा हिंदू लोकांशी छत्तिसाचा आकडा ठेवून सरकारच्या पुढ्यात नाचावयाचे असे तिचे धोरण होते. मुसलमानास ही तत्त्वे सर सय्यद अहमद यांनी उपदेशिली. तुमचे हितसंबंध ब्रिटिश राज्याशीं निगडित आहेत. हिंदू तुम्हास गिळंकृत करतील हे विसरू नका, असा उपदेश या पुढाऱ्याने आमरण केला, अर्थातच ‘ फोडा

आणि झोडा ' या तत्त्वावर ज्यांचे राज्य चालते त्यांनी या अहमदचे गोडवे गावे आणि ब्रिटिश सत्तेचा आधारस्तंभ असे त्यास गौरवपर म्हणावे यात औचित्याचा भंग कसला ? चिरोल साहेब म्हणतात, ' In our day the British connection has had no stouter and more convinced supporter than the late Sir Syed Ahmed, than whom no Mahomedan has deserved or enjoyed greater influence over his Indian Co-religionists. ' राष्ट्रीय सभा दर वर्षी मुस्लिम संघाचा पाठिंबा मागत असे. परंतु छे; हिंदूंशी एकी ? मग आम्ही हाडाचे मुसलमान कसचे ? या सय्यद अहंमदानंतर आगाखान पुढे आले त्यांनी मॉस्लेम लीग स्थापन केली. त्यांचे ध्येय थोडक्यात असे होते. " The ordered development of the country under the Imperial Crown. " सरकार या मुसलमानांस गोंजारत होते. बंगालची फाळणी केल्याने मुसलमानांचे काहीच नुकसान होत नव्हते. उलट त्यांचे हितसंबंधच दिसत होते. अर्थात मुसलमान राष्ट्रीय चळवळीत सामील होत ना. त्यांस माल मिळू नये, समाजांत त्यांच्याशी मिसळू नये अशी प्रवृत्ती बंगालमध्ये दिसू लागली. तेव्हा मुसलमानांनी दंगे केले. सरकारने या बाबतीत अर्थातच पक्षपात दाखविला. पेशावरमध्येही दंगे झाले, निजाम हैद्राबादेसही आग पेटली. सर्व हिंदू एकदिल झाले असतां मुसलमानांनी हिंदूंस व पुढे मुसलमानांसही चिरडणाऱ्या सभेस पाठिंबा द्यावा हे हिंदूंस कसे सहन होणार ? आमच्या देशात आला आणि पुनः आम्हावर उठलेल्या अरेरावास तुम्ही सहाय्य करता ? या गोष्टीचा कोणास संताप येणार नाही ? वेळ आली म्हणजे सरकार उभयतांस चिरडून टाकील. तोपर्यंत अल्पसंख्याकांची बाजू आपण घेत आहो असा बहाणा सरकार करील. परंतु मुसलमान बंधूंस व त्यांच्या पुढाऱ्यांस हे पसंत पडत नव्हते. १९०७ मधील गोपाळरावांच्या दौऱ्याने त्यांची मने थोडीफार निवळली होती. परंतु पुन्हा दंगे झाले आणि ऐक्याची अंधुक किरणशलाकाही गोपाळरावांच्या मनांतून लोपली. या प्रश्नासंबंधी ते फार चिंताग्रस्त असत. जर कधी काळी हिंदु-मुसलमानांचे ऐक्य होणार नसेल तर या देशाचे कसे व्हावे ! समजा; वसाहतीचा दर्जा मिळाला तरी या आपसातील वितुष्टाने कारभार चालावा कसा ? या देशभक्ताचे मन या चिंतेमुळे उदास व खिन्न

होई. देशाची भवितव्यता त्यास चमत्कारिक दिसे. रानड्यांनी काढलेले देशाच्या स्थितीचे भावी मनोरम चित्र चित्तास रमविते—परंतु बुद्धीस हे शक्य दिसत नाही. सरोजिनीबाईंनी आपल्या आठवणीत गोखल्यांच्या या मनःस्थितीचे सुंदर चित्र रेखाटले आहे, सरोजिनींची व गोपाळराव गोखल्यांची प्रथम भेट १९०६ मध्ये झाली. त्या वेळेस कलकत्त्यास सामाजिक परिषद भरली होती. त्यात सरोजिनींचे उत्कृष्ट भाषण झाले. गोखल्यांनी त्यांस प्रशंसापर पत्र पाठविले. १९०७–११ पर्यंत मुंबई, पुणे, मद्रास, दिल्ली, वगैरे ठिकाणी त्यांच्या गाठी पडत असत. परंतु एकमेकांची जास्त ओळख १९१२ च्या आरंभी झाली. या वेळेस कलकत्त्यास सरोजिनींच्या वडिलांच्या घरीच गोपाळराव उतरले होते. एके दिवशी गोपाळराव खिन्न व उदास अंतःकरणाने बसले होते. इतक्यात सरोजिनीबाई तेथे आल्या. आपल्या राष्ट्राचे पुढे काय होणार याविषयी त्यांच्या मनात विचार घोळत होते. ते सरोजिनींस एकदम मोठ्या उत्सुकतेने म्हणाले ‘ हिंदुस्तानाविषयी आपणांस काय वाटते ? ’ ‘ माझी एकच इच्छा आहे ’ असे बाई बोलल्या. ‘ हिंदुस्तानचे लवकरच काय होईल. ’—असे पुनः उतावळेपणाने त्यांनी विचारले. ‘ पांच वर्षांत हिंदुमुसलमानांचे ऐक्य ’ होईल असे उद्‌गार सरोजिनींनी काढले. ते ऐकून विषण्ण व निराश असे स्मित गोपाळरावांनी केले आणि ते म्हणाले, ‘ You are a poet, but you hope too much. It will not come in your life time or in mine. Keep your faith and work if you can. ’ प्रकृती नादुरुस्त झाल्यामुळे गोपाळराव पुण्यास आले. ते अशक्त झाले होते. जिना चढण्याचीही त्यांस ताकद नव्हती.

१९१२ च्या मार्च महिन्यात २२ तारखेस जी मॉस्लेम लीगची बैठक झाली तेथे सरोजिनीबाईंस आमंत्रण होते. तेथे बाईंनी अत्यंत महत्त्वाचे, जोरदार व वक्तृत्वपरिपूर्ण असे भाषण केले. ऐक्याची देशास किती जरुरी आहे हे आपल्या रसाळ, काव्यमय परंतु स्फूर्तिदायक वाणीने त्यांनी मुसलमानांस पटविले, लखनौस हिंदूंबरोबर सहकार्य करण्याचा ठराव बहुमताने पास झाला. काम संपताच सरोजिनीबाई एकदम थेट पुण्यपत्तनी आल्या. गोपाळरावांस आपण समक्ष झालेली हकीकत केव्हा सांगू असे त्यांस झाले होते.

२६ मार्च रोजी नामदार परांजप्यांसह सरोजिनीबाई गोपाळरावांस भेटण्या-साठी भारत सेवक समाजाच्या सदनात गेल्या. गोखले अशक्त झाले होते-तरी त्यांच्या उद्योगी स्वभावानुसार, हा लेख वाच, ते स्फुट पाहा असे ते करीत. मुस्लीम लीगवरील टीका ते वाचीत होते. रिकामपण कसे ते त्यास माहीतच नव्हते. इतक्यात सरोजिनीबाईस पाहताच 'आपले म्हणणे खरे होणार, आपली इच्छा सफळ होण्याच्या मार्गास लागली हेच कळविण्यास आला ना इतक्या तातडीने?' असे ते एकदम म्हणाले. भराभरा प्रश्नांचा भडिमार त्यांनी सुरू केला. सर्व वृत्त यथावत् जाणून घेतले. गोपाळरावांच्या फटफटीत चेहऱ्यावर प्रसन्नतेची छटा दिसू लागली. सरोजिनीबाई म्हणाल्या, 'राष्ट्रीय सभेनेही मुस्लिम लीगकडे सहानुभूतीची दृष्टी ठेविली पाहिजे. मी मुसलमानांस तसे वचन दिले आहे.' गोपाळराव म्हणाले 'माझ्या हातात जेवढे आहे तेवढे करण्यास मी कमी करणार नाही.' नंतर बाई जाण्यास निघाल्या. 'पुनः दोनप्रहरी या' असे गोपाळराव बोलले.

दुपारी सरोजिनीबाई एकट्याच गोखल्यांकडे आल्या. गोखले खाली होते. एखाद्या चंडोलाप्रमाणे ते आनंदी दिसले. त्यांची खिन्नता व उद्विग्नता लयास गेली होती. आशेचा किरण डोळ्यांसमोर पुनः चमकू लागला. भराभरा जिन्याच्या पायऱ्या चढून ते सरोजिनींस वरती घेऊन चालले. 'तुम्ही फार अशक्त व आजारी आहां; या पायऱ्या तुम्ही कसे चढणार?' असे बाई कळकळीने म्हणाल्या. गोखले म्हणाले, 'You have put new hopes into me; I feel strong enough to face life and work again.'

या उद्गारांवरून मुसलमानांचे व हिंदूंचे ऐक्य हा प्रश्न त्यांस किती जिव्हाळ्याचा वाटत होता हे दिसून येते. देशाच्या दुर्दैवाबद्दल ज्याचे हृदय अहोरात्र जळते, ज्यास क्षणभरही शांती मिळत नाही, त्याच्या देशभक्तीचे मोल आम्ही काय करणार? विवेकानंदांनी एके ठिकाणी म्हटले आहे:— 'स्वदेशभक्तीसंबंधाची माझी ही व्याख्या ठरलेली आहे. कोणत्याही महा-कृत्याचे मुळाशी तीन गोष्टी अवश्यक असतात. पहिली गोष्ट म्हणजे अंतः-करणाची तळमळ; बुद्धीत किंवा तर्कशक्तीत वास्तविक काय अर्थ आहे? बुद्धी किंवा तर्कशक्ती काही पावले जाते आणि पुढील मार्ग आक्रमण करता न आल्यामुळे अडखळून पडते. स्फूर्तीचा झरा नेहमी अंतःकरणातूनच वाहत

असतो. बुद्धीला उघडण्याला अशक्य असलेले दरवाजे प्रेमच उघडू शकते. विश्वाच्या बुडाशी असलेली रहस्ये उघडी होण्याचा दरवाजा, प्रेम उघडू शकते. ह्यास्तव माझ्या भावी सुधारकांनो ! माझ्या भावी स्वदेशभक्तांनो ! तुमच्या अंतःकरणास स्वदेशाबद्दल तळमळ लागली आहे काय ? देवांचे आणि ऋषींचे कोट्यवधी वंशज जवळजवळ पशूंच्या पंक्तीला जाऊन बसले आहेत, याबद्दल तुमचे अंतःकरण विदीर्ण होऊन जाते काय ? देशातील लक्षावधी लोक भुकेने मरत आहेत; शेकडो वर्षांपासून क्षुधा-पीडेमुळे तळमळत आहेत, हे पाहून तुमचे अंतःकरण कळवळून जाते का ? आकाशातील एखाद्या कृष्णवर्ण मेघाप्रमाणे जिकडे तिकडे अज्ञानांधकार पसरला आहे, याबद्दल तुमचे अंतःकरण तिळतिळ तुटते का ? या चिंते-मुळे तुम्हांला झोप येईनाशी झाली आहे का ? तुम्हांला क्षणभर सुद्धा विश्रांती मिळेनाशी झाली आहे का ? ह्या शोचनीय स्थितीचा विचार तुमच्या रक्तात भिनून जाऊन रक्तवाहिन्यांतून वाहू लागला आहे का ? हृदयाच्या प्रत्येक ठोक्याबरोबर तुमच्या अंतःकरणातील चिंतनाचे विचार समान गतीने वाहू लागले आहेत का ? या निदिध्यासामुळे तुम्ही जवळ जवळ वेडे बनला आहा का ? आपल्या भोवती पसरलेले दुःख हृदयात भिनून जाऊन आपले नाव, कीर्ती, बायकामुले, संपत्ती, इतकेच नव्हे तर आपली शरीरे यांच्याबद्दल तुम्हांला अजीबात विस्मरण झाले आहे का ? अशी स्थिती होणे ही स्वदेशभक्तीची पहिली पायरी आहे. ' गोखले ही पहिली पायरी चढून वर गेले होते. सरोजिनीच्या नवीन संदेशाने त्यांना नव चैतन्य प्राप्त झाले. नंतर काही वेळाने ते सरोजिनींस म्हणाले ' Stand here with me, with the stars and hills for witness and in their presence consecrate your life and your talent, your song and your speech, your thought and your dream to the mother-land. O poet, see visions from the hill-tops and spread abroad the message of hope to the toilers in the valleys. ' सायंसमय होऊन शेवटचा रक्तिमा आजूबाजूच्या टेकड्यांवर पसरला होता. तो कमी होऊ लागून तारे चमकू लागले होते. अशा प्रशांत, गंभीर प्रसंगी दशदिशांस व तारकासमूहांस साक्ष ठेवून गोपाळरावांनी सरोजिनीस आपले तनमनधन

देशास अर्पण करण्यास सांगितले. सृष्टीच्या वैभवापासून प्राप्त होणारे दिव्य संदेश, दऱ्याखोऱ्यांतून अंधारातून अडखळत, चांचपडत जाणाऱ्या कार्यकर्त्यास सांगण्यास त्यांनी सरोजिनीबाईस विनंती केली. पवित्र विचारांनी देशातील तरुणांची मने सोज्ज्वल करण्यास त्यांनी सरोजिनींस सांगितले. राष्ट्रीय ध्येये कवीशिवाय अन्य कोण शिकविणार? ‘ कविस्तु क्रान्तदर्शी ’ भविष्यकाळातील गोष्टी त्यास कल्पनाशक्तीने जवळ पाहता येतात व तदनुरूप तो लोकांस मार्ग दाखवितो. ज्या वेळेस गोखले सरोजिनींस हे कर्तव्य शिकवीत होते तो देखावा किती हृदयस्पर्शी असला पाहिजे?

मुसलमानांचा प्रश्न सुटेल अशी आशा त्यांच्या मनात पुनः उद्भवली; वठलेल्या रोपट्यास पुनः अंकुर फुटले. त्यांची प्रकृती हळू हळू सुधारू लागली. उत्साहाने व हुशारीने नवीन कामकाज ते पाहू लागले.

१९१२ मध्ये दोन महत्त्वाची कामे गोपाळरावांच्या अंगावर पडली. ही कामे त्यांच्या अंतापर्यंत पुरली. आणि तरीही ती पुरी झाली नाहीतच. एक प्रश्न म्हणजे आफ्रिकेमध्ये हिंदी लोकांचा होणारा अमानुष आणि मनुष्यास काळिमा लावणारा छळ, आणि दुसरी गोष्ट म्हणजे पब्लिक सर्व्हिस कमिशन.

१९१२ च्या जुलै महिन्यात हे कमिशन बसले. या कमिशनचे अध्यक्ष लॉर्ड इस्लिंग्टन हे होते. एकंदर १२ सभासदांचे हे कमिशन होते. चौबळ, गोखले, अबदुल रहिम ( मद्रास हायकोर्टाचे न्यायाधीश ) असे तिघे एतद्देशीय होते. या कमिशनला विशेषतः तीन गोष्टींत चवकशी करावयाची होती.

१ जे सनदी नोकर निवडले जातात, त्यांना शिकविण्याची पद्धत, आणि पसंतीसाठी काही दिवस नौकरीवर नेमणे.

२ नौकरीच्या अटी, पगार, रजा, पेन्शन वगैरे.

३ युरोपियनेतर लोकांस सनदी नौकरीत जाण्यास किती व कसकसे अडथळे आहेत; आणि या सनदी नौकरीच्या, प्रांतिक आणि वरिष्ठ अशा दोन विभागण्या करण्यात काही फायदा आहे की नाही.

हे प्रश्न व तत्संबंधी इतर प्रश्न, सूचना वगैरे कामे या कमिशनला करावयाची होती. या कामाला आरंभ होण्याच्या आधी गोखल्यांस आफ्रिकेत जावे लागले.

# गोखल्यांची आफ्रिकेतील कामगिरी

आफ्रिकेतील चळवळ महात्मा गांधी या थोर पुरुषाच्या नेतृत्वाखाली चालू होती. १९१० च्या फेब्रुवारी महिन्यात मुदतबंदीची चळवळ बंद करण्याचे गोखल्यांचे बिल पास झाले होते. इंग्लंडमध्ये दक्षिण आफ्रिकन कमिटी व लॉर्ड ॲम्प्टहिल यांनी जोराची चळवळ केली. परंतु आफ्रिकेत याचा काही एक दृश्य परिणाम झाला नाही. १८९६ पासून गांधी ब्रिटिश आफ्रिकेत होते. ते आपल्या असहाय लोकांसाठी झगडत होते. आम्ही मनुष्ये आहो, ब्रिटिश साम्राज्यात आम्हांस सर्वत्र हक्क पाहिजेत यासाठी ते भांडत होते. अगदी समान हक्क न मिळाले तरी अपमानास्पद कायदे रद्द झालेच पाहिजेत असे त्यांचे म्हणणे होते. वार्षिक तीन पौंडांची डोईपट्टी म्हणजे तर मजुरांवर केलेल्या क्रूरपणाची कमाल झाली. हिंदी लोकांस विवक्षित जागेतच रहावे लागावयाचे. अशा एक ना दोन शेकडो दुःखकारक गोष्टी होत्या. अनंत यातना गोरे लोक हिंदी लोकास देत होते, गांधींच्या नेतृत्वाखाली सत्याग्रह पुकारण्यात आला. हजारो लोकांनी त्यात भाग घेतला. हिंदुस्तानचे तोंड सात्त्विक तेजाने तळपू लागले. या सत्याग्रहात बायाबापड्यांनी सुद्धा जे धैर्य दाखविले ते पाहून आपण तोंडात बोटेच घातली पाहिजेत. नेता जर योग्य व अत्यंत स्वार्थत्यागी असेल तर तो वानरांकडून लंका सर करील असे म्हणतात ते काही खोटे नव्हे. हिंदी लोकांचा स्वार्थत्याग, व सहनशक्ती, ही कसोटीस लागली. छळाचा कळस झाला, परंतु हिंदूंची कीर्ती शिगेस पोचली. कृष्णकृत्ये करणाऱ्या गोऱ्या लोकांस कलंक लागला. या सुमारास गोखल्यांस आफ्रिकेत येण्याची गांधींनी विनंती

केली बादशहा हिंदुस्तानात गेले होते. पूर्वीचे विभागणीचे शल्य त्यांनी काढून टाकले. साम्राज्योत्सव चालला होता. अशा प्रसंगी सरकार व प्रजा या दोघांच्या विश्वासातले गोखले यांस आफ्रिकेत बोलावून या प्रश्नाचा सोक्षमोक्ष लावावा असे गांधींनी ठरवून गोखल्यांस आमंत्रण दिले. हिंदुस्तान–सरकारने गोखल्यांस शिष्टाईसाठी जाण्यास विनंती केली. गोखले निघाले. त्यांचे काही मित्र त्यांस सांगत होते की, आपण जाऊ नये; परंतु गोपाळराव निघाले. प्रथम बोटीवर पाय ठेवताच त्यांस कटू अनुभव आला. साउथ आफ्रिकन सरकार आपणास शिष्टाचाराप्रमाणे वागवील या अटीवर ते जाण्यास निघाले होते. आफ्रिकेकडे जाणाऱ्या बोटीवर विशेषतः एशियाटिक घ्यावयाचे नाहीत असा कटाक्ष असे. त्याशिवाय पहिल्या वर्गातून प्रवास करावयाचा झाल्यास, त्यांस एकीकडे एक स्वतंत्र खोली मिळावयाची आणि सर्व खोलीचे भाडे त्यांच्याजवळून उकळावयाचे. अशा रीतीने पुष्कळ हिंदी लोकांस आजपर्यंत त्रास होत असे. गोपाळरावांस ही गोष्ट कळविण्यात आली. 'एकच तिकीट घेऊन प्रवास करण्याचा कायदेशीर हक्क मला आहे. सर्व केबिनचे भाडे मी साफ देणार नाही आणि जर मार्गावर न याल तर मला कायदेशीर इलाज करावा लागेल' असे गोखल्यांनी स्पष्ट सांगितले. तेव्हा त्यास एकाच तिकिटावर प्रवास करण्यास परवाना मिळाला. आगबोटीवर खाण्यापिण्याच्या बाबतीतही एशियाटिकांस अंत्यजांप्रमाणे वागवितात असे गोपाळरावांनी ऐकले होते. आपल्यासही हाच अनुभव येईल असे गोखल्यांस वाटले. परंतु यक्षिणीच्या कांडीप्रमाणे सर्व गाडे उलटले. नरकाचा स्वर्ग झाला, सर्पांचा हार झाला. जेव्हा गोखल्यांनी आपली जेवणाची जागा कोठे आहे अशी चवकशी केली तेव्हा त्यांस असे आढळून आले की, त्यांची जागा खुद्द कप्तानाच्या जागेशेजारी ठेविलेली ! असा मान कोणासही मिळत नसतो. या मानदानामुळे गोखल्यांची वाहवा होऊ लागली. युरोपिअन स्त्री-पुरुषांनी त्यांचे आनंदाने स्वागत केले. आता त्यांचा एकंदर प्रवास सुखाचा झाला. २२ आक्टोबर १९१२ रोजी ते केपटौन येथे उतरले. युनियन सरकारचे खुद्द सेक्रेटरी जातीने त्यांचे स्वागत करण्यासाठी आले होते. गोखल्यांचे एकाद्या स्वतंत्र राष्ट्राच्या वकिलाप्रमाणे स्वागत झाले. एक सेक्रेटरी, एक आचारी, एक स्पेशल

सरून सर्व काही त्यांस पुरविण्यात आले. कोठेही उणे पडू दिले नाही. गोखल्यांस मोहजालात पकडण्याची ही शक्कल होती काय? एशियाटिक लोकांनी आपल्या प्रतिनिधीचे हे स्वागत पाहून हर्षाने नाचण्यास आरंभ केला. त्यांस स्वर्ग दोन बोटे उरला. आपल्या पुढाऱ्याचे असे स्वागत होईल हे त्यांच्या ध्यानीमनीही नव्हते. क्षणभर स्वतःच्या दुःखाचा त्यांस विसर पडला. परंतु गांधींनी 'बोटे चाटू नका. मिटक्या मारू नका' असे त्यांच्या कानात सांगितले. गोखले आफ्रिकेत तीन आठवडे होते. सर्व प्रांतभर ते हिंडले, प्रत्येक महत्त्वाच्या शहरी जाऊन त्यांनी व्याख्याने दिली. संपूर्ण स्थिती डोळ्यांनी पाहिली. प्रत्येक शहरी त्यांस मोठ्या मानाने वागविण्यात आले. प्रत्येक सभेस गावचा 'मेयर' अध्यक्ष असावयाचा. हिंदी लोकांनी तर त्यांस बहुमोल करंडकातून मानपत्रे अर्पण केली; गोखल्यांच्या बरोबर महात्मा गांधी हे त्यांचे खासगी चिटणीस म्हणून हिंडत होते. त्यांच्या कोटपाटलुणींची, इस्तरीची वगैरे सर्व व्यवस्था ते जातीने पाहत. गोखल्यांच्या प्रत्येक गरजेची ते काळजीपूर्वक व्यवस्था करीत होते. गोखल्यांस तेथील परिस्थितीचा पूर्ण विचार करता यावा म्हणून त्यांस सर्व सोयी युनियन सरकारने करून दिल्या होत्या. कोठेही आडकाठी नव्हती. एके दिवशी महत्त्वाचे भाषण त्यांस करावयाचे होते. सर्व प्रश्नांचा त्यांनी अभ्यास केला होता. भाषण करण्याच्या आदल्या दिवशी रात्री १२–२ वाजेपर्यंत ते लिहीत बसले होते. भाषणातील एक शब्द बदलून दुसरा घालीत; प्रत्येक शब्द त्यांनी तोलून घातला. डोळे फाडफाडून पाहूनही दुसऱ्यास त्यात नाव ठेवता येऊ नये अशी त्यांची इच्छा होती. दोघांची मने राखण्याचे अत्यंत नाजूक व जबाबदारीचे काम त्यांस करावयाचे होते. दक्षिण आफ्रिकन सरकार गोखल्यांच्या तैनातीस हजर होते. गोखलेही साम्राज्य–मुत्सद्द्यास साजेल अशाच ऐटीने व रुबाबाने वागले. प्रिटोरिया येथे मंत्रिमंडळाच्या बैठकीसमोर गोखल्यांनी मोठ्या जबाबदारपणे शिष्टाई केली. त्या वेळेस हा डोईपट्टीचा कर आम्ही काढून टाकतो असे त्यांस निश्चयेकरून सांगण्यात आले. दर्बानच्या मेज-वानीच्या प्रसंगी त्याचप्रमाणे 'चेंबर ऑफ कॉमर्स' सभेपुढे त्यांस वचने देण्यात आली. त्यांच्याशी सर्व लोक सहानुभूतीने बोलले, चालले. मुलाखती

झाल्या, संभाषणे झाली; आणि सर्वत्र गोखल्यास 'तीन पौंडाचा कर' रद्द करण्याची वचने मिळाली.

किंबर्लेपासून जोहान्सबर्गपर्यंतची गोखल्यांची मोहीम मोठी यशस्वी झाली. प्रत्येक ठिकाणी त्यांचे टोलेजंग स्वागत झाले. '**स्टँडर्ड**' पत्राचा बातमीदार जोहान्सबर्ग येथून लिहितो 'The arrival in the Transvaal of Mr. Gopal Krishna Gokhale must be regarded as an event of surpassing interest and deep significance. It is not too much to say that the distinguished statesman has made a triumphant progress from Kimberley to Johanesburg, and that his reception here has been striking beyond all expectations.' जोहान्सबर्गला जाताना वाटेत क्लर्क्सडॉर्प, पॉट्चेफस्ट्रूम, क्रूजर्सडॉप वगैरे ठिकाणी त्यांचा सत्कार करण्यात आला. जोहान्सबर्ग पार्क येथे स्टेशनवर तर फारच थाटमाट उडाला होता. गोखल्यांनी आपल्या भाषणात स्पष्ट सांगितले की, 'Indian in S. Africa must be made to feel that he lived under the protection of equal laws. On the view that Indians were mere hewers of wood and drawers of water to Europeans who were disposed to think that S. Africa existed only for them, England would find it difficult to hold India.' हे भाषण जोहान्सबर्ग येथे (Masonic Hall Banquet) दगडी दिवाणखान्यात दिल्या गेलेल्या मेजवानीच्या प्रसंगी झाले. केप टाऊन, बेच्वानालँड, प्रिटोरिया, ब्ल्यूमफाउन्टन् वगैरे शहरी गोखले गेले. ३० नोव्हेंबर रोजी ते मुंबासा येथे गेले होते. तेथे जीवनजी हॉलमध्ये त्यांस हिंदी लोकांनी मानपत्र दिले. 'Indians will decline to be treated as helots of the empire.' असा त्यांचा संदेश होता. गोखल्यांस जरी डोईपट्टी रद्द होण्याची वचने मिळाली व दरवर्षी काही लोक कोणी धर्मोपदेशक, कोणी शिक्षक म्हणून येण्याची परवानगी दिली असे सांगितले तरी अद्याप लेखी असे काही नव्हते. एकट्या जनरल बोथाच्या हातात काही नव्हते. ऑरेंज रिव्हर कॉलनी म्हणून जे फ्री स्टेट आहे तेथील मुख्य प्रधान Fischer, हा या सर्वांच्या विरुद्ध होता. दुसऱ्यासाठी आपण झीज सोसावी अशी या

लोकांस मुळीच इच्छा नव्हती. यांनीच पुनःपुनः हिंदूंस थोडीफार सवलत लेण्याविरुद्ध आजपर्यंत सतत हाकाटी केली. आणि गोखलेपुराणानंतर हे ताळ्यावर येतील असे थोडेच होते? स्टँडर्डच्या २१ नोव्हेंबरच्या लेखात स्पष्ट सांगितले आहे की, 'Equality as between Asiatics and Europeans is not regarded as within the range of practical politics in the country and while Mr. Gokhale's personality has charmed all who have met him, it is to be feared that his mission can have but small results. The imperial Government can, of course, exercise no sort of compulsion in the matter. It must, if needs be, abase itself before the Indian subjects of the king and confess its importance to secure for them the justice and recognition of their rights as members of the Empire to which they believe themselves entitled; but then the fact will have to be faced not only that general Botha is unable or unwilling to redeem his pledges, but that most powerful section of his followers have a conception of imperial relationship that carries with it, no matter what benefits may be received, no sense of the necessity of sacrifice even to the most imperative of the exigencies of state.' लंडन टाइम्सने इंग्लंडातून गोखल्यांच्या या भेटीवर ८ जानेवारी १९१३ रोजी एक अग्रलेख लिहिला. तो म्हणतो, 'Mr. Gokhale's visit to the Union is likely to be of permanent value to all concerned in the difficult problem of Indian immigration. This is due equally to the friendly and courteous spirit in which the Union Government received Mr. Gokhale and the breadth of view and statesmanship with which Mr. Gokhale himself approached his task.' परंतु खुद्द आफ्रिकेतील बहुतेक पत्रे निराशेचेच उद्गार काढीत होती. वृत्तपत्रे

तर उघड उघड संताप व हेटाळणी करीत होती. डच लोकांचे एक प्रमुख पत्र डी स्पेक्टेटर म्हणते :—“ According to his own statement Mr. Gokhale has come here with the object of making an investigation in loco in regard to the state of affairs among the coolies here. To be brief with Mr. Gokhale we simply say, that has nothing to do with you, that is our business. We have Self-Government, have passed laws in Parliament in regard to the coolies and no stranger need come here from British India, either on his own behalf or by request, to study problems which are no business of his, and which can quite safely be left to the white statesmen to be dealt with. Mr. Gokhale has informed the public that he is going to have an interview with some of the ministers in regard to the Indian question. Hunderds and hunderds of white poor citizens request interviews of the ministers but generally they have no time or no inclination to listen to complaints. But we trust that the majority of the population will take no notice of the visit and will continue to battle against one of the greatest hests in our country. ” किती सडेतोड उद्दामपणाची आणि बेफिक्रीरपणाची ही भाषा ! स्वातंत्र्य, सामर्थ्य व संपत्ती यांचा हा प्रभाव आहे ! मॉर्निंग पोस्ट ३० ऑक्टोबरच्या लेखात कसे नागमोडी लिहिते पाहा :—‘ Citizenship, they will answer invelves duties no less than rights. It involves in particular the duty of living decently in conformity with the standard of the white man. Experience in South Africa shows that the Indian is not prepared to do this. He is disposed to live in his store, actually sleeping, in some cases, in close contact with the articles of food which he prepares to sell for consumation next day. Such habits revolt the white man. Inspection

cannot stop such evils. Best way is to keep the Indian out. Prevention is better than cure.' अर्थात्च या सर्व अडचणी गोरे लोक पुढे आणतील म्हणून गोखले या मार्गाने गेले नाहीत. But Mr. Gokhale—to his credit be it said – is to wise to use such arguments.' गोखल्यांनी जरी या गोष्टी पुढे आणू दिल्या नाहीत तरी मॉर्निंग पोस्ट त्या सत्य आहेत असे ठासून सांगत आहे व त्यावर उपायही सुचवीत आहे. गोखल्यांनी एकच गोष्ट पुढे मांडली ती ही की, साम्राज्याचा हिंदुस्तान हा महत्त्वाचा घटक आहे, हिंदुस्तानात राष्ट्रीय जागृती व ऐक्य भावना उत्पन्न झाल्या आहेत. जर हिंदू लोकांस येथे सर्वत्र मज्जाव होईल तर हिंदुस्तान बिथरेल. आणखी दुसरी गोष्ट, आता हिंदुस्तानातच नवीन कारखाने निघत असल्यामुळे तेथे जास्त मजूर लागतात. आणि हिंदुस्तानातच मजुरांस मजुरी मिळू लागल्यावर इकडे येणारा प्रवाह आपोआप बंद होईल; अर्थात् हिंदी लोकांमुळे आपला देश गजबजून जाईल ही भीती निराधार आहे हे त्यांनी त्यांस पटविले. ज्या अर्थी नवीन लोक फार येणार नाहीत, त्या अर्थी जे सध्या आहेत त्यांस योग्य व रास्त हक्क देण्यास कोणती अडचण आहे असा गोखल्यांनी सवाल टाकला. गोखल्यांचे हे सर्व करणे मुत्सद्दीपणास शोभेसे होते यात शंका नाही. मॉर्निंग पोस्ट म्हणते :—
"Mr. Gokhale has succeeded in proving to the people of this country that the Indian problem cannot be regarded purely from the local point of view. His sketch of the awakening of national consciousness in the East has come as a revelation to those who have hither–to turned deaf ears to the far–off murmur and stir of that awakening. India, says Mr. Gokhale, is herself crying for labour." अशा युक्तिवादाने गोखल्यांनी आपल्या देशबांधवांची बाजू नीट सावरून धरली. त्यांचे म्हणणे शांतपणे सर्वांनी ऐकले. त्यांनी सर्वांसच राजीखुषी करण्याचे काम केले नाही. स्वाभिमान व सदसद्विचारबुद्धी जागृत ठेवून त्यांनी चोखपणाने आपले काम केले. त्यांच्याविषयी एके ठिकाणी असे उद्गार निघाले—'Truly a public man who wishes to obey the voice

of his conscience alone, has a dificult, if not an impossible task before him, if he wishes also to please all people.' Ilanga lase Natal हे वृत्तपत्र १५ नोव्हेंबरच्या अंकात म्हणते—" Mr. Gokhale has received the attention of our European section of the community not so much because of his personal ability–which is undoubted–as because of his position as an acknowledged spokesman and representative of the whole of the races in India, Those, who do not speak are, like the absent, usually forgotten. Those, who speak with authourity, like Mr. Gokhale are always heard," हिंदुस्तानचा प्रमुख पुढारी, सकल जनतेचा विश्वासपात्र असा नेता अशा दृष्टीने त्यांच्याकडे तिकडील लोकांनी पाहिले. त्यांनी देशाची शिष्टाई शक्य तितकी समतोलपणे केली आणि नंतर इतर कामांसाठी ते माघारी वळले.

गोखले आपली कामगिरी आटोपून परत हिंदुस्तानास आले, मुंबईस त्यांच्या अभिनंदनार्थ जाहीर सभा भरली होती. थोड्याच दिवसांनी गोखले बंकीपूरच्या कॉंग्रेसला निघून गेले. १९१२च्या बंकीपूर कॉंग्रेसमध्ये गोखल्यांनी दक्षिण–आफ्रिका व इतर वसाहतीतील एतद्देशीय यांच्याविषयी ठराव मांडला. हिंदी लोकांचे कोणतेही हक्क आम्ही सोडले नाहीत किंवा हिंदी लोकांनी तिकडे जाण्याबद्दलचा प्रतिबंध तितकासा कबूल केलेला नाही. परंतु मुत्सद्देगिरीच्या दृष्टीने सध्या जे लोक तेथे आहेतच त्यांच्या गैरसोयी व गाऱ्हाणी दूर करण्याचा प्रयत्न आधी केला पाहिजे असे गांधींना व मला–दोघांसही वाटले. अडचणीशिवाय येणे वा जाणे, एका प्रांतातून दुसऱ्या प्रांतात मोकळेपणाने जावयास मिळणे, जेथे मनास आवडेल तेथे वस्ती करणे, अडथळा न येता उद्योगधंदा करावयास मिळणे, शिक्षणासाठी सरकारी मदत मिळणे, म्युनिसिपलिटीत व राज्यकारभारात मतदानाचा अधिकार मिळणे, सरकारी नोकरी व इतर सार्वजनिक कामे करण्यास आडकाठी नसणे—वगैरे सर्व गोष्टींचा गाऱ्हाणी नाहीशी करण्यात समावेश होतो. शेवटी गोखले म्हणाले, 'The duty of Indians in India was to support and encourage their country–men in S. Africa as

important issues affecting, their whole status as an empire were involved in the struggle.' या राष्ट्रीय सभेमध्ये गोखल्यांच्या दक्षिण आफ्रिकेतील कामगिरीचा गौरवपूर्वक उल्लेख करण्यात आला, आणि त्यांच्या आभारप्रदर्शनार्थ ठराव पास करण्यात आला.

हे सर्व झाले तरी मेथादिक मंडळी या कामगिरीविषयी साशंक होती. मेथा तर गोखल्यांचे मुंबईस स्वागत झाले त्या वेळेस हजरही राहिले नाहीत. कारण गोखले हात हालवीतच परत आले असे त्यांस वाटले. गोखल्यांनी बोथादिकांजवळ लेखी वचन मागितले होते. परंतु त्या मुत्सद्दीत्रयाने ते म्हणणे लांबणीवर टाकले. गोखल्यांचा गोडपणा, सरळपणा, भोळेपणा येथे नडला. आपल्यासारखेच सर्व सत्याचे पुतळे आहेत, आपल्या शब्दास मान देतील. असें ते घेऊन चालले. परंतु मुत्सद्दी केसाने गळा कापणारे असतात याची गोखल्यांस जाणीव नव्हती. लोक कसे कारस्थानपटू असतात याचा इंगा गोखल्यांस अद्याप कळला नव्हता. गोखले तोंडी अभिवचनावर संतुष्ट राहिले. परंतु ही घोडचूक झाली. सत्यावर विश्वास ठेवू नये. या स्वतःच्या शब्दांस इंग्रजांनीच काही किंमत ठेविली नाही. या बोटावरची थुंकी या बोटावर करणारे हे जे आपले जातभाई त्यांसही मेकॉले साहेबांनी सत्यप्रिय म्हणून गोंजारले असते काय ? याशिवाय गोखल्यांची मुत्सद्दोगिरी लोकांस पसंत नसण्याचे दुसरे कारण म्हणजे नुसता तीन पौंड डोईपट्टीचा कर बंद करणे म्हणजे काही मोठे शतकृत्य करणे नव्हे. इतर हजारो बाबीत अन्याय सर्रहा सुरूच राहणार होता ! परंतु गोखल्यांचे या बाबतीतील धोरण चांगले होते. सर्व अन्याय दूर होईपर्यंत आफ्रिकेतील आपल्या बांधवांस तुरुंगात रखडत ठेवावयाचे का एकेकाच्या गळ्याभोवतालचा फास सोडवावयाचा ! मुंबईत, पुण्यात आरामखुर्चीवरून राजकारणाच्या सवा हात लांब बाता झोकणाऱ्यांस आफ्रिकेतील मजुरास काय हालअपेष्टा भोगाव्या लागत असतील याची कल्पनाच येणे शक्य नाही. तुरुंगात गेलेल्या हजारो बायकापोरांस आधी बाहेर तर येऊ द्या, मग पुढील प्रश्नास हात घालू. परंतु खाईन तर तुपाशी नाही तर उपाशी असला मामला गोपाळरावांस पटत नसे. तेव्हा गोपाळराव तीन पौंडांची डोईपट्टी उठवूनच तात्पुरते संतुष्ट झाले. जर ते तसे करते ना, तर येवढेही झाले नसते. साउथ सरकारने केलेल्या स्वागताने

गोखले मिंधे बनले नव्हते. असा पाहुणचार करणाऱ्या सरकारास कसे दुखवू हाही प्रश्न त्यांच्या मनात नसावा. काही असो, गोपाळरावांवर हिंदुस्थानात पुष्कळ ठिकाणी टीका झाली खरी. मेथांस गोखल्यांचा मवाळपणा व लेखी वचन न मागण्यात झालेला गबाळेपणा ही आवडली नाहीत. त्यांनी गोखल्यांस दोष दिला. शेवटी गोखले फसले असेच सर्वांस वाटले. गोखल्यांनी लेखी वचन घेण्याचा बाणेदारपणा दाखवावयास पाहिजे होता. लेखी वचन आणूनही जर आपले अभिवचन वसाहत–सरकारने पाळले नसते तर जगाला या सरकारचा नैतिक अधःपात . सप्रमाण दिसला असता, अगर दाखवता आला असता. हे वचन कितपत पाळले गेले हे पुढे येईलच. हे काम करून गोखले येतात तो पब्लिक सर्व्हिस कमिशनचे काम वाट पाहतच होते. हे काम अत्यंत दगदगीचे व फार जिकिरीचे होते. रोज सहा सहा तास साक्षी ऐकून नंतर घरी त्यावर विचार करून साक्षीदारांची पुनः उलट तपासणी करावयाची ! रात्री दोन दोन वाजेपर्यंत गोपाळरावांनी काम केले ! १९१२-१३ च्या हिवाळ्यात हे कमिशन सर्वत्र हिंडले. सर्व हिंदुस्तानभर, आणि ब्रह्मदेश वगैरे ठिकाणीही जाऊन माहिती आणि पुरावा गोळा करण्यात आला. काम किती करावयाचे याचा प्रश्न नसे. जे करावयाचे ते उत्तम व जबाबदारपणे कसे पार पडेल इकडेच लक्ष होते. या पब्लिक सर्व्हिस कमिशनमध्ये त्यांस किती त्रास होत असे याविषयी एकदा ते अमृतबझार पत्रिकेच्या संपादकांजवळ सहज बोलले : “ मला बिलकूल विश्रांती मिळत नसून या कमिशनातील माझ्या प्रतिपक्ष्यांशी कसे झगडावे हाच विचार रात्रंदिवस माझ्या डोळ्यांपुढे घोळत असतो. माझे प्रतिपक्षी पुष्कळ असून त्यांना तोंड देणारा असहाय असा मी एकटाच आहे. या कमिशनचे काम पूर्ण होईपर्यंत मी जगेन असे मला वाटत नाही. तरी माझे कर्तव्य मला करावयाचे असून त्यात मला मरण आले तरी पतकरेल. ” १९१३ च्या पूर्वार्धात हिंदुस्तानातील निम्मे काम संपवून कमिशन आक्टोबरमध्ये लंडन येथे भरत असे. इंग्लंड-मध्ये काम चालले असता तिकडे युनियन सरकारने फक्त स्त्रियांवरची डोई-पट्टी उठविली, परंतु नवीन कायद्याने प्रतिवर्षी स्त्रियांस परवाना काढावा लागेल असे ठरविण्यात आले. एवंच या डोईपट्टीऐवजी दुसरा कर आला. ही बातमी विजेसारखी सर्वत्र पसरली. गोखले चुकले ! त्यांची मुत्सद्देगिरी

फोल ठरली ! ! वसाहत–सरकारच जगात शहाणे ठरले. ढोंगी आणि आपमतलबी वसाहत सरकारने गोडीगुलाबीने गोखल्यांस भुलवून थापेबाजी केली. १९१३ च्या एप्रिलमध्ये यूनियन सरकारने आपल्या पार्लमेंटपुढे वर सांगितलेल्या नवीन कायद्याचे बिल पुढे आणले. या नवीन बिलाने गांधी आणि गोखले या द्वयास दिलेली वचने मोडण्यात आली. बायकांवरील तीन पौंड तेवढे नाहीसे करून ते भरून काढण्याची नवीन शक्कल त्यांनी काढली होती, आफ्रिकेतील हिंदी पुढाऱ्यांनी गोपाळरावांस विलायतेत तार करून विचारले की, " फक्त स्त्रियांवरचीच डोईपट्टी नाहीशी करण्याचे तुम्ही अभिवचन घेतले होते काय ? " गोखल्यांनी उत्तर दिले, " हा कायदा संपूर्णपणे रद्द करण्यांत येईल असे वचन मला मिळाले होते. " परंतु यूनियन सरकार काहीच खुलासा करीना. ' मौनं सर्वार्थसाधनम् ' हेच चांगले असे त्याने जाणले ! गोखल्यांचे म्हणणे खोडून काढण्याच्या भरीस न पडता आपला कार्यक्रम त्यांनी सुरू ठेविला. बर्कचा उपदेश त्यांस कसा रुचणार ? बर्क म्हणे, " That Asiatic nations have rights and that Europeans have obligations,, that a superior race is bound to observe current morality of the time in all its dealings with its subject race. " परंतु या उपदेशाचे या निगरगट्टांस काय होय ? वचन मोडण्याचा त्यांचा अव्याहत क्रम होता. जे नीतिज्ञान हिंदुस्तानात दाखविण्यात येत असे तेच प्रचलित व परंपरेने पवित्र गणलेले वचनभंगाचे नीतितत्त्व वसाहतवाल्यांनीही पूर्णपणे अंमलात आणले.

गोखल्यांशी संवाद करून लॉर्ड ॲम्प्टहिल यांनी लॉर्डांच्या सभेत मोठे जोरदार भाषण केले. परंतु वसाहत–सरकार शिरजोर ! त्यास या भाषणाने थोडीच आच पोचणार आहे ? त्यास तंबी कोण देणार ? गांधींनी तडजोड करण्याचा प्रयत्न केला. मुदतबंदीची मुदत संपल्यानंतर तरी हिंदू मजुरांस स्वतंत्रपणे येथे राहावयास मिळाले पाहिजे. जे लोक आजपर्यंत येथे आहेत त्यांचे हक्क हिरावून घेणे अन्याय्य होय. येथे हिंदू लोक थोडे तरी राहणारच. त्यांच्या मानसिक, नैतिक, धार्मिक, व शैक्षणिक सुधारणेसाठी तुम्ही काडीचाही प्रयत्न न केल्यामुळे, हिंदुस्तानातून शिक्षक, व धर्मोपदेशक यथे आणण्यास परवानगी पाहिजे. या मागण्या रास्त होत्या. परंतु यूनियन

सरकारच्या डोळ्यांवर संपत्तीचा व सामर्थ्याचा धूर चढलेला ! कोणतीही मागणी त्यास पसंत झाली नाही. १३ जून १९१३ रोजी यूनियन-सरकारने आपले नवीन बिल मूळ स्वरूपात पसार केले. आफ्रिकेतील या मदोन्मत्त मतंगजास ताळ्यावर-वठणीवर कोण आणणार ? तो कोणास बधणार ? आशियाटिक लोकांस आपल्या पायांखाली तुडवीत तो मोठ्या गर्वाने चालला होता.

शेवटी पुनः गांधींनी १२ सप्टेंबर १९१३ रोजी सत्याग्रहाचे शिंग फुंकले. १२ सप्टेंबर रोजी खाणीतील मजूर संप पुकारणार असे स्मट्स साहेबांस गांधींनी कळविले. लोकांचे थवेच्या थवे संप पुकारीत चालले. अंगभर धड वस्त्र नाही, पोटास गोळाभर अन्न नाही, अशा मजुरांची शांति-सेना न्यू कॅसल येथील मैदानावर तळ देऊन होती. गोखले हिंदुस्तानात जागृती करण्यासाठी ताबडतोब तेथील काम सोडून आले. त्यांनी गांधींस एक वर्षपर्यंत दरमहा ३०,००० रुपये पाठविण्याचे ठरविले होते. पहिल्या माहिन्यास ही रक्कम भरपूर पाठविता आली नाही. परंतु गोखल्यांनी जंगजंग पछाडले आणि गांधींस पैशाची ददात भासू दिली नाही. सतत परिश्रमाने ३-४ लाख रुपये गोळा केले. केवढे हे लोकोत्तर कार्य ! व्हाइसरॉयांची गाठ घेऊन गोखल्यांनी आपल्या कार्यास त्यांचीही सहानुभूती मिळविली. इकडे आफ्रिकेत गांधींस अटक झाली. त्यांच्या अटकेने नाताळांतील आणखी २०,००० लोकांनी संप पुकारला. सरकार गोंधळून गेले. गोळीबार होऊन कित्येक मजूर प्राणास मुकले. सत्याग्रहाच्या या प्रचंड व अपूर्व मोहिमेकडे हिंदुस्तानचे लक्ष वेधून राहिले होते. हिंदुस्तानचे व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज यांनी त्या वेळेस हिंदी लोकपक्षाचे जोमदार रीतीने समर्थन केले. मद्रास येथील आपल्या संस्मरणीय भाषणात ( नोव्हेंबर २३, १९१३ ) स्पष्ट शब्दांत ते म्हणाले, ' जर वसाहत-सरकारास उजळ माथ्याने जगात व हिंदुस्तानासमोर वावरावयाचे असेल तर त्याने निःपक्षपाती लोकांची एक कमिटी नेमावी. या चौकशी-कमिशनमध्ये हिंदी प्रतिनिधीही असावे. या कमिटीने अत्यंत जबाबदारपणे कसून चौकशी करून रिपोर्ट तयार करावा. ' हार्डिंज साहेबांच्या या सणसणीत कानउघाडणीचा यूनियन सरकारास राग आला. त्यांनी त्या सरकारच्या कायद्यांस ' Invidious and unjust laws '

असे म्हटले होते. पुष्कळ अँग्लो इंडियनांना सुद्धा हार्डिंजची भाषा 'Which admittedly was not very discreet' असे म्हणणे भाग पडले. अशाच शब्दांचा झाला तर काही उपयोग होतो व तसा तो झाला. गोखले व हार्डिंज यांमध्ये कित्येक दिवस तारातारी चालत होती. गोखले फसले गेल्यामुळे त्यांस या बाबतीत काय करू, काय न करू असे झाले होते. शेवटी ११ डिसेंबर १९१३ रोजी कमिटी नेमल्याचे जाहीर झाले. १९ डिसेंबर रोजी या कमिशनला सुरुवात झाली. गांधी, पोलक कालेनबेक वगैरे पुढाऱ्यांस आता बंधमुक्त करण्यांत आले. बंधमुक्त होताच गांधींनी जाहीर केले की कमिटीची रचना समाधानकारक नाही; तेव्हा तिच्यावर बहिष्कार घालणेच श्रेयस्कर होय. गोखल्यांनी गांधीस परोपरीने सांगितले की असे करू नका. परंतु गांधी व्यक्तीला भाळणारे नव्हते. 'तत्त्वाचा बंदा जीव, व्यक्तीला कोण विचारी?' हे सूत्र त्यांनी पूर्णपणे स्वतःस पटविले होते. व्यक्तीला ते अंतरी मान देत. गोखल्यांबद्दल गांधींना केवढा आदर वाटे! ते त्यांस आपले राजकीय गुरु मानीत आले. परंतु गुरूचे सांगणे आपल्या मनोवृत्तीस, सद्विवेकबुद्धीस पटत नसेल तर आपला दुसरा कार्यक्रम तडीस न्यावा असे तत्त्व भीष्माचार्यांपासून चालत आले आहे. गांधी गोखल्यांस लिहितात, 'तुमच्यासाठी प्राणत्याग करण्याची आमची तयारी आहे. परंतु या सालोमन कमिटीपुढे साक्ष देण्याचे काम मात्र आमच्या हातून होणार नाही.' सर बेंजामिन रॉबर्टसन यांस हिंदुस्तानसरकारने साक्ष द्यावयास पाठविले होते. त्यांना गांधींनी योग्य व जरूर ते सहाय्य दिले. या वेळी अँड्र्यूज आणि पिअर्सन हेही आफ्रिकेत गोपाळरावांच्या सांगण्यावरून आले होते. त्यांच्या आगमनाचा वातावरण शांत करण्याकडे बराच उपयोग झाला. सालोमन कमिटीने अखेर प्रत्येक मुद्द्यावर गांधींच्यासारखाच निकाल दिला. यूनियन सरकारने सर्व शिफारशी मान्य करून ज. बोथा यांनी इंडियन रिलीफ ॲक्ट पास करून घेतला. तक्रारी आता तात्पुरत्या तरी संपल्या. आफ्रिकेतील लढा लढविण्यास गोखल्यांचे गांधींना किती सहाय्य झाले हे गांधींनी दक्षिण हिंदुस्थानात जेव्हा दौरा काढला तेव्हा ठिकठिकाणी सांगितले आहे. 'गोखल्यांच्या स्फूर्तीने, त्यांच्या प्रोत्साहनाने, व सहाय्याने आम्ही इतके दिवस सत्याग्रह लढविला,' असे उद्‌गार त्यांनी काढले. ज्या निःस्वार्थ-

तेने गोपाळराव काम करितात ती निःस्वार्थता अंगी बाणवून घ्या असे प्रत्येक व्याख्यानात ते सांगत. रॉयल कमिशनचे काम चालूच होते. १९१२ सालच्या नोव्हेंबरमध्ये इंग्लंडमधून पुनः सर्व कमिशन येथे आले. दिल्लीस प्रथम ते जमले. तदनंतर प्रांतिक सनदी नौकऱ्या आणि इंडियन सनदी नौकऱ्या यांशिवाय इतर २८ प्रकारच्या खात्यांतील नौकऱ्यांविषयी त्यास चौकशी करावयाची होती. संयुक्तप्रांत, पंजाब, वायव्य सरहद्दीवरचा प्रांत इकडील काम आटोपून कमिशन कलकत्त्यास आले. बिहार, ओरिसा, बंगाल, बर्मा येथील साक्षीदारांच्या साक्षी डिसेंबरच्या उत्तरार्धापासून फेब्रुवारीपर्यंत चालल्या. जगदीशचन्द्र बोस यांची साक्ष मोठी मजेची व महत्त्वाची झाली. तदनंतर फेब्रुवारीत कमिशन मद्रासला आले. सरते शेवटी मुंबापुरीस येऊन आपला दौरा कमिशनने संपविला. मुंबईस मध्यप्रांतातील व मुंबई इलाख्यातील साक्षी घेण्यात आल्या. हे साक्षीसत्र संपल्यावर कमिशन १९१४ च्या वसंतकाळी इंग्लंडला गेले. अर्थात् गोपाळरावांसही इंग्लंडला जावे लागले. परंतु त्यांची प्रकृती अशक्त होत चालली होती. कमिशनच्या कामाचा फार बोजा पडे. गोपाळरावांनी या सनदी नौकऱ्यांचा अभ्यास, परिचय व माहिती करून घेतल्यामुळे त्यांस योग्य ती उत्तरे युरोपियन साक्षीदारांकडून काढून घेता येत असत. पुष्कळ वेळा ते साक्षीदारांस अगदी गोत्यात आणीत. या वेळेस सरोजिनी बाई इंग्लंडमध्ये होत्या; त्या आजारी असून कृष्ण गुप्त यांच्याकडे राहत असत. गोखले यांच्या समाचाराला त्या पुष्कळदा जात. व असा सुंदर पक्षी पिंजऱ्यात कसा सापडला असे विनोदाने म्हणत. परंतु काही दिवसांनी स्वतः गोखल्यांची प्रकृती फार ढासळली. त्यांच्या शरीरावर व मनावर पडलेला कामाचा बोजा त्यांच्या प्रकृतीस सहन झाला नाही. ते थकले होते. दमले होते. परंतु जिवंतपणी विश्रांती घेणे म्हणजे पाप आहे असे त्यांस वाटे. 'अकालो नास्ति धर्मस्य । जीविते चंचले सति ॥' चंचलत्वामुळे जीविताचा बुडबुडा केव्हा फुटेल याचा नेम नाही. यासाठी कोणत्याही वेळी कर्तव्य करीत रहा. जीवित आहे तोपर्यंत प्रत्येक क्षणाचा उपयोग केला पाहिजे. परंतु कांही दिवस गोखल्यांस अंथरुणास खिळावे लागले. ज्या दिवशी डॉक्टर बाहेर जाण्यास परवानगी देई त्या वेळेस सरोजिनीबरोबर ते मनाची करमणूक करण्याकरिता मोटारी-

तून जात. गोपाळरावांस फार जपून वागण्यास सांगितले होते. जर पूर्ण काळजी घ्याल तर आणखी फार तर तीन वर्षे तुम्ही जगू शकाल असा इषाराही डॉक्टरने त्यांस दिला होता. सरोजिनीबाईस जेव्हा 'आपला मृत्यू जवळ आला' असे त्यांनी सांगितले त्या वेळेस त्यांच्या चेहऱ्यावर दुःख किंवा भीती कोणताही विकार नव्हता. आपण हाती घेतलेले काम अपुरे राहील की काय येवढीच त्यांस भीति वाटे. त्यांचे काम चालू होते. रात्रंदिवस देशाचेच विचार त्यांच्या मनात घोळत. त्यांच्या डोळ्यांसमोर चार प्रश्न प्रामुख्याने येत. प्राथमिक शिक्षण सक्तीचे आणि मोफत कसे होईल हा पहिला. या प्रश्नासाठी गेल्या वर्षी जेव्हा ते इंग्लंडमध्ये गेले होते तेव्हा या आपल्या बिलास इंग्लंडमधील बड्या लोकांचा पाठिंबा मिळवीत होते. एकादा प्रश्न डोक्यात आला की त्याचा गोपाळराव सारखा पिच्छा पुरवावयाचे. त्या वेळेस शिक्षण सक्तीचे व सार्वत्रिक कसे होईल या प्रश्नाने त्यांस वेड लाविले होते. दुसरा प्रश्न हिंदु-मुसलमानांचे ऐक्य. तिसरा, नवीन पिढीतील तरुणांचे पाऊल कोणत्या मार्गाकडे जात आहे, ते मागील पिढीपेक्षा जास्त उत्साही, तरतरीत, स्वाभिमानी व स्वार्थत्यागी निपजत आहेत काय ? ही पिढी आपल्या पुढे जाऊन कार्यप्रवणता दाखवील काय ? चवथा प्रश्न त्यांच्या भारत सेवक समाजाचा. या प्रश्नांचा विचार करण्यात त्यांचे चित्त चूर असे. यातच ते गढून गेलेले असत. कधी कधी फिरावयास गेले असता सरोजिनीजवळ गोपाळराव आपल्या आयुष्यातील अनेक प्रसंगांचे वर्णन करीत. योग्य समय व उत्सुक आणि प्रेमळ श्रोता मिळाल्यावर दुःखी मनुष्यास सर्व ओकून टाकावेसे वाटते. मन हलके करावे, मनाची खळबळ मळमळ नाहीशी करावी असे कष्टी मनास फार वाटते. परंतु हे होण्यास श्रोता प्रेमळ व सहानुभूतीचा लागतो. आपली झालेली निराशा, कधी मध्येच दिसलेले आशेचे किरण, कधी खडतर टीका तर कधी निघालेल्या अपूर्व मिरवणुकी व झालेले स्तुतिवर्णन; इत्यादी गोष्टी ते सांगत. तर कधी देशाची भवितव्यता, साम्राज्यात त्याचा भावी दर्जा, एक ना दोन, नाना गोष्टींवर ते बोलत. कधी रॉयल कमिशनसंबंधी गोष्टी निघत. कधी कौन्सिल व काँग्रेस यांच्या प्रश्नांनी ते मन रिझवीत. कधीकधी आपल्या बरोबरीच्या देशसेवकांचा मोठ्या

गौरवाने व मोकळेपणाने ते उल्लेख करीत. जेव्हा ते व्यक्तिविषयक बोलत त्या वेळेस पूर्ण सहानुभूतीने बोलत. एका पुढाऱ्यात मातीच्या गोळ्यापासून तेजस्वी तरुण बनविण्याचे सामर्थ्य आहे; दुसरा अत्यंत प्रामाणिक परंतु उतावळा आहे; तिसरा पंथ आणि धर्म यांच्या अतीत असल्यामुळे हिंदु-मुसलमानांचा पुढारी होण्यास क्षम आहे. (हे महात्मा गांधींस उद्देशून आहे काय? असल्यास हे भविष्य खरे झाले म्हणावयाचे.) चवथ्या एकाने इतका स्वार्थत्याग केला आहे की, त्याला सर्वांस दरडावावयाचा हक्क आहे. (हे टिळकांस उद्देशून असावे काय?) अशा प्रकारे निरनिराळ्या पुढाऱ्यांवर त्यांचे विशेषतः गुणग्राहक दृष्टीने परीक्षण करून ते बोलत. त्यांची गुणैकदृष्टी होती. निदान या वेळी—आयुष्याच्या सायंकाळी—येथे निवांतस्थानी बोलताना तरी त्यांचा हा गुण स्पष्ट दिसत होता; परंतु हे बोलणे चालणे लवकरच संपुष्टात आले. हे सुखसंवाद संपले. कारण डॉक्टरने 'बोलत जाऊ नका' असा सल्ला दिला. 'खोली सोडून जाऊ नका' असेही डॉक्टरने त्यांस सांगितले. तेव्हा ते काही दिवस रतन टाटा यांच्याकडे जाऊन राहिले. तेथे त्यांच्या मनास काहीसा विरंगुळा वाटे. डॉ. जीवराज मेहता हे त्यांची फार शुश्रूषा करीत असत. परंतु गोखल्यांस आपल्या मायभूमीस आता परत जावेसे वाटले. विची येथून ते सरोजिनीस लिहितात, 'Here in the intense mental solitude, I have come upon the bed-rock truths of life and must learn to adjust myself to their demands.' जुन्या उपनिषत्कारांच्या उदात्त वचनांची त्यांना आता आठवण होऊ लागली. आयुष्याचा पडदा पडू लागण्याची वेळ आली, असे त्यांच्या मनास वाटू लागले. येथल्या एकतानतेत सुंदर तत्त्वे, नवीन विचार सुचू लागले. या विचारांप्रमाणे आता आपणास वागले पाहिजे असे त्यांस वाटे. त्यांचे हृदय शुद्धतर झाले. बुद्धी अचल झाली. ते आता अंतर्मुख झाले. आता प्रिय जन्मभूमीस जावे, ज्या भव्य भूमीने पवित्र जगद्वंद्य ऋषींस जन्म दिला, त्या आपल्या पवित्र देशात, संतांच्या भूमीत, धर्माच्या आरामस्थानी 'आनंदवनभुवनी' आपण जावे असे त्यांस जास्त जास्त वाटू लागले. आठ आक्टोबर रोजी सरोजिनीची व त्यांची शेवटची

भेट झाली. ही भेट खरोखरच शेवटची ठरली. मृत्यूची छाया त्यांच्या देहावर पसरली होती. वाळलेल्या तृणपत्राप्रमाणे ते गळून गेलेले होते. त्यांचा मुखचंद्रमा पांडुर झाला होता. त्याच्यावर पवित्रपणा होता; परंतु म्लानता होती; खिन्नतेची छटाही दृग्गोचर होत होती. त्यांच्या डोळ्यांत तेज होते; तेथे विमलता भरलेली होती, गंभीर व मधुर स्वराने ते म्हणाले : 'I do not think we shall meet again; if you live, remember your life is dedicated to the service of the country. My work is done ' आता आपली पुनः भेट होईल असे दिसत नाही. तुम्ही आपला जन्म देशसेवेस वाहिला आहे हे ध्यानात धरा. माझे काम संपले. असे ते उद्गार होते.

त्यांची प्रकृती खालावलेली पाहून त्यांचे मित्र, व सहकारी हिवाळ्यात हिंदुस्तानांत जा असे सांगू लागले, आणि गोपाळराव नोव्हेंबरअखेर हिंदुस्तानांत परत आले. ते आपल्या आवडत्या सदनांतच राहत असत.

हिंदुस्तानात आता नवीन मनू उदयास येत होता. लढाई सुरू झाली होती. देशातील लोक शांत व निष्ठापूर्ण होते. लो० टिळकांस कैदेतून नुकतेच ३।४ महिन्यांपूर्वी मुक्त करण्यात आले होते. सर्व लोकांनी या युद्धप्रसंगी सरकारास सहाय्य करावे असे टिळकांनी जाहीर केले होते. पूर्वीची स्थिती पालटली होती. लढाई सुरू आहे, या लढाईत आपण योग्य ते साहाय्य केले तर आपणास इंग्लंड भरभक्कम सुधारणा देईल असे टिळकांस वाटत असावे. परिस्थितीप्रमाणे टिळक मार्ग आंखीत. त्याचप्रमाणे ते कैदेंत गेल्यापासून राष्ट्रीय पक्ष राष्ट्रीय सभेपासून अलग राहिला होता. १९१० साली गोखल्यांनी समेट करण्याचा प्रयत्न केला तरी तो सफल झाला नाही. नेमस्त पक्षाबरोबर ते सहकार्य करतील अशी लोकांस—नेमस्त लोकांस—आशा वाटू लागली. टिळकांनी आपल्या घरी राष्ट्रीय पक्षाची सभा भरविली. सर्वांचे म्हणणे काय पडले ते अजमावले आणि भेटीस येणाऱ्या बेझंट व सुब्बाराव यांस काय सांगावयाचे ते मनात ठरवून ठेवले. सुब्बारावांची व टिळकांची गांठ पडली. समेटाचा ठराव व नवीन पक्षास राष्ट्रीय सभेत येण्यास अपमान न वाटावा म्हणून कांही जुन्या अटी वगळणे ही कामे बेझंटबाई करणार होत्या. कॉंग्रेस होईपर्यंत टिळकांचा समेट होणार असे सर्वत्र ध्वनित झाले. गोखल्यांसही वाटत होते की, टिळक खरोखरीच समेट

इच्छितात. परंतु सरकारास शक्य तितका विरोध करण्यांतच मख्खी आहे हा टिळकांच्या अंतरंगीचा विचार जेव्हा गोखल्यांस समजला तेव्हा त्यांनी भूपेंद्रनाथांस एक गुप्त पत्र लिहिले. हे पत्र भूपेंद्रनाथांस कॉंग्रेसच्या कामासाठी निघाले असताना वाटेत मिळाले. अर्थात् ही बातमी त्यांच्या बरोबर असणाऱ्या सर्व लोकांस समजली. बेझंटबाई सात डिसेंबर रोजी पुण्यास आल्या. त्यांस राष्ट्रीय पक्षाचे जे मत ठरले होते ते सांगण्यांत आले. त्या कॉंग्रेसमध्ये कॉन्स्टिट्यूशनची दुरुस्ती करणारा ठराव आणणार होत्या. मसुदा सुद्धा गोखल्यांनीच बेझंटबाईस करून दिला. परंतु गोखल्यांची बुद्धी फिरली. टिळकांमध्ये त्यांस काळेबेरे दिसून आले. गोखल्यांनी एक पत्र पाठवून त्यांत ' टिळक हे आयरिश लोकांचे अडवणुकीचे मार्ग स्वीकारणारे आहेत ' असे सुब्बारावांस सांगितले. या पत्रांत दुसराही नालस्तीचा मजकूर असावा. कारण बसू गोखल्यांस लिहितात; ' हे पत्र विषयनियामक कमिटीत मांडण्यासारखे नाही तरी दुसरे एक पत्र पाठवा. ' तदनुरोधाने गोखल्यांनी दुसरे पत्र पाठविले. विषयनियामक कमिटी भरली. सर्व मंडळी समेटास अनुकूल होती. परंतु Boycott of Government हे शब्द वाचल्याबरोबर सर्व मंडळी स्तिमित झाली; बेझंटबाईंनी टिळकांस तार करून खुलासा मागविला. ' सरकारवर बहिष्कार टाका असे मी कधीच म्हटले नाही. राष्ट्रीय पक्षाचे प्रमुख लोक म्युनिसिपालिट्यांतून वगैरे कामे करीतच आहेत, '—असे टिळकांनी उत्तर पाठविले. हे उत्तर आल्यावर बसूंनी टिळकांवर न कळत आरोप केल्याबद्दल दोनतीनदा माफी-दिलगिरी प्रदर्शित केली. या प्रकारे समेटाचे बोलणे कालावधीवर ढकलण्यात आले.

हे सर्व प्रकरण अमृतबझार पत्रिकेने चव्हाट्यावर मांडले. केसरीच्या ९ फेब्रुवारीच्या अंकांत " चोराच्या उलट्या बोंबा " या नावाखालील अग्रलेखात ज्ञानप्रकाशकार व गोखले यांच्यावर सणसणीत टीका झाली. गोखल्यांनी हे आडवेतिडवे मार्ग का शोधिले हे एक गूढच आहे. समेटाची सर्व चर्चा उघडी चालली होती. अमृतबझार पत्रिकेने तर ' गुप्त घाला ' असे अन्वर्थक विशेषण या कृत्यास दिले. गोखल्यांस पत्र प्रसिद्ध करा असे सांगण्यात आले. पण ते करीनात. ते येवढेच म्हणत कीं, 'Boycott of Government' हे शब्द माझ्या पत्रात नव्हते. ' मग कोणते ते का नाही सांगत ? ' असा टिळक

पक्षाचा सवाल होता. गोखल्यांचे चेले ज्ञानप्रकाशांतून नुकतीच सहा वर्षांची हद्दपारी भोगून आलेल्या या महानुभाव देशभक्तावर इतकी अश्लील व कठोर टीका करू लागले की, ती वाचणे सुद्धा जिवावर येई. शेवटी ९ फेब्रुवारीच्या केसरीत यावर अग्रलेख येऊन सर्व बातमी प्रसिद्ध झाली. Boycott of Government हे शब्द टिळकांनी पूर्वी १९०७ मधील कलकत्त्यास दिलेल्या व्याख्यानांत योजिले होते; त्यांची त्या वेळची मते आज बदलली असतील असे आम्हांस माहीत नव्हते असेही गोखलेपक्षी पत्रे म्हणू लागली. परंतु या समर्थनाच्या प्रयत्नावरून गोखल्यांनी ते शब्द पत्रांत योजिले होते हे मात्र सिद्ध होते. ज्या व्याख्यानाचा उल्लेख ज्ञानप्रकाश देतो ते व्याख्यान कलकत्त्याच्या वृत्तपत्रांनी निराळ्याच शब्दांत दिले आहे ! खेरीज प्रत्यक्ष गोखल्यांनी १९०७ मधील दौऱ्यांत करबंदी सुद्धा जर सनदशीर धरली आहे तर टिळक काही त्यापुढे गेले नव्हते ! कर न देणे म्हणजे सरकारावर रुसणे नव्हे काय ? आणि १९०७ मध्ये गोखले असे म्हणाले म्हणून मवाळ गोटातून ते थोडेच बाहेर आले ? मनुष्य बोलेल पुष्कळ; परंतु काय करावयाचे ते तो परिस्थितीप्रमाणेच ठरवितो. परिस्थिती अनुकूल असता लोकांची तयारी असती, तर गोखल्यांनी करबंदीची चळवळ हातांत घेतली असती. सारांश काय १९०७ सालच्या या एका व्याख्यानावरून काहीच सिद्ध होत नाही. तुरुंगवासाने पूर्वीची मते बदलण्याइतके कच्च्या दिलाचे टिळक नव्हते. 'कोणीकडून तरी टिळकांस सळो का पळो करून सोडावयाचे असेच निदान गोखल्यांच्या अनुयायांस तरी वाटणार. टिळकांस कोणीकडून तरी मारावयाचे, आणि ते सरकारच्या विरुद्ध आहेत असे जाहीर केले म्हणजे आयतीच त्यांची वाट लागेल यापेक्षा यांचा दुसरा विचार नसतो. पण या सद्‌गृहस्थांस आमचे येवढेच सांगणे आहे की, आता हा धंदा पुरे झाला.' या केसरीच्या उद्गारात थोडेफार सत्य आहे असे आम्हांस वाटते.

१६ फेब्रुवारी १९१५ च्या केसरीत गोखल्यांचे ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालेले पत्र आणि त्यास टिळकांचे उदार उत्तर ही आली आहेत.

सुब्बाराव प्रथम मुंबईस मवाळांचे म्हणणे काय आहे ते ऐकावयास गेले होते. तेथे त्यांस यश येईल असे दिसतच नव्हते. कारण प्रतिनिधी निवडून पाठविणे त्यास पसंतच पडले नसते. सुब्बारावांचे आणि टिळकांचे भाषण

ते मुंबईहून परत आल्यावर झाले. ते ८ डिसेंबर रोजी परत आले. ते गोखल्यांकडेच उतरले होते. ९ तारखेस सकाळी टिळक सुब्बारावांकडे गेले. सुब्बाराव टिळकांच्या भाषणातील मुद्द्यांचे टिपण करीत होते. ते त्यांनी टिळकांस दाखवून त्यांत चूकदुरुस्ती करण्यास विनंती केली. टिळकांनी एक दोन फरक सुचविले. हा लेख ९ डिसेंबर रोजी तयार झाला, आणि प्रत्यक्ष गोखल्यांच्या घरात तयार झाला! हा लेख गोखल्यांनी पाहिला असला पाहिजे. या लेखात तर 'सरकारवर बहिष्कार' वगैरे काही मजकूर नाही. गोखले म्हणतात, 'सुब्बारावांनी मला लेखाव्यतिरिक्त जी लेखात नाहीत अशी टिळकांची विधाने सांगितली. ती विधाने या लेखात नसली तरी त्यांवरून टिळकांचे अंतरंग दिसून येते. परंतु गोखल्यांच्या या म्हणण्यात काही अर्थ नाही. मनुष्य मोकळेपणाने बोलताना अंतरीच्या अनेक गोष्टी बोलतो. मसुदा आणि खाजगी भाषण यांत गोखल्यास काहीच फरक दिसत नाही; आम्हांस तर तो किती तरी दिसतो. मनांत पुष्कळ गोष्टी असतात; पण त्या करता थोड्याच येतात ! २५,००० लोक मिळाले असते तर टिळकांनी बंड सुद्धा पुकारले असते, किंवा गोखल्यांनी करबंदीची चळवळ केली असती, परंतु या मनांतील गोष्टी कोणी जबाबदारपणे चव्हाट्यावर मांडीत नसतो. पांढऱ्यावर काळे करावयाचे म्हणजे त्या शब्दांची जबाबदारी येते. घरात आम्ही वाटेल ते बोलू. सरकारविरुद्ध सशस्त्र युद्ध पुकारावे असेही म्हणू. परंतु जर समाजात मी हे बोलेन तर मी त्या बोलण्याबद्दल जबाबदार धरला जाईन. मनातील मांडे पुष्कळ असतात, परंतु जबाबदारीने जे लिहिले तेच खरे घेऊन चालले पाहिजे. गोखले याच्या अगदी उलट घेऊन चालले. जे लिहिले त्याच्यापेक्षा बोलणे जास्त खरे असे गोखले गृहीत धरून चालले. मनुष्याच्या स्वभावज्ञानासाठी, स्वभावाचे सम्यक आलोचन करताना त्यांच्या बोलण्याला पुष्कळच महत्त्व देण जरूर आहे. परंतु ही या मनुष्याची मते आहेत असे समाजात सांगणे धाष्ट्याचे असून ते शहाणपणाचेही होणार नाही.

काही असले तरी आमच्या प्रामाणिक व निःपक्षपाती मनास असेच वाटते की, या वादात गोखल्यांवरच बाजू येते. गोखल्यांनी प्रो. विजापूरकरांस आणखी मध्ये ओढले आहे. प्रो. विजापुरकरही म्हणतात की,

सुब्बारावांजवळ टिळक असे बोलले असतील. परंतु ती मनाची दृश्य सृष्टीत न येणारी कल्पनापत्ये काय कामाची? त्या मुत्सद्द्यात काय आहे ते पाहा. गोखले म्हणतात, मला मसुदा पाहावयास मिळाला नाही म्हणून मी सुब्बारावांजवळ जे भाषण झाले त्याच्यावरच विश्वासलो. परंतु हा मसुदा खुद्द गोखल्यांच्या घरी झाला असता तो त्यांनी पाहिला नसेल हे संभवनीय दिसत नाही. प्रो. विजापुरकरांचे ज्ञानप्रकाशात एक पत्र प्रसिद्ध झाले आहे. परंतु आमचा मुख्य मुद्दा त्याने खोटा ठरत नाही.

# अखेर

गोखले यावेळेस आजारी होते. या भांडणांचा त्यांना जास्तच वीट आला असेल. त्यांनी हे सर्व सरळ दृष्टीने केले असेल; पुढे धोके येऊ नयेत म्हणून केले असेल; परंतु त्यायोगे नुकत्याच कष्टद स्थितीतून आलेल्या वीराचे हृदय दुखविले गेले आणि गोखल्यांच्या अनुयायांनी तर क्रौर्याची सीमाच केली. त्यांनी टीकेची परमावधी केली. टिळकांच्या गैरहजेरीत आपल्या मोहऱ्यावर झालेल्या अश्लील टीकेचा सूडच ते टिळकांवर घेत आहेत असे वाटले. परंतु त्या वेळेस टिळक गैरहजर होते. ते सरकारचा पाहुणचार घेत होते; ते स्वातंत्र्यमंदिरात—कारागृहात होते. म्हणून आपल्या अनुयायांस आवरणे त्यांना शक्य नव्हते. परंतु या वेळेस गोखले आजारी असले तरी आपल्या अनुयायांना त्यांनी आवरले पाहिजे होते. परंतु ते त्यांच्याकडून झाले नाही असे दिसते; असो.

महाराष्ट्रात पुनः खडाजंगी होईल का? आता जगात लढाईस सुरुवात झाली आहे. अशा नाजूक प्रसंगी देशात बंडाची प्रवृत्ती तर नाही होणार असाही त्यांस संशय आला असेल! देशाचे कसे होईल? ही नौका पैल तीराला सुरक्षित जाऊन पोहोचेल, का खडकावर आदळून शतशः विदीर्ण होईल याची त्यांस चिंता लागून राहिली असावी. ते खंगत चालले होते. अनंत श्रमांनी थकलेल्या त्यांच्या देहाला जास्तच थकवा आला. आता त्यांस विशेष श्रम होत नसत. रात्रीच्या वेळी मनाची करमणूक व्हावी म्हणून त्यांची मित्रमंडळी पत्ते वगैरे खेळावयास जमत. हेतू हा की त्यायोगे तरी त्रासलेल्या जीवास विरंगुळा व्हावा. एक दिवस सहज खेळताना त्यांचे आप्त दत्तोपंत

वेलणकर त्यांस म्हणाले : 'ज्या पत्रामुळे येवढे रण माजून राहिले आहे ते करा ना एकदा प्रसिद्ध !' तेव्हा गोखले म्हणाले : 'मी जर ते प्रसिद्ध केले तर टिळकांवर जास्तच गहजब होईल, व ते जास्तच अडचणींत सापडतील. पत्र प्रसिद्ध करावयाचे, की नाही ते मला समजते. तुम्हांला तितका डावपेच, मुत्सद्देगिरी माहीत नाही. ('You have no political wisdom') अशा रीतीने दिवस चालले. शरीर रोडावत चालले. गोखल्यांची अंगलट साधारण बऱ्यापैकी होती. त्यांचा वर्ण गौर असून चेहऱ्यावर एक प्रकारचे मार्दव असे. डोळ्यांत स्निग्धता व पावित्र्य असे. त्यांची मूर्ती मोहक होती; टिळकांप्रमाणे भेदक नव्हती. त्यांची रमणीय देहयष्टी आता सुकत चालली. तेज हरपले; रक्त आटले; मांस नाहीसे झाले. अशा रीतीने गोखले शरपंजरी असता १२ फेब्रुवारीस गांधीजी पुण्यास आले. १९१४ मध्ये इंग्लंडमध्ये गोखले आजारी असतानाही गांधीजी आपल्या गुरूस भेटण्यास आफ्रिकेतून तातडीने तेथे गेले होते. गांधी पायात काही न घालता तेथे त्यांच्या भेटीस येत. परंतु गोखल्यांनी निर्वाणीने 'थंडी आहे, पायात बूट व मोजे घालीत जा.' असे जेव्हा सांगितले तेव्हा ते घालू लागले. गोपाळरावांबद्दल गांधींस केवढा आदर व प्रेम वाटे !

गांधीजींचे पुण्यात टोलेजंग स्वागत झाले. त्यांस भारतसेवक समाजातही आमंत्रण देण्यात आले होते. गांधी समाजाच्या ठिकाणी गेले. त्यांस फलाहार देण्यात आला. ते यावयाच्या आधीच गोखले यांस जबर मूर्च्छना आली होती. गांधीजींनी तेथील प्रचंड लायब्ररी पाहिली आणि ते विस्मित झाले. ते म्हणाले, 'अगदी निवडक ५–५० पुस्तके ठेवावी; हे भाराभर ग्रंथ कशासाठी ?' गांधीजींचे मार्ग निराळे; मते निराळी. देशसेवा हे दोघांचेही ध्येय, येवढीच उभयतात साम्यता ! आपल्या पाठीमागे गांधीजी हे भारत-सेवक समाजाचे पहिले मेंबर, प्रणेते, अध्यक्ष व्हावे अशी गोखल्यांची फार फार इच्छा होती. पण गांधीजी तयार होईनात. शेवटी गोपाळराव म्हणाले, 'तुम्ही देशात सर्वत्र हिंडा; देशस्थिती अजमावा आणि तुमची काय मते होतील ती पाहा. जर तुमची मते सोसायटीच्या मताशी जुळली तरच तुम्ही अध्यक्ष व्हा.' गांधीजींनी देशभर दौरा काढण्याचे ठरविले. आणि गोखल्यांचा निरोप घेऊन ते निघून गेले.

गोपाळराव नुकतेच मूर्च्छनेतून उठले होते. यामुळे आता डॉक्टरांस त्यांची विशेष काळजी वाटू लागली. त्यांचा रोजचा कार्यक्रम चालूच होता. बुधवारी १७ तारखेस रात्रौ त्यांनी एक महत्त्वाचे लिखाण संपविले. हा राजकीय हक्कांचा मसुदा होता. व तो ना. आगाखानांनी पुढे प्रसिद्ध केला. गुरुवारी त्यांनी सर्वांस पत्रे लिहिली. शुक्रवारी सकाळी त्यांची प्रकृती जास्त ढासळली आहे असे डॉक्टरांस दिसले. स्वतः गोपाळरावांस वाटू लागले, की आपण आता चारदोन तासांचेच सोबती आहो. कुटुंबातली सर्व मंडळी बिछान्यासभोवती जमली होती. मित्रमंडळीही खिन्न वदनाने बसली होती. दोनतीन दिवसांपूर्वीचीच गोष्ट. ते हरिभाऊ आपट्यांजवळ मरणासंबंधी बोलत होते. हरिभाऊ त्यांचे परमस्नेही. 'तुम्हास आजपर्यंत कोणाच्या मृत्यूने विशेष दुःख झाले?' हरिभाऊंस गोपाळरावांनी विचारले. 'माझ्या मुलीच्या मृत्यूने' असे हरिभाऊ म्हणाले. गोपाळराव म्हणाले, 'एखाद्या स्नेह्याचे नाव सांगा.' हरिभाऊंनी माधवराव नामजोशी यांचे नाव सांगितले. हरिभाऊंस आपल्या मरणाने लवकरच दुःख होईल या हेतूने ते बोलत होते.

डॉक्टर देव हे गोखल्यांची प्रकृती पाहत असत. मरणाच्या आधी दोन दिवसपर्यंत ते स्वतःच्या हाताने एनिमा घ्यावयाचे. दुसऱ्याने दिलेला त्यांस खपावयाचा नाही. दुसऱ्याने आपली सेवाशुश्रूषा करावी याचा त्यांस तिटकारा असे. एक दिवस ते बिछान्यावर बसले होते. ते कदाचित् पाठीमागे पडतील या हेतूने दत्तोपंत त्यांच्या पाठीशी हात ठेवून बसले होते. न जाणो पडले तर सावरावे. परंतु गोपाळरावांनी मागे मुरडून पाहिले तेव्हा त्यांस अत्यंत राग आला. "मी काय पडतो की काय? तुम्हांस वाटते तरी काय? मी अद्याप चांगला शाबूत आहे, चला, दूर सरा!" असे ते म्हणाले. परंतु ओढून ताणून आणलेले बळ किती टिकणार? मरणाच्या दिवशी—शुक्रवारी सकाळी त्यांस स्वहस्ताने एनिमा घेववला नाही. ग्लिसरिनचा एनिमा दिल्यावर तोही आज लागू झाला नाही. गोपाळराव म्हणाले 'वाटेल ते करा; आता हा देह राहणार नाही!' गॅसब्लॅडरने सर्व छाती तपासून वगैरे पाहिली. आज त्यांस काय वाटले कोण जाणे, त्यांनी बिऱ्हाडची सर्व मंडळी दुपारी भेटावयास बोलावली. डॉक्टर

सांगत होते, त्रास होईल बोलावू नको. परंतु गोपाळरावांनी ऐकले नाही. दुपारी एक वाजता ते व्हरांड्यात येऊन बसले. ते आजारी होते तरी बिऱ्हाडी राहत नसत; सोसायटीच्या मुख्य इमारतीतच राहत असत. सोसायटी हेच त्यांचे घर होते. बिऱ्हाडाची सर्व मंडळी आली. त्यांच्याजवळ तास दोन तास नीटपणे बोलल्यानंतर तीनच्या सुमारास सर्व मंडळीस घरी जा असे त्यांनी सांगितले. " सर्व ठीक आहे; घाबरण्याचे कारण नाही, " असा त्यांनी त्यांस धीर दिला. आता ते आत बिछान्यावर जाऊन पडले. मंडळी बाहेरच व्हरांड्यात उभी होती. त्यांना जाण्याचा धीर कसा व्हावा ? गोपाळरावांनी विचारले, ' मंडळी गेली का ? ' ' नाही ' असे उत्तर मिळताच ते म्हणाले, जा ना आता ? येथे थांबून काय करावयाचे आहे ? ' नंतर सर्व मंडळी घरी गेली. मंडळी घरी गेल्यानंतर गोपाळरावांच्या घशाशी घुरघुर असा आवाज होऊ लागला. मंडळींशी बोलेपर्यंत त्यांनी सर्व अवसान एकवटले होते. होती नव्हती ती शक्ती एकत्र आणली होती. परंतु ज्योत मोठी होते ती जाण्यासाठी असते, तद्वत्च झाले. आता बोलण्याची शक्ती राहिली नाही. संध्याकाळी त्यांचे भाचे पोंक्षे हे तेथे आले व गोपाळरावांची स्थिती पाहून ते एकदम बायकोसारखे रडू लागले. रडणे गोपाळरावांस सहन होईना. ' रडावयाचे असेल, तर येथून निघून जा बरे ! ' असे अवसान आणून गोपाळराव म्हणाले. हळूहळू सायंकाळ झाली. आयुष्याचाही सायंकाळ संपला. आता रात्रीस आरंभ झाला. सभोवताली मृत्यूची काळी छाया पसरून राहिली होती. सर्वांच्या चेहऱ्यावर विषण्णता व खिन्नता स्पष्ट दिसत होती. उदासीनता व उद्विग्नता यांचे साम्राज्य सर्वत्र सुरू झाले होते. एकेक क्षण, एकेक घटका, मोलाची जाऊ लागली. आता आठ वाजावयास आले. ते पाहा आठाचे टोले देण्यात आले. आठाच्या टोल्यांनी जणू आठवण झाल्याप्रमाणे मृत्यू अधिक पुढे सरकला !

आठ वाजता तब्येत अधिकच बिघडली. हरिभाऊंस निरोप पाठविण्यात आला. ताबडतोब टांग्यात बसून हरिभाऊ सोसायटीत आले. गोपाळराव अत्यवस्थ होते. परंतु त्यांस शुद्धी होती , बोलता येत होते. हरिभाऊंना पाहून त्यांस समाधान झाले. ' मला आता अंथरुणावरून आरामखुर्चीवर बसवा ' असे ते म्हणाले. दोघांतिघांनी त्यांस अलगत उचलून खुर्चीवर—त्यांच्या

आवडत्या खुर्चीवर ठेविले. त्यांनी सर्वांस पोट भरून, डोळे भरून पाहिले! शेवटचेच पाहणे ते ! नंतर ते क्षीण स्वराने म्हणाले, 'या लोकची मजा पाहिली. आता तिकडे जाऊन पाहू !' खुर्चीवर बसल्यानंतर पांचच मिनिटांनी त्यांनी वर आकाशाकडे बोट केले. तिकडे जातो असे या करण्याने गोपाळ-रावांनी सुचविले. आपली मान हालवून 'हरिभाऊ येतो आता !' असे ते बोलले आणि त्यांनी नमस्कार केला व डोळे मिटले. किती शांत व गंभीरपणे त्यांनी इहलोकचा निरोप घेतला ! कसेही झाले तरी थोर ते थोरच. आता मृत्युलोक संपला. जीव-शिवांचे ऐक्य झाले. कुडीचा आणि आत्मारामाचा वियोग झाला. चैतन्यात चैतन्य विलीन झाले. तेथील देखावा अत्यंत करुणास्पद होता, गहिवर आणणारा होता. फत्तरास सुद्धा त्या वेळी पाझर फुटला असता; दगडाचे सुद्धा पाणी झाले असते. कठोरवृत्तीच्या माणसाच्या डोळ्यांसही चटकन् पाणी आले असते. रात्रीचे अकरा वाजलेले; सर्वत्र शांतता होती. आकाशात तारे चमकत होते. परंतु येथे जनतेच्या डोळ्यांत अश्रूंचे ढग जमत होते. गोपाळरावांचे शव खाली काढण्यात आले. त्यांच्या सभोवती चिमणी-सारखी तोंडे करून त्यांचे मित्र वगैरे बसले होते. काय करणार ? मृत्यू कोणासही चुकत नाही; मृत्यू कोणाचीही गय करीत नाही. मरण सर्वांसच येते; परंतु देशासाठी निरपेक्षपणे, निरलसपणे अखंड श्रम करीत असता, तनमनधन अर्पण करीत असता मृत्यू येणे हे महाभाग्य होय. लढाई-नंतर सर्व देशाने करावयाच्या उठावणीची गोपाळराव दिशा ठरवीत होते. रॉयल कमिशनचे काम अर्धवटच राहिले. त्याची तळमळ त्यांस लागून राहिली होती. परंतु वरून संदेश आला, की जेवढी फुले परडीत जम-विली असतील तेवढी घेऊनच प्रभूच्या चरणी यावे. जमविलेली फुले परमेश्वराच्या चरणारविंदावर वाहण्यासाठी हा माळी निघून गेला. देवाने बोलावले; ते गेले. आपण वाईट वाटून घेण्यात काळ न दवडता फुले वेचावयास लागू व परडी भरून ठेवू. कारण देवाची हाक केव्हा येईल, याचा नेम नसतो.

सर्वत्र तारा गेल्या. देशात हाहाकार झाला ! पुण्यात शनिवारी दुपारी प्रेतयात्रा निघाली. आजूबाजूचे व मुंबईचे लोक आले होते. पुढारी मंडळी

हजर होती. गोपाळरावांचा देह पुष्पहारांनी मंडित करून सोसायटीचे इमारतीतून बाहेर काढण्यात आला. लकडीपुलावरून सदाशिवपेठेच्या रस्त्याने, बुधवारातून, नानांच्या वाडयावरून ओंकारेश्वरी देह मिरवीत नेण्यात आला. फर्ग्युसन कॉलेजातील सर्व प्रोफेसर, कामत वगैरे शहरातील प्रमुख मंडळी, टिळक, भांडारकर, सर्व लोक वाळवंटात जमले होते. विद्यार्थ्यांची व लोकांची गर्दी लोटली होती. ओंकारेश्वरी एक दोन छाया-चित्रे घेण्यात आली. नंतर गु. डॉ. भाण्डारकर व लो. टिळक यांची समयोचित भाषणे झाली. तदनंतर गोखल्यांच्या देहास मंत्राग्नी देण्यात आला. पुण्यालाच नव्हे तर सर्व हिंदुस्तानास चटका लावून गेलेल्या गोपाळरावांचे गुणवर्णन करीत लोक परत फिरले. टिळकांचे या वेळचे उद्गार फार स्फूर्तिदायक होते. त्यांच्या मनाच्या मोठेपणास ते शोभेसे होते. **हिंदुस्तानातील हिरा, महाराष्ट्रातील नररत्न, कर्तृत्वशाली पुरुषांचा वीर गेला!** ' असे जे टिळकांनी सांगितले ते योग्य होते. या बोलण्यात कपट नव्हते. हृदयाचा सरळपणा व मनाचा उदारपणा आणि थोरपणा त्यात ओतला होता. मोठ्या माणसांच्या मनाच्या नैसर्गिक मोठेपणाने आमचे मन मोहून जाते. तत्त्वनिष्ठ माणसे भांडताना तत्त्वासाठी अटीतटीने भांडतील; परंतु त्यांची अंतःकरणे आतून एकमेकांस ओढीत असतात. ' विभूतिमत् सत्त्व ' सर्वांत एकच आहे, फक्त त्याचा आविर्भाव निरनिराळा होतो ' हे ते जाणतात-उमजतात, त्यांची मने वज्राहून कठोर आणि लोण्याहून मऊ असतात हेच खरे.

# स्वभाव व गुणदोषमीमांसा

गोपाळरावांच्या आयुष्यक्रमाकडे नजर दिली तर आपण आश्चर्यचकित होतो. केवळ दृढनिश्चय व उद्योग यांच्या जोरावर मनुष्य काय करू शकतो हे त्यांनी मूर्तिमंत दाखवून दिले. १८८७ मध्ये हरिभाऊ आपटे आणि गोपाळराव यांचा स्नेह जमला. गोपाळरावांनी हरिभाऊंस सहज प्रश्न केला की " हरिभाऊ, पुढे आपल्या आयुष्यक्रमात तुम्ही काय व्हावे असे तुम्हांस वाटते ? " हरिभाऊंनी गोपाळरावांस तोच प्रश्न केला. गोपाळराव म्हणाले, " कॅबिनेट मिनिस्टर होऊन आपल्या देशाची कामगिरी करावी अशी माझी इच्छा आहे, " " समाजास सन्मार्गदर्शक असा विख्यात कादंबरीकार व्हावे अशी माझी इच्छा आहे, " असे आपटे म्हणाले. गोपाळरावांची मनीषा पाहून आपट्यांस आश्चर्य वाटले. परंतु गोपाळरावांनी आपले ध्येय गाठले हे हरिभाऊंनी आपल्या डोळ्यांनी पाहिले आणि त्यांस मोठे कौतुक वाटले. साम्राज्यात जी सन्मानाची जागा त्यांनी मिळविली, देशात जे त्यांनी महत्त्वाचे लोकनायकत्व पटकाविले हे सर्व त्यांस एकदम आयते वाढून आले नाही. एकेक पायरी चढत चढत ते वर गेले. हळूहळू सर्व फुलले. एकेक पाकळी उमलत होती. सरतेशेवटी सर्व फूल फुलून दशदिशात त्याचा सुवास दरवळून राहिला. वयाच्या अठराव्या वर्षापासून त्यांच्या कामगिरीस प्रारंभ झाला. प्रोफेसर, सार्वजनिक सभेचे चिटणीस, वेल्बीकमिशनपुढील साक्षीदार, प्रांतिक कायदे–कौन्सिलातील सभासद, राष्ट्रीय सभेचे चिटणीस व अध्यक्ष, अखिल हिंदी राष्ट्राचे पुढारी, रॉयल कमिशनवरील मेंबर, परराष्ट्रात अधिकृत वकील, अनेक संस्थांचे संस्थापक, अशा प्रकारे त्यांचा तीस वर्षांचा आयुष्यपट चितारला गेला. मृत्यूच्या वेळेस त्यांचे वय फक्त ४९ वर्षांचे होते.

युरोपमध्ये, व अमेरिकेमध्ये लोक सार्वजनिक कामात, देशाच्या कारभारात पन्नाशी उलटल्यानंतर पुढे येतात. परंतु हिंदुस्तानात पाहिले तर बुद्धी जास्त लवकर परिपक्व होते असे दिसते. अकबर राज्यावर आला त्या वेळेस तो अवघा तेरा वर्षांचा होता. शिवाजी महाराजांनी तोरण्यावर तोरण बांधिले त्या वेळेस त्यांस मिसरूडही फुटली नसेल. पहिला बाजीराव विसाव्या वर्षीच पेशवा झाला. आणि वीस वर्षांत आपल्या अतुल पराक्रमाने त्याने सर्वांस नमविले. पहिले माधवराव हे तर सोळा वर्षांचे असता पेशवे-पदावर अधिष्ठित झाले. आणि सर्व पेशवे मंडळात कार्यकर्ता असे नाव त्यांनी मिळविले; परंतु गाडी जोराने चालविली तर बैल थकून जातात, त्याप्रमाणे या नरवीरांचे देह लवकर थकतात, आधुनिक महाराष्ट्राकडे नजर दिली तरी हेच चित्र दिसते. चिपळूणकर, आपटे, आगरकर यांच्यासारखी रत्ने फारच लवकर दिवंगत झाली. त्यांचेच उदाहरण गोखल्यांनी गिरविले. गोखलेही हिंदुस्तानास फार दिवस लाभले नाहीत. परंतु केसरीतील मृत्युलेखात अवतरण दिल्याप्रमाणे 'मुहूर्तं ज्वलितं श्रेयो न च धूमायितं चिरम् ॥' पुष्कळ धुमसून आजूबाजूच्या लोकांस डोळे चोळण्यास लावण्यापेक्षा क्षणभर चमकावे आणि लोकांस मार्ग दाखवून द्यावा. गुलाब अल्पकाळ असतो, आणि सर्वांस रिझवितो; सुखवितो. परंतु तो कंटकासनावर असतो हे विसरून चालणार नाही. 'न तपस्या तरि ना विकास' हे अबाधित तत्त्व आहे. टिळकसुद्धा त्यांच्यावर आलेल्या मानसिक, शारीरिक दगदगीला न जुमानता इतके दिवस जगले याचे कारण ते स्वतःच सांगत, की 'मी जात्या कठोर अंतःकरणाचा आहे.' दगदगीचा मनावर व त्यामुळे देहावर ते फार परिणाम करून घेत नसत. गोखल्यांचे याच्या अगदी उलट होते. त्यांच्या मनावर फार परिणाम होई. कार्य करीत असता, लढाया लढत असता गोखल्यांस मरण आले. त्यांच्या मृत्यूने सर्व देश हळहळला. क्षणभर सर्व लोक भेदभाव विसरून गेले. गोखल्यांनी आपल्या गुणांनी सर्वांची अंतःकरणे काबीज केली. आपल्या अल्प आयुष्य-क्रमांत ज्या महनीय गुणांनी त्यांनी ही अजरामर कीर्ती संपादन केली, त्या गुणांचे आपण थोडथोडे निरीक्षण करू या. या गुणांबरोबरच त्यांच्या उणिवा, त्यांचा स्वभाव, त्यांच्या कार्याची दिशा याचाही संक्षेपाने विचार करणे प्राप्त आहे.

त्यांच्या सर्व कामगिरीस पायाभूत झालेला गुण म्हणजे त्यांनी केलेला दांडगा अभ्यास. भावी कार्यास योग्य व क्षम होण्यासाठी, त्यांनी देहाची पर्वा केली नाही. सतत दहाबारा वर्षे न्या. रानडे व रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी यांच्याजवळ त्यांनी देशातील सर्व महत्त्वाच्या प्रश्नांचा सांगोपांग अभ्यास केला. त्यांनी विशेषतः आकडेशास्त्राचा जोश्यांजवळ फारच कसोशीने अभ्यास केला. देशाची तरफदारी करणाऱ्यास सर्व खडान्‌खडा माहिती असली पाहिजे, या दृष्टीने त्यांनी युरोपच्या इतिहासाचा फार मनन-पूर्वक अभ्यास केला होता. जुन्या राज्यपद्धती कशा अस्तित्वात आल्या आणि त्यात कसकसे फरक पडले यांचे त्यांनी काळजीपूर्वक ज्ञान मिळविले. वाच्छा म्हणतात :—" Nothing so broadenss the mental horizon in politics as History. The angle of vision is greatly enlarged. Parochial views of men and things are superseded by catholic views. The parish is forgotten and all the world becomes his country. Nothing, therefore, is more valuable than history and no accomplishment is more suited to him who aims at being a better citizen than the same subject. "

गोखल्यांनी इतिहासापासून फार धडे घेतले. परंतु हे सर्व शिकून जर मांडता येत नसेल तर काय फायदा ? म्हणून गोपाळरावांनी याही बाबतीत लहानपणापासून सक्त मेहनत घेतली होती. त्यांनी इंग्रजी भाषेवर प्रभुत्व मिळविले. कोठे उत्तम शब्द,उत्तम वाक्य दिसले की ते यांनी आत्मसात् केलेच. बर्कसारख्या महापंडिताच्या ग्रंथांतील उतारे त्यांस तोंडपाठ असत, या सर्व तयारीमुळे इंग्रजी भाषा त्यांच्या जिव्हाग्रावर खेळू लागली. त्यांची भाषा सोपी, सहजसुंदर, परंतु जोरदार आहे. बंगाली वक्त्यांमधील अलंकार आणि मेथांच्या भाषेतील विनोद व कोटिक्रम हे गुण त्यांच्या भाषेत नाहीत. परंतु सरलता आणि मनोहरता तिच्यामध्ये आहे. मोरोपंतांनी म्हटल्याप्रमाणे ' कृताभ्यंगस्नाना कनकमणिभूषाविरहिता । विराजे सिंदूरे धवलवसने भूपवनिता ॥ ' अशी गोपाळरावांची वाग्वधू होती ! गोखल्यांच्या १९०७ च्या आरंभीच्या उत्तर हिंदुस्थानातील दौऱ्याच्या वेळी हिंदुस्थान रिव्ह्यू त्यांच्या भाषेसंबंधी लिहितो :—" We think his speeches do not rise to the level of oratory, and speak-

ing broadly, they are inferior, as speeches, to the efforts of Mr. Lal Mohan Ghose, Babu Surendranath Banerjee and Sir. Pherojshah Mehta, among living Indians. Mr. Gokhale's diction is chaste but one misses in it the almost classic phraseology of the Hon'ble Dr. Rash Behari Ghose. There is again no humour, no sarcasm, no lofty declamation, no piercing invective, such as characterised for instance, Mr. Lalmohan Ghosa's still famous speech on the Ilbert Bill delivered at Dacca nearly a quarter of century ago. In some respects, however, Mr. Gokhale is equalled by few and surpassed by none among his compatriots. In directness of expression and lucidity of exposition, in grasp of principles and mastery of detail, we hardly know his equal. Read his speeches full of eloquence, full of earnestness, vigorous masterpieces of sustained argument; there is hardly a superfluous word in them or any which one can easily improve. As a debator Mr. Gokhale is not equal to Sir. Pherojshah Mehta neither perhaps as a statesman. In the higher qualities of statesmanship, we think he is inferior only to Sir Pherojshah."

ते आपल्या वाणीत निग्रह दाखवीत. वक्तृत्व आवेशपूर्ण असले तरी त्यात मनाचा आवरलेला भाव स्पष्ट दिसे. इंग्लंडमध्ये या मनोनिग्रहाचा त्यांस फार फायदा झाला. आकडेशास्त्रातील ज्ञान व इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व यांच्या जोडीला त्यांच्या भाषणात विषयाची सुंदर मांडणी असे. एकामागून एक साखळीच्या दुव्याप्रमाणे त्यांच्या भाषणातील दुवे असत. या गुणत्रयामुळे त्यांची कायदेकौन्सिलमधील भाषणे अमोघ ठरली. आकड्यांच्या सम्यक् व अचूक ज्ञानाने त्यात कोणालाही खोड काढता येत नसे. ब्रिटॅनिकाकारांनी त्यांच्या भाषणाचे वर्णन खालीलप्रमाणे केले आहे :–' His persuasive eloquence, close reasoning, accurate knowledge of the subjects discussed and instincts of statemanship won him

the Indian leadership. ' कर्झनसारख्या तडफदार गव्हर्नर जनरलच्या वेळची भाषणे जोरदार व प्रतिपक्षास सपशेल पालथी घालणारी, आणि नामोहरम करून टाकणारी अशी आहेत. कर्झनसाहेबांनी बोलून दाखविले की, ' He had never met a man of any nationality more gifted with Parliamentary capacities. ' काही सभासद राष्ट्रीय सभेसारख्या ठिकाणी मोठी आवेशाची भाषणे करावयाच्या संवयीमुळे येथेही तसे करू पाहत. त्यांस अशी भाषणे करू नयेत असा गोखल्यांनी अनेकदा सल्ला दिला. भूपेंद्रनाथ बसूंच्या फाळणीवरच्या आवेशी भाषणाचे वर्णन करिताना चिरोलसाहेब म्हणतात, ' On this, as on other occasions, the florid style of eloquence cultivated by the leaders of the Indian National Congress fell flat-distinctly-in the calmer atmosphere of the council-room. ' कोणतेही कृत्य करण्यास सरकार जरी समर्थ असले तरी आपण न्याय्य व रास्त टीका करूनच सरकारचा अधःपात जगास दाखविला पाहिजे, आणि हेही काम काही कमी महत्त्वाचे नाही. सरकारवर टीका करण्यास त्यांच्या अंगांत धैर्य होते. स्वाभिमान होता. टीका करताना ते डगमगत नसत. बाहेर राहून सरकारवरील जळजळीत टीकेने वर्तमानपत्राचे रकाने भरण्यास जे धैर्य लागते, तितकेच किंबहुना त्याच्याहून जास्त धैर्य प्रत्यक्ष कौन्सिलात समोरासमोर न्याय्य व सणसणीत टीका करावयास लागते. येथे वायफळ शब्द कामाचा नाही. कल्पनेचे सहाय्य उपयोगी नसते. सरकारला कर्तव्याची हरघडी आठवण करून द्यावी, त्याच्या चुका त्याच्या पदरात घालाव्या हे त्यांचे पहिले कर्तव्य असे. ' स किं सखा साधु न शास्ति योऽधिपं ? | हितान्न यः संशृणुते स किं प्रभुः ? ||' या न्यायाने गोखले साधू ठरले व सरकार हलक्या दर्जाचे ठरले. वाटेल ते कायदे जर सरकार पास करून घेईल तर ही कौन्सिले म्हणजे देखावा-केवळ फार्स होत, असे त्यांनी स्पष्ट शब्दात तेथे सांगितले. ऑफिशियल सीक्रेट्स अॅक्ट, युनिव्हर्सिटी बिल, व्हॅलिडेशन अॅक्ट, सिडिशस मीटिंग्ज अॅक्ट वगैरे प्रसंगी त्यांनी सरकारची झणझणीत कानउघाडणी केली. परंतु टीका करताना त्यांच्या मनात व्यक्तिद्वेष कधीही नसे. संयुक्त प्रांताचे अधिकारी सर जेम्स मेस्टन यांनी आपल्या व्याख्यानात गोखल्यांच्या मनाच्या मोकळेपणाविषयी सुंदर वर्णन

दिले आहे. ते म्हणतात, 'मी सरकारच्या अंदाजपत्रकाची नेहमी तरफदारी करावयाचा, गोखले त्याच्या चिंध्या उडवीत असत; परंतु कधीही उतावीळपणाने मन भडकून गोखले यांनी माझे मन दुखविले नाही. मनास लागेल असा शब्द त्यांच्या तोंडावाटे केव्हाही बाहेर आला नाही, वादविवादाच्या आरंभी आम्ही खासगी बैठकीत बोलत असू आणि मग कौन्सिलमध्ये उघड उघड सरबत्ती होई. मी व ते मित्र झालो. मी जेव्हा संयुक्त प्रांताचा अधिकारी व्हावयाचे ठरले तेव्हा ते मला मित्रत्वाच्या नात्याने म्हणाले, 'I am very anxious that you should do well in the U. P., but you are sure to make blunders and what I want to do is to come and stay with you for a few days about half way through your term of office and to tell you, as the friend that I always have been of the mistkes you made.' चिरोलसाहेबांनी गोखल्यांच्या सभ्यपणाविषयी, व मनाच्या उदारपणाविषयी प्रशंसापत्र दिले आहे ते असे :– "It would be unfair not to give to Mr. Gokhale his full share of credit for the happy result. Though often an unrelenting critic of the administration, he struck from the first a note of studied moderation and restraint to which most of his political friends attuned their utterances. He naturully assumed the functions of the **Leader of His Majesty's opposition,** and he discharged them, not only with the ability which every one expected from him, but with the urbanity and self-restraint of a man conscious of his responsibilities as well as of his powers. His was among the Indian members not only master-mind, but the dominant personality. The European members, on the other hand, showed themselves invariably courteous and good-tempered, and not a few awakened corners were turned by little good-humoured banter. Nor was it unusual to see the Englishman come and sit down by the side of the Indian member to whose indictment he had just been replying, and in friendly conversation take all personal sting

out of the controversy." गोखल्यांचे तेज कौन्सिलमध्ये फार पडले. इतर सर्व सभासद त्यांच्यापुढे दिपून जात. कारण गोखले केवळ सरकारवर टीका करण्याचेच काम करून थांबत नसत, तर रयतेला सुख व्हावे म्हणून दरवर्षी नाना उपाय ते सुचवीत असत. मिठावरील कर, प्रातीवरील कर, आरोग्य, शेतकी–सुधारणा या बाबतींत त्यांचे म्हणणे थोडेफार सरकारने ऐकले. सरकारने ऐकले नाही तरी दरवर्षी तेच तेच सांगण्यास ते कधी मागेपुढे पाहत नसत किंवा लाजही मानीत नसत. शिक्षणाच्या बाबतीतही त्यांच्या कारकिर्दीत जास्त खर्च होऊ लागला. शेवटली तीन वर्षे तर सक्तीच्या व मोफत प्राथमिक शिक्षणाच्या बिलावर त्यांचा सर्व भर होता. हा शिक्षणाचा खर्च कोठून आणावयाचा ? त्यासाठी आयात मालावरील जकात शेकडा ५ आहे ती ७॥ करावी, काही दुसरे कर बसवावे, आणि लष्करासारख्या लाडक्या खात्यातील उधळपट्टी कमी करावी, असे त्यांनी सुचविले. हे सक्तीचे शिक्षण प्रारंभीं मुलांपुरतेच असावे असे गोखल्यांचे मत बनले होते. Mr. Gokhale himself has abandoned the idea of making primary education compulsory for girls as well as for boys'. असे चिरोल सांगतात. गोखल्यांच्या कौन्सिलमधील कामास हिंदुस्तानात तोड नाही. १९१२ च्या मार्चच्या १४ तारखेस अंदाजपत्रकावरील वादविवादाचा समारोप करतेवेळी सर फ्लीटवुड वुइल्सन म्हणाले, "It is difficult for those who served in previous councils to express to those who are new to this council, what a great blank Mr. Gokhale's absence creates. It seems to be the play of Hamlet without Hamlet, and I think we all agree in wishing him a return to good health and a return to the council next year." कौन्सिलामधील त्यांची भाषणे, त्यांनी सुचविलेले निरनिराळे उपाय, शेतकरी वगैरे वर्गास सुख व्हावे यासाठी त्यांस वाटत असलेली तळमळ, त्यांच्यावर करांचे ओझे कमी पडावे म्हणून ते करीत असलेली अव्याहत खटपट हे सर्व पाहिले म्हणजे ते **आपल्याकडील ग्लॅडस्टन होत** असे वाटते. वरील सर्व विवेचनात दिसून न येणारा परंतु अत्यंत महत्त्वाचा गुण म्हणजे त्यांनी कौन्सिलमधील वादांस एक प्रकारचे नैतिक स्वरूप दिले. याच नीतिमत्तेच्या विचाराने अफूचा व्यापार बंद

करा व ते नुकसान हिंदुस्तानासच सोसू द्या. त्याबद्दल विलायतेतील पैही घेणे म्हणजे पातक आहे असे ते बोलले. ग्लॅडस्टनविषयी असेच म्हणत की, 'He brought to our debates a genius which compelled attention' आणि 'he was guided in all the steps he took, in all the efforts that he made, by a high moral ideal.' हेच गोखल्यांच्या बाबतीत अक्षरशः लागू पडते. त्यांच्या म्हणण्याचा विचार करण्याशिवाय गत्यंतर नसे. **त्यांची टीका नैतिक पायावर अधिष्ठित असे.** त्यांच्या कौन्सिलमधील व खासगीही भाषणांनी आपणास फार लाभ झाला असे मिंटो साहेबही म्हणतात :—'I have had the honour to serve with Gokhale during the years I have been in India, to whom I have listened in the Imperial Legislative Council and to whom I am deeply indebted for the counsel and advice which he has so readily given and than whom no one was more capable of representing the interests of his country.'

ते दुसऱ्याची खुशामत करीत नसत; आणि आपल्या लोकांवर कौन्सिलमध्ये कोणी निष्कारण शिंतोडा उडविला तर ते त्यास ताबडतोब उत्तर देत. एकदा जेंकिन्स साहेबांनी कौन्सिलमध्ये एतद्देशीय सभासदांबद्दल अपमानास्पद शब्द उच्चारले. त्याचा त्यांनी ताबडतोब उठून निषेध केला.

गोखल्यांच्या मृत्यूनंतर त्यांची रिकामी जागा जेव्हा सेटलवाड हे भरून काढणार असे जाहीर झाले तेव्हा केसरीत एक स्फुट आले होते. केसरीकार लिहितात, 'नामदार गोखले यांचे हातून वरिष्ठ कायदे-कौन्सिलातील काम इतक्या उत्कृष्ट रीतीने झाले याचे एक कारण त्यांची बुद्धिमत्ता हे तर आहेच. परंतु त्यांचे लक्ष जगाच्या बहुमतापेक्षा कर्तव्याकडे अधिक होते. हे कारण पहिल्याहून अधिक महत्त्वाचे आहे असे आम्हांस वाटते. कायदे-कौन्सिलात जाणे म्हणजे केवळ सरकारची मर्जी आपणावर बसावी यासाठी जावयाचे अशी त्यांची बुद्धी नव्हती.' हे उद्गार अक्षरशः खरे आहेत. मधावर ज्याप्रमाणे माशा बसतात, मुंग्या चिकटतात, त्याप्रमाणे **मानाला भुलणारे गोखले नव्हते.** केवळ सरकारची मोहबत आपणावर व्हावी यासाठी धडपडणारे, लोकमताची पर्वा न करणारे, आणि कौन्सिलच्या बैठकीसही हजर न राहणारे या वर्गातले गोखले नव्हते. ते 'होयबा'

नव्हते; अगर ' जी सरकार ' करणारेही नव्हते. म्हणूनच त्यांच्या हातून कौन्सिलात अमोल कामागिरी घडली.

कौन्सिलातील कामगिरीनंतर त्यांनी बजाविलेल्या इंग्लंडातील कामगिरीचा विचार करावयाचा. १९०५ साली त्यांनी जी चाळीस पन्नास व्याख्याने इंग्लंडात दिली त्या वेळेस हिंदुस्तानच्या हलाखीचे, दारिद्र्याचे, अज्ञानाचे, दडपेगिरीचे त्यांनी असे यथार्थ चित्र रेखाटले की ते चित्र पाहून इंग्लिश लोक चकित झाले. शंभर वर्षे राज्यकारभार केला आणि शेकडा एकही मनुष्य अद्याप लिहू वाचू शकत नाही हे आठवे आश्चर्य नव्हे तर काय?

मोर्लेमिंटो–सुधारणांसाठी त्यांनी किती धडपड केली ते मागे आलेच आहे. नाना मुत्सद्द्यांच्या मुलाखती घ्याव्या; त्यांच्याशी विचारविनिमय करावा; आणि आपले विचार त्यांस समजावून सांगावे. परंतु या वेळेस गोखल्यांच्या भोळेपणाची एक गोष्ट मोर्ले साहेबांच्या ' आठवणी ' वरून दिसून येते ती सांगतो. मोर्ले साहेबास माहीत होते की, गोखल्यांचे ' रॅडिकल ' लोकांवर वजन आहे. ते मिंटोस लिहितात की, 'The British Radical now prominent in the House of Commons does *not* mean mischief and I thinkGokhale does not mean to lead him that way, if the said Gokhale is rightly handled.' मोर्ले साहेबांनी गोखल्यांस आपल्या हातात घेतले. जर हिंदुस्तानात बंडाळी माजेल तर तुम्हांस काही एक मिळणार नाही अशी मोर्ले यांनी गोखल्यांस धमकी दिली. गोखले चपापले व त्यांनी आपल्या मित्रांस हिंदुस्तानात शांतता राखा असे लिहिले. **वास्तविक या अशांततेमुळेच सुधारणा मिळत होत्या. अशांतता वाढेल तरच जास्त लवकर अधिकार–हक्क मिळतात.** अशा वेळी गोखले सरळपणा दाखवीत. आणि या सरळपणाचा, मुत्सद्दी मात्र फायदा घेत. दक्षिण आफ्रिकेत असेच झाले. पोकळ वचनावर गोखल्यांनी विश्वास ठेवला आणि बोथा साहेबांनी चकविले. The dictum of the Roman poet that prudence is an ever-present and all-potent divinity ought assuredly to be kept in mind, by the patriotic Indian who aspires to lay the foundations of an empire-state.' असा मोठा पोक्तपणाचा सल्ला होल्डरनेस साहेबांनी दिला. या वेळी पॅरट

साहेबांनी काव्हूरवर लिहिताना जे लिहिले आहे त्याची आम्हांस आठवण होते. तो म्हणतो :—' There are, it has been well said, two qualities essential to a statesman, the one is prudence—the other imprudence. Cavour possessed the two qualities in combination in an exceptional degree. He knew that in the affairs of states, as in the affairs of individuals, there comes a time when rashness is the height of prudence. ' गोखले दक्षिण आफ्रिकेत जे गेले होते ते परराष्ट्रीय वकिलासारखे होते. अशा वेळी काही शहाणपणा, काही उतावीळपणा दाखवावा लागतो, सर्वच गोष्टींवर सारवासारव करून अशा वेळी भागत नसते. काही तरी दणदणीतपणा पाहिजे. न्याय्य काय आहे हे आपल्या लोकांस सांगतांना अगदी काटेतोल भाषा योग्य ठरेल. परंतु दुसऱ्याकडे ते मागताना गुळमुळीतपणा न दाखविता सडेतोडपणा दाखविला पाहिजे. आणि ते मिळविण्यासाठी इरेस पडले पाहिजे. ग्लॅडस्टन ॲबरडीन्‌विषयी लिहिताना म्हणतात, ' There can be no difficulty in any country, least of all this, in finding foreign minister able and willing to assert the fair and reasonable claims of their countrymen with courage and with firmness. The difficulty is quite of another kind; it is to find a foreign minister, first who will himself view those claims in the dry light of reason and of prudence; secondly and far harder task who will have the courage to hazard and if need be to sacrifice himself in keeping the mind of his countrymen down to such claims as are strictly fair and reasonable. ' यांत सांगितलेला दुसरा गुण गोखल्यात होता. परंतु आपले म्हणणे साध्य होण्यासाठी जेवढा आटोप दाखवावा लागतो, जो आविर्भाव आणावा लागतो तो त्यांनी आणिला नाही. त्यांनी श्रम अपरंपार केले; परंतु **दुसऱ्याचे मन दुखविणे त्यांच्या जिवावर येई.** मोर्ले साहेब असे म्हणतात मग कसे ? बोथा देताहेत वचन—घ्या सध्या तेवढेच. असला प्रकार मुत्सद्द्यास योग्य नव्हे. **जे काही मागावयाचे ते इतक्या जोराने मागावे की, दुसरा स्मित न करता चपापला पाहिजे.** गोखल्यांच्या मनाच्या या गोडपणामुळेच टिळक

म्हणत की, गोखले ह परराष्ट्रीय वकील होण्यास योग्य नाहीत; त्यांनी 'गृहमंत्री'–'होममेंबर'च व्हावे.

गोपाळराव हे नेमस्तपक्षातले अग्रणी तर टिळक हे राष्ट्रीयपक्षाचे अध्वर्यू. दोघांच्या कामगिऱ्या आमच्या दृष्टीने एकमेकांस पोषकच होत. **गोखल्यांस निराशा कधी शिवत नसे; टिळकांना निराशेचीच आशा वाटे. कारण लोक निराश झाले तरच त्यांच्या हातून काही तरी होण्याची आशा असते.** परंतु रानडयांच्या संगतीत मुरलेले व ते संस्कार हृत्पटलावर उठलेले गोखले सदैव आशावादी असत. परकी सरकारकडूनही प्रयत्नाने आपण हक्क मिळवू असे त्यांस खरोखरच वाटे. प्रसिद्ध इंग्रज प्रधान वॉलपोल म्हणत असे की, 'I never heard that it is a crime to hope for the best.' हेच गोखल्यांचे सूत्र होते. आणि म्हणूनच ते निराशेने वेडे बनून लोकांसही वेडे बना असे सांगावयास तयार नव्हते. टिळकांचे १९०८ च्या पूर्वीचे काम केवळ चळवळ करण्याचे होते. परंतु चळवळीपेक्षा तत्त्वे टिकाऊ असतात; कारण चळवळ हा बुडबुडा होय. लाला लजपतराय यांनी 'हिंदी राजकारण या विषयावर १९०५ मध्ये एक लेख लिहिला होता. त्या वेळच्या सर्व ठिकाणच्या चळवळीचा बडयाबडया शब्दांचा पूर पाहून ते म्हणतात :–'I have come to the conclusion that the Indian political party has accepted the expression 'Politics' to be synonymous with Agitation.' राजकारण म्हणजे राष्ट्राची समुन्नती होय. राजकारणपटूची व्याख्या लजपतराय अशी करतात :– 'The Politician is one to whom observation has shown the existence of a grave social grievance or immorality, to whom intelligence has shown a remedy, and to whom the voice of consecience enlightened by a religious conception of the human mission here below, has revealed the inexorable duty of devoting himself to the application of the remedy and extirpation of the evil. The aim of the politician is always to found; that of the other is to destroy. The first is a man of progress, the second of opposition.या सुंदर व्याख्येप्रमाणे पाहिले तर गोखले राजकारणी ठरतात; टिळक चळवळ्ये ठरतात. गोखल्यांच्या पुढे मार्ग, ध्येय होते; टिळक

फक्त खळबळ उडवीत. टिळकांनी मुंबईस स्पष्टच सांगितले होते, 'I do not think it is our duty to formulate constructive measures and help the Government which does not take us into its confidence by enabling us to share its highest offices, executive and administrative and bear the responsibilities of Government. Constructive measures are the duty of those who are responsible for the Government of the country and we are not responsible.' या दोघांच्या मनांतील खात्रीमुळे दोघांनी दोन भिन्न भिन्न मार्ग अनुसरले. **गोखल्यांनी सरकारशी शक्य तितकी सहकारिता करून सुधारणेचे पाऊल पुढे नेण्याचे काम अंगिकारले; टिळकांनी सरकारास चापण्यासाठी लोकमताचा जोर उत्पन्न करण्याचे काम अंगावर घेतले.** यामुळे गोपाळरावांच्या कामगिरीस विधायक असे नाव मिळते आणि टिळकांची कामगिरी विध्वंसक असे सांगण्यात येते. परंतु जमीन खणणे म्हणजे विघातक असे कसे म्हणता येईल ? कोरड्या जमिनीवर बी पेरले तर ते उगवणार नाही, यासाठी **बी पेरण्यासाठी जमीन खणणे हेही विधायक कामच आहे.** टिळकांनी लोकांची मने खणली, त्यांच्या मनावर आलेले-जमलेले-निष्क्रियतेचे थर दूर करून हृदयांत सुप्त असलेला चैतन्याचा झरा त्यांस दाखविला. या कामगिरीस विध्वंसक कोण म्हणेल ? फ्रेडरिक हॅरिसनसाहेबांनी क्रॉमवेल-विषयी लिहिताना म्हटले आहे :—"Destructive work in statesmanship, provided it be permanent, is *ipso facto* constructive, if it enables the new system to form and grow." पुनः ते अन्यत्र म्हणतात— 'No hard and fast line can be drawn between negative and positive act of the soldier and statesman; and it is misleading to attempt to distinguish negative from positive work. That destructive statesmanship should be constructive in result, requires important conditions. The destruction must be necessary and timely; it must be final.' टिळकांचे कार्य अशाच स्वरूपाचे होते. अगदी वेळेवर त्यांनी जनमनावर टोला हाणला. व हृत्कपाटे फोडून आत प्रकाशाचा इतका जोराचा झोत सोडला की, मनातील सर्व किडे मरावे. अंतःकरणाचा दरवाजा उघडून प्रकाशाने मनातील

घाण नाहीशी करणे म्हणजे विघातक काम आहे काय ? असेल तर तसलेच कार्य प्रथम पाहिजे. ज्या स्थितीत लोक समाधान मानीत होते, ती स्थिती खरी दुःखरूप आहे असे त्यांनी त्यास पटविले. 'आजूबाजूस चोहोंकडे टोळधाड आली आहे; निजता काय ?' असा त्यांनी जोराने व सर्वांस स्पष्ट ऐकू जाईल अशा घनगर्जनेने इशारा दिला. नकली व खोटी संतोषवृत्ती लोक जी उराशी बाळगीत होते ती पार घालवून त्यांनी असंतोष निर्माण केला. संतोष असेल तर मनुष्य काहीएक करणार नाही. जो संतोष म्हणून मानण्यात येतो तो वस्तुतः बेगडी संतोष होय. तुम्ही प्रेतास जीव म्हणून कवटाळीत आहा हे जेव्हा लोकांना आपण पटवून देऊ तेव्हा ते उठतील. नवीन उद्योगास-अन्य कार्यास प्रवृत्त होतील. '**असंतोषः श्रियो मूलम्**'–गोखले जर सुशिक्षित लोकांस उद्योग करा, देशाची स्थिती पहा असे न सांगते तर सुशिक्षितांस कशासाठी प्रयत्न करावयाचा हेच कोडे पडले असते. शिवाय सरकारजवळ सनदशीरपणाने हक्क मागण्यासाठी सर्व जनतेचा आपणास पाठिंबा पाहिजे. मवाळांचे किंवा नेमस्तांचे चुकते ते येथेच. ते चार सुशिक्षितांस उपदेश करितील; व्याख्याने देतील; नाही तर विलायतेत मुत्सद्द्यांच्या मांडीशी मांडी लावण्याची लग्नघाई करतील. परंतु देशातील किती लोक स्वराज्य मागत आहेत असा प्रश्न जर प्रतिपक्षाकडून आला तर मूठभर सुशिक्षित लोक हे उत्तर देणे भाग पडते.म्हणून **मुत्सद्द्यांबरोबर वाटाघाट करण्याऐवजी आधी जनतेचा चित्तक्षोभ केला पाहिजे**. जनतेस जे शिकवावयाचे ते नाना युक्त्यांनी शिकविले पाहिजे. त्यांच्यात ऐक्य,संघटना व्हावी; त्यांच्यात राष्ट्रप्रेमाचे स्फुरण उत्पन्न व्हावे, तेज चढावे, यासाठी श्रीगणेशोत्सव, श्रीशिवाजी उत्सव, अशा चळवळी करणे टिळकांस भाग पडले. ज्यांस साग्र वाचून देशाची स्थिती जाणता येते त्यांच्यासाठी हे प्रयत्न नव्हते. तर खेड्यापाड्यात राहणारे मावळे हेटकरी यांच्यासाठी हे प्रयत्न होते; कारण या लोकांना काही तरी भव्य, भडक पाहिजे असते. सर्व जनतेला शिकविण्यासाठी केसरी होता; केवळ नवीन विचारांच्या सुशिक्षितांस शिकविण्यासाठी नव्हता. आणि यामुळे टिळकांस सामाजिक बाबीत काही लिहिता येत नसे. जनमनात त्यांनी असंतोषाचे बीज पेरले हेच त्यांचे महत्त्वाचे देशकार्य होय. जो चिरोल साहेबांच्या मते दोष तेच

टिळकांचे आयुष्य-कार्य होय. आणि याच्यावरच सर्व इमारत उठवावयाची असते. गोखल्यांचे काम ' आधी कळस मग पाया रे ' अशा तऱ्हेचे होते ! टिळकांनी पाया तयार केला. पाया जितका भक्कम असेल तितकी भव्य व टोलेजंग इमारत त्यावर उभारता येईल. पाया लहान बेताबाताचा असेल तर लहानशी बंगली बांधली म्हणजे झाले. लोकांच्या आकांक्षा व इच्छा पराकोटीस नेऊन पोचविल्या पाहिजेत. आपल्या देशास स्वतःचा कारभार चालविण्याचे सर्व हक्क पाहिजेत, असे म्हणण्यापर्यंत जनमनाला टिळकांनी ताणले. आणि येवढा ताण बसतो तेव्हाच काही तरी होते. शंभर मार्कांची तयारी करावी, तेव्हां कोठे चाळीस पन्नास मिळतात. लोकांस जर आपणच सांगू लागलो, की सध्या हे दोन हक्क घेऊन तृप्त व्हा. तर मग काय ? **छेः ! छे ! ! अतृप्त राहणे हेच पारतंत्र्यातील राष्ट्रास शिकवावे लागते.** विशेषतः आपल्या राष्ट्रास तर हे शिकविणे फारच अगत्याचे आहे. परदेशात जाऊन काम करणाऱ्यास स्वतःचा देश पाठीशी पाहिजे असतो. तो उभा करण्याचे काम टिळकांनी अंगावर घेतले होते.

काम करण्यासाठी योजावयाच्या या दोघांच्या भाषेतही फरक असे. टिळक अशक्य—त्यांस कदाचित् ते शक्य दिसत असेल तर कोणास ठाऊक ?—असे लिहीत व बोलत. गोखले अशक्य किंवा वावगा एक शब्दही बोलावयाचे नाहीत. हिंदुस्तान रिव्ह्यू म्हणतो :—' It is not the wordy ideals and impossible programmes of men of weak judgement and unrestrained emotion, but the carefully thought out ideas and proposals of powerful intellects and selfless patriots like Mr. Gokhale, whose emotion is restrained by his intellect at the same time that his intellect is tempered by his emotions that have to be deeply pondered over and acted upon by the younger generation among Indian public men. ' गोखल्यांच्या मध्ये विचार व आवेश यांचा रमणीय संगम झाला होता. एकमेकांमुळे एकमेकांस शोभा आली होती. सरकारच्या पुढेही निरनिराळे कार्यक्रम, सूचना गोखले मांडावयाचे. टिळक सडेतोड असत; गोखले सावरून बोलत. याचे कारण स्वभावभेद होय. टिळकांचा स्वभाव तल्लख; संताप व आवेश त्यांच्या अंगात

ताबडतोब संचारत. त्यांच्या आठवणीत अशा अनेक गोष्टी आहेत की जेव्हा सरकारच्या एखाद्या क्रूर कृत्याची हकीकत ते ऐकत तेव्हा चवताळून ' आम-च्यांत जोरच नाही का ? ' असे ताडकन् बोलत. खरोखरच ते सिंह होते. भीती त्यांस शिवतही नसे. दुसऱ्यावर टीका करण्यात सुद्धा त्यांचा असाच स्वभाव होता. ते स्वतः जात्या कठोर व तत्त्वप्रधान होते. तत्त्वज्ञानाने व तर्काने त्यांच्या बुद्धीस काठिन्य व कुशाग्रत्व आलेले होते. त्यामुळे आपल्या जिव्हाळ्याच्या तत्त्वाविरुद्ध कोणी जात आहे असे पाहताच त्यांचा भडका उडे. त्यांस पुष्कळ लोक विचारीत, ' तुम्ही जरा मृदू का नाही लिहीत ! ' त्यावर ' मूल आडवे आले म्हणजे ते कापावे लागते ! ' असे टिळकांचे उत्तर असे. सरकारवर तशीच स्वजनांवर सणसणीत टीका करण्यात ते कधी कसूर करीत नसत. यामुळे पुष्कळांची मने दुखाविली गेली. परंतु टिळक स्वतः या टीकांस वगैरे मनात थारा देत नसत; त्यांचे मन अंतरी निर्विकार असे. त्यांना वाटे टीकेपासून जे शिकावयाचे तेवढे शिकून आपल्याप्रमाणेच इतरही लोक टीका विसरून जात असतील; परंतु साधारण जनांची मने कोवळी असतात. गोखले या बाबतीत टिळकांच्या अगदी विरुद्ध. प्रथम प्रथम त्यांची वाणी जहाल होती. परंतु ' असला फुटाणा उपयोगी नाही; भाषा साधी असून आतील विचार जोरदार असावे ' अशा रानड्यांच्या सांगीवरून त्यांनी फार बोध घेतला. दुसऱ्याचे मन दुखावेल असे ते स्वतः कधी बोलत वा लिहीत नसत. नरसोपंत केळकर यांनी गोखल्यांच्या गुणांचे पुढीलप्रमाणे सुंदर वर्णन केले आहे :—' ॲरिस्टॉटल याच्या व्याख्येप्रमाणे **गोखल्यांच्या गुणांनी अवगुण व गुणातिरेक या दोहोंमधल्या सुवर्णबिंदूचा बरो-बर छेद केलेला होता.** त्यांच्या अंगी धारिष्ट नव्हते, पण धैर्य उत्तम प्रकारचे होते. तीव्र मतभेदपात्रता होती, पण भांडखोरपणा नव्हता. शब्दात गोडी किंबहुना मवाळी होती, परंतु त्यांनी तोंडदेखलेपणा किंवा तोंडपुजे-पणा केल्याचे कोणास माहीत नाही. वस्तुमात्रास होणारा त्यांचा शब्दस्पर्श मृदू होता, पण तत्त्वाला ते कठोर होते. त्यांनी हातात मखमलीचे हातमोजे घातलेसे वाटले तरी त्यांच्या आत वळलेली मूठ लोखंडी किंवा पोलादी असे. ते अत्यंत सुविनीत असत पण कोणासही भिऊन वागत नसत. '

टिळकांमध्ये हा सुवर्णबिंदुच्छेद नव्हता. त्यांचे गुण सर्व धडाडीचे होते.

ते आपल्या धडाक्याने विजेचा लोट उत्पन्न करावयाचे आणि या विजेपासून प्रचंड कार्य करून घ्यावयाचा त्यांचा मानस असे. **टिळकांमध्ये गुणावगुण पराकाष्ठेला पोचलेले होते. क्रांतिकारक लोकांस मध्यबिंदू माहीतच नसतो.** पाऊल पाऊल जाणे त्यांच्या प्रकृतीस मानवत नाही; उड्या मारीत जोराने जावे असेच त्यांस वाटत असते. सर्वसाधारण जनतेस ते विचार करावयास अवसर देत नाहीत आणि जनतेसही चालढकल रुचत नाही. लोकांमध्ये विकार असतात आणि या विकारांस नवीन विचारप्रवर्तक आपल्या कार्यार्थ प्रवृत्त करीत असतात. अशा लोकांपैकीच टिळक होते. टिळक यांचा राज्यकर्त्यांवर थोडासुद्धा भरवसा नव्हता. राज्यकर्ते परकी; स्वतःची तुंबडी भरण्यासाठी आलेले; **कोणीही परकी अधिकारी येवो तो बहुतेक आपल्या वळणावरच जावयाचा** असा त्यांचा सिद्धांत असे. यामुळे या कपटी सरकाराशी आपणही कपटीच बनले पाहिजे; सरकारच्या सर्व कृत्यांकडे डोळ्यांत तेल घालून पाहिले पाहिजे, हे सरकार बंडासारख्या मार्गांनी सुद्धा उलथता आले तरी ते क्षम्य व न्याय्य आहे. अमुक शत्रु ना? मग त्यास चिरडण्यास मागेपुढे पाहू नये. श्रीकृष्णाचा भारतातील उपदेश असाच आहे; शिवाजी, रामदास या सर्वांस असेच वागावे लागले. असे वागावे तेव्हाच दास्यमग्न लोकांचा निभाव लागतो. ज्याच्या अंगात नैतिक व आत्मिक सामर्थ्य रोमरोमात भरलेले आहे असे सर्व राष्ट्र निर्माण होणे शक्य नाही, असे सांगणारे लोक, मानवी स्वभावाचे स्वतःचे अज्ञान मात्र दाखवितात. आशियातील लोकात जेव्हा वीरवृत्ती जोरावेल, तेव्हाच पाश्चात्यांच्या अधिकारलालसेस आळा बसेल. याच्या अगदी उलट नेमस्तांची विचारसरणी होती. आपण आधी स्वतःस सुधारले पाहिजे. ज्या गुणाच्या अभावामुळे आपले राज्य गेले ते गुण पूर्णपणे अंगी बाणल्याविना आपले राष्ट्र स्वत्व टिकवू शकणार नाही. त्याखेरीज बंडासारखे उपाय शक्य नाहीत. आपण संघटना करू या; भ्रातृभाव दाखवू या; उद्योगधंदे, नीतिमत्ता या सर्वांत प्रगती करू या. सरकारास अमुक एक द्या असे सांगताना **जे मिळेल ते राखण्याची व झेपण्याची पात्रता आपल्या अंगात असली पाहिजे.** रानडे, गोखले यांस खरोखरच वाटे की आपल्या लोकांची नैतिक अधोगती झाली आहे. गोखल्यांच्या प्रत्येक व्याख्यानात

या गोष्टीवर जोर असे. रानडे म्हणत, ' Politics is not mere petitioning and memoiralizing for gifts and favours. Gifts and favours are of no value, unless we have deserved the concessions by our own elevations and our own struggles. ' लोकांतील धैर्य, विश्वास, बंधुप्रेम हे सर्व गुण नाहीसे होत चालले असे त्यांस दिसे. तेव्हा प्रथम देशाची नैतिक सुधारणा करू या असे त्यांचे म्हणणे असे. आपल्यास जर दैववशात् सर्व हक्क आज मिळाले तर ते उपभोगण्यास आपण लायक नाही असे त्यांस मनापासून वाटे. तंटे, वैर, विरोध, मत्सर या दुर्गुणांनी आपणांस सर्व बाजूंनी घेरले आहे. आलस्य अद्याप गेले नाही; काम करण्याची हौस उत्पन्न झाली नाही. प्रातिनिधिक संस्थांचे महत्त्व जसे पटावे तसे पटलेले दिसत नाही. हे सर्व आपण नाहीसे केले पाहिजे. टिळक या गोष्टीकडे विशेष लक्ष देत नसत. आधी बाहेरचा दिंडीदरवाजा नीट करू या; मग घरांतल्या भिंतीचा गिलावा वगैरे करण्यास पुष्कळ वेळ आहे; **आधी चोर शिरजोर होणार नाही याची व्यवस्था केली, की मग भावांभावांमधले तंटे मिटवण्यास पुष्कळ सवड आहे.** आपण आपले तंटे मिटवीत असता या चोराने समयानुसार प्रत्येकाचा ' कैपक्ष ' घेऊन दोघांसही भिकारी करणे व आपण त्याच्या कपटाला बळी पडणे हे फार अयोग्य व लाजिरवाणे आहे. आपण अशक्त असलो तरी चोराला दरडाविले पाहिजे असे टिळकांचे मत होते. गोखले म्हणत, ' या दरडावण्याचा काही उपयोग होणार नाही. ' लजपतरायांनी आपल्या एका लेखात म्हटले आहे– ' If you threaten, you must be in a position to carry out the threat. Else it is worse than useless. ' आपल्या पाठीमागे जोर नाही याची गोखल्यांस पूर्ण जाणीव होती. उगीच मोठमोठे विचार मांडण्यात काय अर्थ आहे ? सध्या आपण त्यांस विनंत्या करू. या विनंत्या करीत असताना देशप्रेमाचा खुराक खाऊन धष्टपुष्ट होऊन मग दरडावले तर त्यात काही तरी अर्थ आहे. गोखले सुद्धा मतांनी जहालच होते. नेव्हिन्सन म्हणतो :—
' For himself, I discovered many months afterwards that Mr. Gokhale hated the name of Moderate, as I suppose. all beings of flesh and blood needs must. ' परंतु लोकांची तयारी नाही म्हणून

ते जहाल झाले नाहीत. करबंदी करण्यासारखी चळवळ सुद्धा हाती घेण्यास त्यांनी मागेपुढे पाहिले नसते. परंतु १९२२ साली गांधींस जर बार्डोलीचा कार्यक्रम थांबवावा लागतो तर १९०७ साली गोखल्यांस ते किती अशक्य दिसले असेल ? म्हणून ते लोकांस हळूहळू तात्त्विकरीत्या शिकवीत होते. परंतु जनता विकारवश असते. हा हळूहळूपणा तिला आवडत नाही. तिला त्याचा कंटाळा येतो. तिला चवताळवून मग चुचकारले पाहिजे. टिळकांनी प्रथम चवताळविले, परंतु सावरकरांसारख्या अत्यंत देशभक्तीने प्रेरित झालेल्या रत्नांस आवरण्यासही ते तयार होते. हे त्यांनी आपल्या मतांच्या केलेल्या खुलाशावरून दिसून येईल. सुशिक्षित लोक आणि अशिक्षित लोक यांस कार्यक्षम आणि देशप्रेमी बनविण्यास निरनिराळे मार्ग लागतात. एकच मार्ग सर्वत्र उपयोगी पडत नाही. जो गाढ निजला आहे त्याच्या कानात पाणी घालावे लागते; जो गुंगीत आहे त्याला हलवले, हाका मारल्या की तो जागा होतो. टिळक व गोखले दोघांच्याही बोलण्यात अर्थ आहे. दोघे परस्परपूरक आहेत. प्रत्येक देशात पारतंत्र्याच्या पंकांत पिचत पडलेल्या प्रत्येक राष्ट्रात अशा प्रकारचे दोन पक्ष नेहमी असतात. आयर्लंड, ईजिप्त, कोरिया, या देशांत असे दोन पक्ष आपणास दिसून येतात. एक पक्ष सरकारशी शक्य तितके मिळते घेऊन गोडीगुलाबीने वागणारा असतो. सरकारकडून हळूहळू सुधारणा घडवून आणण्याचे त्याचे ध्येय असते. दुसरा पक्ष प्रखर प्रकृतीचा असतो; निःसत्त्व करू पाहणाऱ्या परकी सरकारचा त्यास संताप येतो. सरकारच्या कृष्ण-कृत्यांवर प्रकाश पाडून लोकांस जागृत करून तो सरकारास बजावतो, लोक प्रक्षुब्ध झाले आहेत, त्यांची मने जर शांत करावयाची असतील तर ताबडतोब त्यांची दुःखे दूर करा. ही दुःखे दूर करण्यासाठी अधिकारी प्रजेच्या हुकमतीखाली पाहिजेत. एकादा अधिकारी वाईट असला तर त्यास हुसकून लावण्याचे सामर्थ्य प्रजेत असले पाहिजे. राजा, राज्य, प्रजेसाठी असते. तेव्हा सरकारने दडपेगिरीचे धोरण जर चालू ठेवले तर लोकांनी स्वस्थ बसू नये; बसता कामा नये. हा आत्मघातकीपणाचा मार्ग आहे. आत्महत्यारा होणे केव्हाही नाशासच नेणार.

दादाभाईंची कामगिरी इंग्लंडमध्ये झाली. रानड्यांनी सुशिक्षितांस हातांशी धरून सर्वांगीण प्रगती व्हावी म्हणून आयुष्य खर्च केले. सर्वत्र

नेमस्तपणा त्यांनी शिकविला. सामाजिक, राजकीय, धार्मिक, कोणतीही बाब असो, त्या त्या बाबतीत लोकांशी आणि सरकारशी तुटकपणे न वागता, परंतु आपली मते व ध्येय सुद्धा न सोडता आस्तेकदम पण चिरस्थायी प्रगती करून घ्यावी असे त्यांच्या शिकवणुकीचे सार आहे. डेक्कन सभा स्थापन करताना तिचे ध्येय त्यांनी अशाच शब्दांत सांगितले आहे. ते लिहितात :–Liberalism and moderation will be the watch-word of this association. The spirit of liberalism implies a freedom from race and creed prejudices and a steady devotion to all. that seeks to do justice between man and man, giving to the rulers the loyalty that is due to the law they are bound to administer, but securing at the same time to the ruled the equality which is their right under the law. Moderation imposes the condition of never vainly aspiring after the impossible or after too remote ideals, but striving each day to take the next step in the order of natural growth by doing the work that lies the nearest to our hands in a spirit of compromise ond fairness." रानड्यांच्या पावलावर पाऊल ठेवून चालणारे गोखले. पण ते मनांतून जहाल होते असेच आम्हांस दिसते. त्यांनी रानड्यांच्याच सनदशीर मार्गाने पुढे पाऊल टाकले. परंतु रानड्यांच्या पेक्षा जास्त मोठ्या प्रमाणात त्यांस राजकीय चळवळ करता आली. मेथा यांनी कौन्सिलात लोकपक्षाच्या पुढाऱ्याने काम कोणत्या पद्धतीने करावे हे शिकविले. नमून न वागता, स्वाभिमानाने व देशहितैक दृष्टीने सरकारच्या बेमुर्वतखोर वर्तनास ताबडतोब जेथल्या तेथे आळा घालण्याचा प्रयत्न करणे आणि सरकारवर टीका करण्यास न भिणे हे गुण लोकप्रतिनिधींच्या अंगात असले पाहिजेत असे मेथांनी स्वतःच्या आचरणाने दाखविले; याच त्यांच्या प्रकारामुळे त्यास कौन्सिलमध्ये 'New Spirit' नवीन जोम उत्पन्न करणारा, नवीन वारे भरणारा, असा सरकारी अधिकाऱ्यांकडून किताब मिळाला. गोखल्यांच्या डोळ्यांसमोर ही मेथांची कौन्सिलमधील चळवळ होती. परंतु मेथांचे कौन्सिलमधील सर्व धोरण गोखल्यांच्या फाजील सरळपणामुळे त्यांस साधले नाही. कौन्सिलमध्ये प्रेस ॲक्टास

गोखल्यांनी संमती दिली. का? तर 'सरकारने जे उतारे दाखविले तशा प्रकारच्या उताऱ्यांविरुद्ध प्रेसॲक्ट असणे हे माझ्या नैतिक बुद्धीस पटले; आणि मला या बिलास विरोध करण्याऐवजी संमती द्यावी लागली,' असे गोखले म्हणाले. मेथांचे धोरण निराळे होते. 'शांतता आणि सुव्यवस्था' राखण्याच्या कामी सरकारी सोंगाला आम्ही मदत करता कामा नये असे त्यांचे म्हणणे असे व गोखले प्रेसॲक्टला संमती देऊन आल्यानंतर त्यांनी गोखल्यांस हेच सांगितले. गोखले व मेथा यांनी कौन्सिलमध्ये उत्तम काम केले. त्यांनी लोकांची तरफदारी केली. मेथा व गोखले यांनी आपल्या तेजस्वी बाण्याने व वाणीच्या व बुद्धीच्या ओजस्वितेने हिंदुस्तानातील सुशिक्षित वर्गामधून, त्याचप्रमाणे कायदेकौन्सिलांतून प्रत्यक्ष अधिकाऱ्यांबरोबर वाग्युद्ध करून, त्यांचे दोष निर्भीडपणे मांडून, निरनिराळे प्रसंग ओळखून, निरनिराळ्या युक्तिवादांनी, कुशलतेने, त्याचप्रमाणे अत्यंत स्पष्ट व जोमदार वृत्तीने लोकजागृतीचे कार्य सतत केले. गोखल्यांच्या राजकारणाला हिंदुस्तानातच नव्हे तर इंग्लंडात व दक्षिण आफ्रिकेत सुद्धा महत्त्व आले होते. गांधींच्या तिकडील चळवळीला दुजोरा देण्यासाठी १९११।१२ साली गोखल्यांनी हिंदुस्तानात मोहीम काढून अवाढव्य फंड जमविला. यावरून ते केवढ्या दर्जाचे व वजनाचे ओजस्वी पुढारी होते हे सर्वांच्या लक्षात येईल.

देशातील सुशिक्षित समाजात जी जागृती रानडे, मेथा, गोखले यांनी केली ती जागृती खेडोपाडी सर्वत्र सामान्य जनांपर्यंत टिळकांनी नेऊन पोचविली "अत्यंत निधड्या छातीचे, बिनचूक अस्त्रांनी सदैव सज्ज, जनतेत स्पष्ट व ठळक राजकीय भावनांचा संचार करणारे, प्रचंड शक्तीचे लोकाग्रणी" असे टिळकांचे वर्णन यथायोग्य होईल. राजकारणामध्ये आपल्या पाठीमागे प्रचंड जनसमूह पाहिजे असल्यामुळे सामाजिक बाबतीत मतभेद पाडणारे प्रश्न बाजूस ठेवून ज्यावर सर्व लोकांचे एकमत होईल असे राजकीय जागृतीचे काम त्यांनी आपल्या शिरावर घेतले. आणि म्हणूनच ते धर्माचे कैवारी गणले गेले. सतरा डगरींवर हात ठेवून कोणतेच काम हात नसते हा चिरंतनचा अनुभव आहे. आणि हे राजकीय हक्कांचे काम हाती घेतांना त्यांनी इतर गोष्टींकडे कानाडोळा केला. ते असेच म्हणत असत की राजकारणाच्या बाबतीत सामाजिक प्रश्न मिसळू नका. सर्व राष्ट्राला राजकार-

णाचे आज जें बंधन आहे तशा प्रकारचे एकाच प्रकारचे बंधन समाजाला नाही. या टिळकांच्या धोरणास सवंग लोकप्रियता असे म्हणतात. परंतु कार्य करून दाखवावयाचे असताना एकाच गोष्टीवर भर द्यावा लागतो; आणि सर्व लोकांचा पाठिंबा मिळवावा लागतो. नाही तर चार सुशिक्षित लोकांची चळवळ असे सरकारास सांगता येते. गोखले जरी समाजसुधारणेस अनुकूल असले तरी त्यांनाही राजकारण सोडून अन्यत्र फार जाता आले नाही हे लक्षात ठेवले पाहिजे.

टिळकांनी सर्व जनतेला जागे करावयाचे काम हाती घेतल्यामुळे जनतेला बरोबर घेऊन त्यांस जावे लागे. 'जनतेला बरोबर घेऊन जातात आणि टिळक लोकच्छंदानुवर्तित्व दाखवितात' असे इतर लोक म्हणतात; परंतु सामाजिक बाबतीत त्यांनी केवळ लोकच्छंदानुवर्तित्व दाखविले याचे कारण राजकीय बाबतीत त्यांना सर्व लोकांस एकत्र पुढे न्यावयाचे होते हे होय. हे काम करीत असतांना लोकांस राजकारण म्हणजे काय, परकी सरकार कसे असते, त्याचे डावपेच कसे असतात, प्रजेस हक्क का पाहिजेत, या हक्कांसाठी आपण समर्थ कसे व कोणच्या उपायाने होऊ, उत्साह, धैर्य, उद्योग, दुर्दमनीय महत्त्वाकांक्षा यांचे सहाय्य:का घेतले पाहिजे, हे सर्व व्याख्यानद्वारा व पत्रद्वारा, ते रोज शिकवीत होते. ग्लॅडस्टनबद्दल हक्स्ले हे पंडित म्हणत की, "Here is a man with the greatest intellect in Europe and yet he debases it by simply following majorities and the crowd." असेच टिळकांविषयी पुष्कळ लोक म्हणताना आपण ऐकतो. परंतु टिळक किंवा ग्लॅडस्टन केवळ लोकमताचे अंधपणे अनुकरण करीत नसत. ग्लॅडस्टन सुद्धा धार्मिक बाबतीत जुन्या परंपरेचा असे. हा जुन्या परंपरेचा अभिमान ग्लॅडस्टन लोकप्रियता संपादन करण्यासाठीच दाखवीत असे, असे कोण सुजाण मनुष्य म्हणेल? टिळकांसही जुन्यापैकी पुष्कळ ग्राह्य असे वाटे, आणि म्हणून ते परंपरेस चिकटून होते. त्यांनी गणपतीपुढील व्याख्यानात अनेक प्रसंगी आपल्या धार्मिक कल्पनांचे समर्थन केले आहे.

टिळकांस लोकांस असंतोष शिकवावा लागला. तुम्ही संतुष्ट कसे असे ते त्वेषाने जनतेला विचारीत. सरकार हे किती जुलमी, निर्दय बनले आहे पाहा असे सांगून ते सरकारची व या राज्ययंत्राची नामुष्की करीत, नाचक्की

करीत. अर्थात् या गोष्टीमुळे टिळकांवर सरकारचा रोष होई. मवाळांस ते काँग्रेसमध्ये नकोत असे वाटे; कारण आपणांवरील सरकारचा विश्वास उडेल असे त्यांस वाटे. मेथा या मवाळाग्रणीने एकदा बामणगावकरप्रभृती वऱ्हाडप्रांतीय मंडळी त्यांस भेटावयास गेली असता त्यांस टिळकांपासून आपण दूर का राहत होतो यातील इंगित सांगितले. "तुमचे पुढारीपण स्वीकारावयाला टिळकच लायक, मी नाही; सुखाला सर्वस्वी दूर लोटून देशसेवा करण्याइतके तेज आमच्या अंगात नाही हे मी कबूल करतो. असे जरी आहे, तरी देशसेवा घडावी अशी माझी इच्छा आहे. टिळकांसारखे लोक धैर्याने व त्यागाने परिस्थिती निर्माण करू शकतात. तर आम्ही लोक त्या परिस्थितीचा फायदा देशाच्या पदरात टाकतो. अशा रीतीने टिळकांचे व आमचे परिणामाच्या दृष्टीने सहकार्य सहज घडते. टिळकांनी निर्माण केलेल्या परिस्थितीचा फायदा राष्ट्राच्या पदरात आम्हास टाकता यावा म्हणूनच काँग्रेसही आम्हास पाहिजे. आम्ही ती टिळकांस देणार नाही. काँग्रेस जर आम्हांस नसली तर आमच्या अस्तित्वाला वाव नाही व आमच्यासारख्या सुखेच्छू पण देशाभिमानी लोकांचा राष्ट्रालाही फायदा होणार नाही." या मेथांच्या उत्तरावर त्यांस विचारण्यात आले, 'तुम्ही टिळकांस काँग्रेसबाह्य करता यामुळे सरकारला त्यांस चिरडण्याची संधी मिळते.' याचे उत्तर देताना मेथा म्हणाले, "आम्ही टिळकांना काँग्रेसबाहेर ठेवतो म्हणून सरकार त्यांच्यावर कायद्याचे हत्यार उचलते ही गोष्ट सर्वस्वी चुकीची आहे असे मी म्हणत नाही. पण अशा प्रसंगी आम्ही सरकाराला मदत करता कामा नये. सरकारच्या दडपशाहीचे लोकांवर परिणाम होऊन प्रसंगी लोक तीव्र स्वरूप प्रकट करितात, ते नाहीसे व्हावे म्हणून आम्ही प्रयत्न करू लागलो, तर त्या प्रयत्नात आमच्या बरोबर सर्वस्वाचा नाश आहे. राजनिष्ठा व्यक्त करणे, टिळकांजवळून दूर राहणे, त्यांचे व आमचे पटत नाही असे तीव्रतेने सरकारास भासविणे आणि आमचे म्हणणे सरकार मान्य करीत नाही म्हणून टिळकांचे विनाशक असे राजकारणाचे धोरण लोकप्रिय होते असे उठल्याबसल्या सरकारच्या कानीकपाळी ओरडणे येवढेच आमचे धोरण. हे धोरण जर आमच्याकडून शिस्तीने अमलात आले तर टिळकांना दडपून टाकण्याचे पाप करावयाला सरकारही धजणार

नाही. अशा रीतीने एकाने परिस्थिती निर्माण करावयाची व दुसऱ्याने तिच्यापासून निघेल तितका फायदा घ्यावयाचा असे झाले, तर देशाचे हित होईल." या मेथांच्या उत्तरावरून टिळकांच्या कार्याचे महत्त्व लोकांस पटेल. ना. गोखल्यांस कौन्सिलमध्ये "परिस्थिती बिकट आहे; लोकांची मने विथरत आहेत; ब्रिटिश राज्यपद्धतीवरचा विश्वास समूळ उडत चालला आहे; वेळीच शहाणे होऊन जनतेस हक्क द्या." असे कशाच्या जोरावर सांगता येत असे! इंग्लंडात जाऊन जनतेच्या प्रक्षुब्धतेची हकीकत वर्णन करीत असताना कशाच्या पायावर, कशाच्या जोरावर गोखले हे बोलत असतां? टिळकांनी व त्यांच्या पक्षाने निर्माण केलेल्या असंतोषाच्या परिस्थितीमुळेच की नाही? हा असंतोष जर जनतेत नसता; तर गोखल्यांच्या म्हणण्यास सरकारने काडीइतकेही महत्त्व दिले नसते. दुसरा जेव्हा चार पावले पुढे जात आहे असे सरकार पाहील तेव्हा ते एकच पाऊल पुढे जाऊ असे म्हणणाऱ्या पक्षाच्या मागून येईल. राष्ट्रीय पक्ष होता, म्हणून नेमस्त पक्षास आपले मागणे मागण्यासाठी तोंड उघडावयास तरी जागा होती. तोंड उघडण्यासारखी परिस्थिती ज्याने निर्माण केली, ज्याने या परिस्थितिनिर्मितीनिमित्त गणपति-समारंभात होणारी प्रवचने व व्याख्याने, शिवजयंत्युत्सवप्रसंगींची व्याख्याने, निरनिराळ्या वर्तमानपत्रांतून आणि विश्ववृत्तासारख्या मासिकातून येणारे लेख या सर्वांचे सूर जुळते करण्याचे व्यापक कार्य कुशल तानसेनाप्रमाणे अविच्छिन्न चालविले, बंगालमधील अरविंद, बिपिन बाबू अश्विनीकुमार यांसारख्या तडफदार व देशप्रेमाने भरून गेलेल्या तरुणांनी निर्माण केलेल्या पक्षाची महाराष्ट्रीय पक्षाशी संगती जुळवून, नवीन जोमाचा राष्ट्रीय पक्ष निर्माण केला, त्यांनी काहीच विधायक काम केले नाही असे म्हणणे म्हणजे असमंजसपणा आहे. एखादी संस्था निर्माण करणे, किंवा एखादा कर कमी करून घेणे म्हणजेच विधायक काम असेल तर कोणास माहीत? स्वतंत्र संस्था न स्थापण्याचे कारण टिळकांनी सांगितलेले त्यांच्या आठवणीत आहे. ते म्हणतात, 'संस्था स्थापिली जाते, परंतु तदनंतर काही दिवसांनी परंपरा राखली जात नाही. ते काम नेटाने व स्वार्थत्यागपूर्वक होत नाही. केवळ नावाला संस्था राहते. समर्थांच्या मागून त्यांची गादी आहे. परंतु एखादा

तरी कर्ता माणूस निघाला काय? **शंकराचार्यांच्या पीठाची तीच रड. तेव्हा हे पाहून संस्था वगैरे स्थापण्यावर माझा विश्वास नाही.**' टिळकांच्या या म्हणण्यात खोल अर्थ आहे. व त्याचा त्यांच्यावर टीका करणारांनी विचार करावा. पुढे संस्था निकामी होतील म्हणून निर्माणच न करणे हे अव्यवहार्य आहे असेही पुष्कळ म्हणतील. परंतु टिळकांची वरील विचारसरणी जी आहे ती हिंदुस्तानात तरी कठोर असली तथापि सत्य आहे. या संस्था इकडे जोमाने का चालत नाहीत याचे एक कारण त्या वंशपरंपरागत असतात किंवा गुरु आवडत्या शिष्यास अधिकार देतो हे होय. संस्था लोकामतानुवर्ती असाव्या; त्यांस घटना असावी. म्हणजे पाश्चात्य देशात संस्था टिकतात तशा आपणाकडेही टिकतील, यात शंका नाही. रा. ब. महाजनी म्हणतात 'रामदासांनी आपले कार्य आपल्या मागे चालविण्याकरिता हिंदुस्तानभर मठांचे जाळे पसरून त्या त्या ठिकाणी महंतांची स्थापना केली. ही योजना स्वामींच्या कल्पकतेची साक्ष देते, तशी त्यांच्या दीर्घदृष्टीची देत नाही, हे कष्टाने कबूल करावे लागते.' टिळकांना दीर्घदृष्टी होती असे म्हणणे यावरून सहजच प्राप्त होते. पुस्तकांचा, रिपोर्टांचा, व साधनांचा संग्रह टिळकांनीही केला. 'पण ही साधनसमृद्धी बाह्य उपकरण-समृद्धी होय. ती दृढ व्यासंगाने मनात रुजविली पाहिजे, आपलीशी केली पाहिजे. इतके झाल्या-वरही विवेकानंद ज्यास देशभक्तीची दुसरी पायरी समजतात, ती उपाय-योजना, अभेद्य किल्लेकोट उभारण्याची हातोटी, हे कौशल्य 'देणे ईश्वराचे' असेच म्हणणे प्राप्त आहे. ओढून ताणून हे येत नसते. बांधली शिदोरी किती काळ पुरणार?

या विवेचनावरून टिळक, 'संस्था–संस्थापक' नव्हते म्हणून त्यांस कितपत लघुत्व द्यावे हे सुज्ञ वाचकांनी आपल्या मनाशी ठरवावे. टिळकांमध्ये व्यावहारिक शहाणपणाही होता. अरविंद घोष, लजपतराय, बिपिनचंद्र पाल या सर्वांपेक्षा तडफ, चिकाटी, व्यावहारिक शहाणपणा, बुद्धीचा खोलपणा आणि निश्चितपणा, व केवळ उचंबळलेल्या मनोवृत्तींबरोबर वाहत न जाता त्या मनोवृत्ती कार्यक्षम करून घेण्याचे सामर्थ्य, हे गुण टिळकात जास्त असल्यामुळे साहजिकपणेंच जहाल पक्षाचे नेतृत्व त्यांच्याकडे आले.

ते तुरुंगात गेल्यावर राष्ट्रीय पक्ष कसा विस्कळित झाला, आणि तुरुंगातून आल्याबरोबर पुनः जोमाचा संघटित पक्ष त्यांनी कसा उभा केला हे पाहिले म्हणजे संघटनाचातुर्य त्यांच्यात होते हे निःसंशय ठरते.

टिळकांचे व्यवहारचातुर्यही ते सुटून आल्यावर दिसून आले. ' परिस्थिती ओळखून तिच्यापासून फायदा करून घेणे हा गुण टिळकात नव्हता असे मेथा म्हणत. ' परंतु ते जर याही गुणाने युक्त असते तर मग त्यांस पूर्ण पुरुष म्हटले असते ' असे ते गौरवाने म्हणत. दुर्दैवाने मेथाहि जगले नाहीत. टिळक कैदेतून सुटून आल्यावर त्यांनी परिस्थितीचे सिंहावलोकन केले. आपल्या व्यापक बुद्धीने त्यांनी सर्व रागरंग तानमान जाणले; चवली किंमतीच्या मोर्लेमिंटो सुधारणा मिळाल्यामुळे आशेस जागा आहे असे त्यांनी स्पष्टपणे म्हटले. ' लढाईत सरकारास मदत करा; राजनिष्ठ राहा. सरकारने जर आम्हास मानाने वागविले व हिंदी सैनिकांस योग्य जागा दिल्या तर मी हजार सैनिक मिळवून देतो ' असे त्यांनी जाहीर आव्हान दिले; कारण सरकारची नड ती आपल्या फायद्याची गोष्ट हे त्यांस पक्के पक्के माहीत होते. या वेळेस सरकारास मदत करू तर मग वाटेल ते हक्क मागण्यास आपणास हक्क आहे; मग सरकारला आपणांस अराजक असे नाव ठेवता येणार नाही असा त्यांनी कयास बांधला. ते विलायतेस गेले. फ्रान्समध्ये सर्व राष्ट्रांच्या पुढे त्यांनी आपल्या देशाचा अर्ज पाठविला. सुधारणा पदरात घेऊन कौन्सिलात शिरून ती लोकहितास कशी जाचक आहे, प्रत्यक्ष फायदा त्यामुळे काहीच कसा होणार नाही हे सरकारास व जगास दाखवून उरलेल्या चवदा आण्यांसाठी झटण्याची त्यांची योजना पाहून परिस्थितीचे यथार्थ आकलन त्यांस कसे करता येई व परिस्थित्यनुरूप मार्ग ते कसा कसा आखीत हे स्पष्ट दिसते. परिस्थितीप्रमाणे मार्ग आखणे म्हणजे पगडी बदलणे असेही पुष्कळ म्हणतील, परंतु मुत्सद्द्यांमध्ये हा प्रमुख गुण समजला जातो. दुसरा एक दोषारोप टिळकांवर करण्यात येतो तो हा की, ते नवीन कल्पनांचे प्रवर्तक नव्हते. दुसऱ्यांच्या कल्पना घेऊन मग त्यांवर ते आपली तहान भागवीत. होमरूलची चळवळ बेझंट बाईंनी सुरू केली; स्वदेशी, बहिष्कार, या चळवळी बंगाल्यात निघाल्या; परंतु त्या चळवळी सर्व देशभर कोणी पसरविल्या ? टिळकांनी. केवळ कल्पना काढणारा मनुष्य आणि ती कल्पना आपलीशी करून ती सर्वांच्या हृदयात ओतणे,

त्या कल्पनेचा लोकांस ध्यास लावणे, ही करामत करून दाखविणारा पुरुष यात महत्त्वाच्या व तादृश फायद्याच्या दृष्टीने दुसऱ्याचेच गौरव केले पाहिजे. एकादी गोष्ट टिळकांनी उचलली की तिचा चारी दिशांत दुमदुमाट व्हावयाचाच. तिच्यासाठी ते पैशाकडे, प्रकृतीकडे पाहावयाचे नाहीत, की कोणाशी झगडावयास डगमगावयाचे नाहीत. पिकेटिंग घेतले तरी त्यात सुद्धा त्यांनी एक प्रकारचे तेज आणले. तेव्हा टिळक केवळ कल्पनाप्रसू नसले तरी या कल्पनांस बाळसे आणून ते त्या वाढीस लावीत. 'स्वराज्य' हा दादाभाईंनी उच्चारलेला शब्द प्रत्येकाच्या जिव्हाग्री टिळकांनीच नाचावयास लावला. हा जो त्यांनी स्वराज्याचा विचार सर्वत्र फैलावला त्याचेच सर्वांत महत्त्व आहे. नवीन विचारांच्या साम्राज्यालाच सरकार जास्त भिते. रसेल हा तत्त्वज्ञ म्हणतो—'Men fear thought as they fear nothing else on earth–more than ruin, more even than death.' नवीन विचारांची लोकांस प्रथम फार भीती वाटते. स्वराज्य हा शब्द उच्चारावयास आपण पूर्वी भीत होतो, लोकांची ही भीती टिळकांनी घालविली. परंतु जो जो लोकांची भीती नाहीशी होईल तो तो सरकारची वाढत जाईल. त्याला या नवीन कल्पना आत्महानिकारकच वाटतात. नवीन विचारांचे साम्राज्य सर्वत्र करण्यात टिळकांनी अत्यंत धडाडी दाखविली यात शंका नाही. गोडीगुलाबीचे काम टिळकांस व्हावयाचे नाही. यामुळे ते साम्राज्याचे मुत्सद्दी झाले नसते. शांततेच्या काळात गोखले होममेंबर झाले असते; परंतु टिळक आपल्या तत्त्वज्ञानाच्या किंवा गणिताच्या प्रश्नातच गढून गेले असते. आर्किमिडीज हा शास्त्रज्ञ आपल्या देशासाठी लढला; परंतु लढाई संपल्यावर समुद्रकिनारी भूमितीचे सिद्धांत सोडवीत बसला. 'टिळकांनी गेल्या शतकात राज्य कमाविले असते' असे गोखले म्हणत. त्याचप्रमाणे आम्ही म्हणतो, टिळक हे शंकराचार्यांच्या वेळेस जन्मते तर जगद्विख्यात आचार्य झाले असते. कोणत्याही शतकात ते चमकलेच असते. कारण त्यांची बुद्धिमत्ता सर्वंकष होती. हिंदुधर्माचा अभिमानी, तत्त्वज्ञानात रंगलेला कर्मयोगी, संकटांस न डगमगणारा अतुल पराक्रमी वीर, लोकांस, सर्व लोकांस—केवळ सुशिक्षितांसच नव्हे—बरोबर घेऊन त्यांस राजकारणातील मर्मे समजावून देत देत पुढे मोहीम करणारा हा सेनानायक,

स्वार्थत्यागात पहिला, खासगी आचरणात धुतल्या तांदळासारखा हा पुरुष लोकांच्या गळ्यांतील ताईत झाला तर त्याबद्दल 'ते केवळ लोकच्छंदानुवर्ती' म्हणून असे झाले, असे म्हणणे आमच्या जिवावर येते. 'लोकांस कवाईत येईपर्यंत क्लाइव्ह थांबता तर अर्काटचा वेढा इतिहासात लिहिलाच गेला नसता. दरमजल कूच करीत करीत तो त्यांस वाटेत कवाईत शिकवीत होता. आणि आपल्या अगाध धैर्याने त्याने त्यांच्यात वीरवृत्ती व मरणाची बेपर्वाई निर्माण केली. तसेच टिळकांनी केले. ते लोकांची सर्वतः सुधारणा होण्याची वाट पाहत बसले नाहीत. मजबरोबर चला, वाटेत तत्त्वज्ञान, राजकारण सर्व मी तुम्हांस सांगतो असे ते म्हणावयाचे.

गोखले मनमिळाऊ म्हणूनच त्यांस साम्राज्यातील मुत्सद्दी होता आले. आपल्या म्हणण्याचा दुसऱ्याने विचार केलाच पाहिजे, अशा तऱ्हेने ते बोलत. राजकारणकला त्यांना पूर्ण अवगत होती. कलेमध्ये कोणते घ्यावयाचे यापेक्षा कोणते वगळावयाचे हे समजण्यास जास्त कौशल्य लागते. ( An artist is known by what he omits ). एकाद्याचे सुंदर चित्र काढावयाचे असल्यास त्याच्यातील कोणता भाग गाळून कोणता उठावदार दाखवावा, यातच चित्रकाराचे कौशल्य असते. गोखल्याविषयी 'He was a political artist in the best and highest sense of the term.' असे जे म्हणतात ते अगदी खरे आहे. दक्षिण आफ्रिकेत असता हा गुण त्यांनी उत्तमपणे दाखविला. आपल्या राष्ट्राचा पंगूपणा दाखविण्याऐवजी परक्यापुढे ते हिंदुस्थानातील जागृती, नवीन राष्ट्रीय भावना, वगैरेचा उच्चार करून त्यास नवीन गोष्टी करण्यासाठी उद्युक्त करीत. याप्रमाणेच ते योग्य संधी फुकट दवडीत नसत. त्यांस सर्वांनी 'Opportunist' हे विशेषण लाविले आहे. जेवढे मिळेल तेवढे घ्यावयाचे हा त्यांचा बाणा असे. जरी १९०९ च्या सुधारणा अगदी अपुऱ्या होत्या, तरी ते म्हणत होते :– "Just now it is the duty of all to make the best of what they have got. There is no alternative to British Rule." ब्रिटिश सत्तेशिवाय गत्यंतर नसल्यामुळे जी जी परिस्थिती येईल तिचा चांगला उपयोग करून घ्यावयाचा हा त्यांचा बाणा असे. त्यांच्या या गुणामुळे पुष्कळ जण त्यांच्यावर सरकारची हांजी

एखाद्या 'सतीच्या वाणासारखे' त्यांनी मिरविले व त्यांच्या आपदांनी त्यांस जनतेने आपल्या हृदयात मनोमय पुष्पांनी पूजले आहे. यासाठीच गोखले म्हणाले की 'स्वतः सोसलेल्या अनंत यातनांनी त्यांनी देशाची सेवा बजाविली. त्यांना आम्हांस दरडावण्याचा पूर्ण अधिकार आहे.'

टिळकांना आपले कार्य करताना चिकाटी, मनोधैर्य, बुद्धिमत्ता ही दाखवावी लागलीच; परंतु त्यांच्या जोडीला बेमुर्वतपणा, बेदरकार वृत्ती, डावपेच, लपंडाव, अंतःकरणाचा कठोरपणा, प्रतिस्पर्ध्यास चीत करण्याची प्रवृत्ती या वृत्तींचाही त्यांस आश्रय करावा लागला. या बाबतीत गोखले व गांधी निराळे उमटून पडतात. गोखले राजकारणात अत्यंत सरळ ! त्यांस डावपेचांची माहितीच नव्हती ! ! ते राजकारणातले साधू होते ! ! ! हिंदुस्थान रिव्ह्यू म्हणतो :– 'A selfless man and stainless gentleman wise in counsel and vigorous in action, the Honourable Mr. Gokhale has raised patriotism to the dignity of religion in India, as they have so splendidly succeeded in doing in Japan, and his words, therefore, carry a weight which does not attach to the utterances of many other public men.' गांधींनी गोखल्यांचाच संदेश सांगितला. तो हाच की :–'We must spiritualize politics.' विसाव्या शतकात प्रेसिडेंट वुड्रोसनसारखे सरळ व थोरवृत्तीचे पुरुष मागे पडून लॉइड जॉर्ज, पॉंकारे यांसारखे कारस्थानपटूच आपणांस पुढे आलेले दिसतात. प्रत्यक्ष गोखल्यांच्या हातावर बोथांनी जरी तुरी दिल्या तरी त्यांस मात्र असे वाटले नाही की आपणही तसेच व्हावे. 'ठकासी व्हावे ठक । उद्धटासी उद्धट'–हे तत्त्व त्यांस आवडत नसे; त्यांच्या वृत्तीस ते रुचत नसे, त्यांस ते सहन होत नसे. 'वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा' असे जरी चाणक्याच्या अनुयायांस वाटले तरी आपणही तसेच होणे अनुचित होईल, असे त्यास वाटे. या दोघांची–गोखले–गांधींची राजकारणातली दृष्टी अध्यात्मपर आहे. टिळक व्यवहाराकडे जास्त पाहणारे होते. वास्तविक दोन्ही प्रवृत्तींचा येथेही मिलाफ पाहिजे. सर्व जनतेच्या हिताकरिता लफंग्याशी लपंडाव केला तरी पुष्कळांचे पुष्कळ हित या न्यायाने ते क्षम्य आहे असे टिळक मानीत. गोखले–गांधी यांस स्वराज्यापेक्षा सत्य प्यारे तर टिळकांस सत्य व

एखाद्या ' सतीच्या वाणासारखे ' त्यांनी मिरविले व त्यांच्या आपदांनी त्यांस जनतेने आपल्या हृदयात मनोमय पुष्पांनी पूजले आहे. यासाठीच गोखले म्हणाले की ' स्वतः सोसलेल्या अनंत यातनांनी त्यांनी देशाची सेवा बजाविली. त्यांना आम्हांस दरडावण्याचा पूर्ण अधिकार आहे. '

टिळकांना आपले कार्य करताना चिकाटी, मनोधैर्य, बुद्धिमत्ता ही दाखवावी लागलीच; परंतु त्यांच्या जोडीला बेमुर्वतपणा, बेदरकार वृत्ती, डावपेच, लपंडाव, अंतःकरणाचा कठोरपणा, प्रतिस्पर्ध्यास चीत करण्याची प्रवृत्ती या वृत्तींचाही त्यांस आश्रय करावा लागला. या बाबतीत गोखले व गांधी निराळे उमटून पडतात. गोखले राजकारणात अत्यंत सरळ ! त्यांस डावपेचांची माहितीच नव्हती ! ! ते राजकारणातले साधू होते ! ! ! हिंदुस्थान रिव्ह्यू म्हणतो :– ' A selfless man and stainless gentleman wise in counsel and vigorous in action, the Honourable Mr. Gokhale has raised patriotism to the dignity of religion in India, as they have so splendidly succeeded in doing in Japan, and his words, therefore, carry a weight which does not attach to the utterances of many other public men. ' गांधींनी गोखल्यांचाच संदेश सांगितला. तो हाच की :–' We must spiritualize politics. ' विसाव्या शतकात प्रेसिडेंट वुइल्सनसारखे सरळ व थोरवृत्तीचे पुरुष मागे पडून लॉइड जॉर्ज, पॉंकारे यांसारखे कारस्थानपटूच आपणांस पुढे आलेले दिसतात. प्रत्यक्ष गोखल्यांच्या हातावर बोथांनी जरी तुरी दिल्या तरी त्यांस मात्र असे वाटले नाही की आपणही तसेच व्हावे. ' ठकासी व्हावे ठक । उद्धटासी उद्धट '–हे तत्त्व त्यांस आवडत नसे; त्यांच्या वृत्तीस ते रुचत नसे, त्यांस ते सहन होत नसे. ' वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा ' असे जरी चाणक्याच्या अनुयायांस वाटले तरी आपणही तसेच होणे अनुचित होईल, असे त्यास वाटे. या दोघांची–गोखले–गांधींची राजकारणातली दृष्टी अध्यात्मपर आहे. टिळक व्यवहाराकडे जास्त पाहणारे होते. वास्तविक दोन्ही प्रवृत्तींचा येथेही मिलाफ पाहिजे. सर्व जनतेच्या हिताकरिता लफंग्याशी लपंडाव केला तरी पुष्कळांचे पुष्कळ हित या न्यायाने ते क्षम्य आहे असे टिळक मानीत. गोखले–गांधी यांस स्वराज्यापेक्षा सत्य प्यारे तर टिळकांस सत्य व

असत्य केवळ सापेक्ष वाटत. तत्त्वज्ञान्यास हा सत्यासत्याचा भेद पोरकटच वाटणार. कारण या दोन्हींच्याहीवर तो तरंगत असतो. टिळक हे तत्त्वज्ञ होते. गांधी व गोखले साधू आहेत. हा स्वभावभेद आहे. हा संस्कृतीचा, शिक्षणाचा, कित्येक संस्कारांचा परिणाम आहे. सारांश काय, गोखले व टिळक हे परस्पर–पूरक होते, काहीच नको असे म्हणणाऱ्यांपेक्षा गोखले पुढे होते. केवळ स्वातंत्र्यवाद्यांच्या म्हणण्यापेक्षा टिळक थोडे अलीकडे होते. टिळकांनी केवळ स्वातंत्र्यवादी लोकांस मार्गावर आणिले. तर केवळ आहे ते ठीक आहे असे म्हणणाऱ्यांहून गोखलेपक्षाने पुढे उडी मारली. टिळक पक्षामुळे गोखले पक्षास सरकारशी झगडता आले; टिळकपक्षाचा बाऊ दाखवून त्यांस सरकारास धाक दाखविता येत असे. निधनकालापर्यंत दोघेही एकाच ध्येयासाठी झगडले; एकाच कार्यात रंगले. अनेक संकटे सोसून, इच्छाशक्तीच्या जोरावर, देशाच्या दशदिशांत, लहानांपासून थोरांपर्यंत, राजकीय हक्कांविषयी, आपल्या साध्याविषयी व त्यासाठी कराव्या लागणाऱ्या स्वार्थत्यागाविषयी लोकमान्यांनी न भूतो न भविष्यति अशी खळबळ केली. सर्व जनतेत राजकीय आकांक्षा स्थूलमानाने उत्पन्न करणाऱ्यांत टिळक हेच पहिले आहेत. सर्वसाधारण लोकांत त्यांच्याप्रमाणे जागृती अन्य कोणी केली नाही. लोकांसही टिळकांविषयी आपलेपणा वाटे. त्यांच्या झेंड्याखाली असताना, कराल काळाचीही भीती कोणास वाटत नसे. कारण टिळकांनी एकदा ज्यास आपले म्हटले त्यास ते कधीही सोडावयाचे नाहीत.

टिळकांची ही कामगिरी चालू असता येथील सुशिक्षित लोकांत व इंग्लंडात गोखल्यांनी चळवळ केली. हिंदुस्तानास हक्क द्या, लोक अधीर आहेत, असे त्यांनी सांगितले. गोखल्यांनी आपल्या पाठीमागे काम करणाऱ्यांस मार्ग दाखवून ठेवला आहे. टिळकांचा संस्थांवर विश्वास नव्हता. परंतु हे खरे की कर्तबगार लोकांच्या धुरीणत्वाखाली संस्था नीट चालविल्या, वंशपरंपरा–रामदासी गादीप्रमाणे–केल्या नाहीत तर त्या कार्यक्षम होतात. निरनिराळ्या संस्था पुढाऱ्यांस पाठिंबा देतात. गोखल्यांनी ही व्यवस्था भारतसेवक समाज काढून केली आहे. त्यांनी दिशा दाखविली आहे. निःस्वार्थतेचा धडा स्वतः सोडवून दाखविला आहे. व्ही. कृष्णशास्त्री आयंगार यांनी एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे 'Great ideas create peoples, enlarge

the horizen of the peoples, liberate their conscience from the materialism by which it is weighed down, set a vast mission before them, and rebaptise them. ' गोखल्यांनी कार्य केले. स्वतःच्या लोकोत्तर उदाहरणाने 'आधी केले मग सांगितले' याप्रमाणे ते वागले. त्यांच्या कामाची मुख्य दिशा आता लोकशिक्षण ही होती. ते कौन्सिल सोडून आता लोकशिक्षणाकडे सर्व आयुष्य खर्च करणार होते. लाला लजपतराय यांनी देशात काय केले पाहिजे, लोकांस काय पाहिजे, पुढाऱ्याने कशावर प्रयत्नांची झोड उठविली पाहिजे हे सांगतना लिहिले आहे:—'The position thus analysed resolves itself into an educational problem. View it from whatever point you choose, religious, moral, intellectual, social or industrial, the question of Indian progress is a question of education. This is, so to say, the question of questions upon the right solution of which hang the destinies of the nation, viz; how to educate the people so as to befit them for the performance of those duties, a proper discharge of which alone can secure for them their right position in the commonwealth. The car is a heavy one and those who care to join in carrying it must be men of strong convictions, indomitable will, irresistible energy and untiring perseverance; they must be men of action and men of honour.' असे लोक तयार होण्यासाठी गोखल्यांनी भारत-सेवक समाज काढला. देशातील सुशिक्षणसंपन्न लोकांपैकी शेकडा दहा तरी लोक—निदान शेकडा एक तरी लोक या आपल्या कामास मिळावे अशी त्यांची इच्छा असे. मॉडर्न रिव्ह्यू म्हणतो:— 'It was his desire that educated Indians should levy a contribution upon themselves not in money but in men for doing the work of the county.' अशा प्रकारच्या तरुणांनी आता पुढे यावे. त्यागाशिवाय भोग नाही हा सृष्टीचा कठोर नियम आहे. त्यागाने पवित्र झालेले मिळविण्यात आनंद आहे. आयते आपल्या पदरात कोणी घालणार नाही. जगात असे उदाहरणच नाही. आणि आयते मिळाले तरी त्यात लज्जत नाही; स्वारस्य नाही; मान

नाही. काळोखातून धडपडत जाऊन जो प्रकाश आपणास मिळतो त्या-वेळचे सौख्य, तो आनंद, काही और आहे. परंतु काळोखातून उजेडात जाण्यासाठी उठले पाहिजे. आपली दरी सोडून बाहेर निघाले पाहिजे. खोलीचे दरवाजे बंद करून बसलो तर अंधार नाहीसा होणार नाही. टिळक व गोखले यांनी आपआपल्या परीने शक्य तितके देशकार्य केले. आता जबाबदारी आपणांवर आली आहे.

परिस्थितीप्रमाणे मार्ग आखले पाहिजेत. आज एकंदर जगात फारच प्रचंड, अतर्क्य, अशा घडामोडी झाल्या आहेत. लढाईमुळे तर एकंदर जगात फारच क्रांती घडून येत आहे. जुने मार्ग लोपत चालले आहेत. लढाई, अत्याचार यांनी यापुढे कार्य न होता, एकोप्याने, राष्ट्रसंघापुढे आपआपली गाऱ्हाणी मांडून प्रश्न सोडवावे लागतील. टिळकांससुद्धा अत्याचार मान्य नसत हे ‘ सरला राणी चौधरी ’ यांनी आपल्या टिळ-कांच्या आठवणीत दिले आहे. परंतु सर्वराष्ट्रीय बंड पुकारले तर ते त्यास पसंत होते एवढेच नव्हे तर ते त्याचे सेनापती झाले असते. ‘ An empire which has been conquered by the sword and by breaking every commandment cannot be retained by the sermon. ’ असे इल्बर्ट बिलाच्या वेळेस १८८५ मध्ये लंडन टाइम्सने लिहिले होते ते सत्य आहे. इंग्रज सरकारची वृत्ती यामुळे आपल्याकडे कशा प्रकारची राहील हे उघड दिसते. परंतु आपण भावी परिणामावर दृष्टी ठेवून वागू या. उशीर लागला तरी चालेल;परंतु शाश्वत मार्गाने चला असे गांधी वगैरे महात्मे आता सांगू लागले आहेत. अर्थात परिस्थिती, काळ कदाचित हे सर्व अनुकर-णीय, व्यवहार्य ठरवील. परंतु तत्त्वाचा मोठेपणा त्यामुळे नाहीसा होत नाही. तथापि जे तरवारीने मिळविले ते तरवारीने राखावे लागते, या तत्त्वाच्या योगाने जगात कायमची शांतता नांदणे अशक्य होईल. दिवसेंदिवस लोकमतास मान मिळत चालला आहे. सरदार, दरकदार, भांडवलवाले मोठमोठे कारखान-दार जे पैसे पुरवून सरकारास इभ्रतीसाठी, भांडवलासाठी, व्यापाराच्या संर-क्षणासाठी लढाईस उद्युक्त करतात आणि नाहक इतर साधारण लोकांचे प्राण घेतात, अशा लोकांस राष्ट्रात दिवसेंदिवस कमी वर्चस्व मिळत जाणार. तेव्हा लढायांनी हक्क मिळविण्याचे मार्ग दिवसेंदिवस कमी होत

जाणार. लॉईड जॉर्ज म्हणतात, " There are times in history when this world spins so leisurely along its destined course that it seems for centuries at a standstill. There are also times when it rushes along at a giddy space covering the track of centuries in a year. There are such times. Six weeks ago Russia was an autocracy. She is now one of the most advanced democracies in the world. " लोकमत तयार करून त्याच्या जोरावर आपले हक्क प्रस्थापित करण्याचा समय आता आला आहे. गोखले व टिळक यांच्या संमिश्रणाने आपला मार्ग आता आखावयाचा आहे. लोकमत तयार करावयाचे आणि राष्ट्रसंघापुढे मांडावयाचे. खुद्द गोखले यांनी मृत्युसमयी जो सुधारणांचा मसुदा तयार केला होता तो त्यांस लढाईमुळे होणारी विचारक्रांती पाहून बदलावा लागला असता. ना. आगाखान हे गोखल्यांचे स्नेही; त्यांनी १९१७ आगस्टमध्ये हा मसुदा प्रसिद्ध केला ही चूक झाली. कारण गोखल्यांनी त्या वेळच्या परिस्थितीचे तानमान पाहून जे लिहिले ते मॉटेग्यु सुधारणांच्या वेळी प्रसिद्ध करणे ही घोडचूक होय. कारण जे द्यावयास नको त्यासाठी सरकारास गोखल्यांच्या मसुद्यात पुरावा सापडणार आणि भाषावार प्रांतरचनेसारखी जी मागणी गोखल्यांनी लिहिली तिकडे मात्र सरकार कानाडोळा करणार. या मसुद्यात प्रांतिक स्वायत्तता मागितली आहे ती आपणास कितीशी मिळाली आहे? या बाबतीत सरकार किंचित पुढे गेले आहे खरे. परंतु आपल्या कल्पना लढाईने झालेल्या संक्रमणामुळे फार पुढे गेल्या असल्यामुळे गोखल्यांचे विचार, त्यांच्या मागण्या आता–मवाळासुद्धा फिक्या वाटतील. तेव्हा सरकारच्या मात्र फायद्यासाठी हे पत्रक प्रसिद्ध झाले असे म्हणण्यास हरकत नाही. मॉडर्न रिव्ह्यूने या कृत्यावर टीका केली. तो म्हणतो, ' With all his devotion and statesmanship, Gokhale never was fit to be the non–official dictator of India. ' गोखले जर जगते तर १९१६ मध्ये काँग्रेसने व मॉस्लेमलीगने जो मसुदा तयार केला त्यास त्यांनी संमती दिली असती. कारण खरोखरच विचारांत प्रचंड बदल होत चालला आहे. ज्या गोष्टीने जगातल्या बारीकसारीक राष्ट्रांतही चैतन्य उत्पन्न केले त्याने हिंदुस्तानातही होणारच, इंग्लंडची दृष्टीही निवळली पाहिजे.

कारण बेल्जमच्या स्वातंत्र्याच्या रक्षणासाठी लढणाऱ्या इंग्लंडने हिंदुस्तानास खुशाल डोळे मिटून ऐटीने तुडवावे हे त्यास जगांत खाली मान घालण्यास लावील. गांधींनी तर स्पष्ट म्हटले आहे की जर्मनीने लढाईत जे धोरण स्वीकारले तेच इंग्लंडचे होते. मोठेपणाची फुकटची फुशारकी इंग्लंडला मिरवण्याची जरुरी नाही. जर इंग्लंडला हे खोटे करावयाचे असेल तर आयर्लंड, ईजिप्त, हिंदुस्तान यांसही इंग्लंडने हक्क दिले पाहिजेत. तीस कोटी लोकांस दास्यात ठेवणे हे अघोर पातक आहे. आणि सदैव असे मोठे राष्ट्र दास्यांत राहणारही नाही असे रानड्यांनी म्हटले आहे. ' युद्ध आणि त्यातून सुटका ' या पुस्तकात लॉवेस डिकिन्सन म्हणतो,–' Let no community be coerced under British rule, that wants to be self-governing. We have had the courage though late, to apply this principle to South–Africa and Ireland. There remains our greatest act of courage and wisdom to apply it to India.' इंग्लिश लेखकही असे लिहू लागले आहेत. परंतु लॉइड जॉर्जसारखे मुत्सद्दी मात्र अद्याप सनदी नोकरांस ' लोखंडी चौकटच ' म्हणत आहेत. परंतु ही ' लोखंडी चौकट ' आता भंगून टाकली पाहिजे. या चौकटीतून आता बाहेर आले पाहिजे. आपल्या लोकांनी आता धैर्य दाखविले पाहिजे. सरकार जर जनतेच्या आकांक्षा तृप्त करणार नाही तर दडपेगिरीच्या कायद्यांचा डोंगर रचून देखील क्रांतिकारक चळवळ दडपून टाकता येणार नाही. आपले पुढारी आता जास्त धीट झाले आहेत. एके काळी नेमस्त असणारे नेहरू, मालवीय यांच्यासारखे पुढारी ' अन्याय्य कायदे मोडू ' असे ठासून सरकारास बजावीत आहेत. भर कौन्सिलमध्ये जिनांसारखे तेजस्वी लोक काय सांगत आहेत पाहा : ' ज्याप्रमाणे इंग्लंडांतल्या नागरिकांनी जन्मसिद्ध हक्कांसाठी आपले रक्त सांडले, त्याप्रमाणेच प्रसंग आल्यास मी देखील याच हक्कांपायी आपल्या रक्ताची आहुती देण्यास तयार आहे. ' कौन्सिल लोकनायक सरकारास असे स्पष्ट बजावीत आहेत; धोक्याची सूचना, इशारत देत आहेत. जनतेने त्यांच्या मागे उभे राहावे म्हणून कौंसिलच्या बाहेर राहणाऱ्या लोकांनी टिळकांचे लोकजागृतीचे काम करावे. म्हणजे कौन्सिले व लोक यांच्या जोरावर आपल्या म्हणण्यास सामर्थ्य येईल; दुप्पट जोमाने कार्य होईल. लोकांत संघटना

करणे पाप नव्हे. संघटना म्हणजेच जीव. संघटना सनदशीर आहे, पुण्यकारक आहे. राष्ट्रे संघटना व सहकार्य करण्यासाठीच आहेत असे एलिझाबेथने सोळाव्या शतकात झामोरिनला लिहिले होते. म्हणून ज्या वेळेस सर्व विश्वातील लोक झपाट्याने पुढे जात आहेत, अशा सध्याच्या वेळी आपण जुन्या पुढाऱ्यांच्या मार्गांचे एकत्रीकरण केले पाहिजे. जे पुढारी झाले त्यातील प्रत्येकाने आपआपल्यापरी कामाची शर्थ केली, प्राण दिले, देह झिजविले, कशाकडेही पाहिले नाही; ते आपणा सर्वांस वंदनीय आहेत, पूज्य आहेत, आणि असलेच पाहिजेत. त्यांच्याप्रमाणेच आपणही निश्चयाने काम करावयास लागले पाहिजे. जे आपण हाती घेऊ त्याच्यावर आपला पूर्ण विश्वास पाहिजे. ‘One man with a conviction is equal to ninenty-nine without one’ हे मिल्लचे वाक्य लक्षात ठेवणे जरूर आहे. आपण लोक आणा—शपथा घेतो; परंतु तदनुसार मरेपर्यंत किती वागतात ? आपल्या कार्यावर आपली निष्ठा कोठे असते ? आपण निष्ठा आहे असे दाखवितो आणि आपल्या लोकनायकांस फशी पाडतो. वस्तुतः नेटाने मेहनत करण्याची व स्वार्थत्याग करण्याची बुद्धी आम्हांत रूढ झालेलीच नाही. स्वतः कष्ट न करता, स्वतःच्या पदराला खार न लागता, आयते दुसऱ्याच्या प्रयत्नांनी मिळावे अशी आमची आप्पलपोटेपणाची बुद्धी असते ! आणि म्हणूनच थोडया साधू पुरुषांस जिवापाड मेहनत करावी लागते व त्यापायी ते प्राणासही मुकतात. रामतीर्थ, विवेकानंद, चिपळूणकर, गोखले यांच्या चरित्रांनी आपल्या हृदयाला काडीइतकीही वेदना होत नाही ! होती तर वर दिलेल्या मोहऱ्यांस दुप्पट जोर येता. त्यांचा कार्यभार आपणही शिरावर थोडथोडा घेऊन हलका केला असता. आणि अशा प्रकारे ज्या मोहऱ्यांस आपण आपल्या चेंगटपणामुळे अंतरलो, ते आपणांस मार्ग दाखविण्यास आज वावरते व आपल्या अडचणी सोडविते. आज म. गांधी हजारो सभांतून जे सांगत आले ते आपण करीत नाही. यासाठीच त्यांना एकवीस दिवसांचे प्रायोपवेशन स्वीकारावे लागले. अशा वेळी (‘देव करो आणि न होवो’) जर काही अशुभ होते तर त्याचा दोष कोणावर येता ? अर्थातच, आपणा सर्वांवर. असो. झाले ते झाले. परंतु अजूनही आपण शुद्धीवर येणार नाही तर आपणांसारखे हतभागी आपणच—आपला सर्व ठिकाणी दिसणारा निरुत्साह कधी कशाने मावळेल देव जाणे ! निरनिराळ्या ठिकाणी चालक-

त्याचा बोजा एकदोघांवर पडतो आणि बाकीचे सर्व डाराडूर झोपा घेतात. आपण हा निरुत्साह, हे आळस्य यांचा गड्डा जर अजूनही समुद्रात बुडवून टाकणार नाही तर आपले राष्ट्र मात्र समुद्रास्तृप्यंतु होईल हे आता आपण ध्यानात धरले पाहिजे. 'Life is not to sleep but to wake' हे सूत्र डोळ्यांसमोर सदैव असून तदनुसार कृती घडली तरच आता तरणोपाय आहे. अतःपर असे होता कामा नये. एका हंगेरियन कवीने म्हटले आहे, "Faith is the vision of truth; it is what men live by; it holds promise of bright days when the brain is singing the Sun will never never shine and the clouds are hanging low." कार्लाईल असेच म्हणतो :–' Nation has that within her which the whole world will not conquer.' राष्ट्रे कधीही खच्ची करता येत नाहीत. त्यांचा आत्मा सदैव जिवंत असतो. हे जें तुमच्यामध्ये आहे त्याचे आविष्करण करा; जे गुप्त आहे, जे सुप्त आहे, ते प्रगट करा, ते जागे करा. म्हणजे तुम्हांस कोण दडपू शकेल ? हे जागे करण्यासाठीच टिळक झटले. आमच्यांत तेज चमकू लागत आहे असे गोखले सरकारास बजावू लागले. आपण सर्वांनी आता तेज प्रकट केले पाहिजे. तेजाचा झोतच्या झोत उत्पन्न केला पाहिजे. म्हणजे सरकारचे डोळे दिपतील आणि या दिपलेल्या सरकारच्या हातांतील सत्ता जबाबदार अशा लोकनायकांच्या हातांत येईल. आपल्यामध्ये हे तेज येण्यास, गोखले, टिळक यांच्यासारख्या निःस्वार्थी, व देशासाठी देहार्पण करणाऱ्या महात्म्यांचे आपण सदैव–ध्यान केले पाहिजे.त्यांची स्फूर्ती शतांशाने आपणात आली तरी सुद्धा पुरे होईल. परंतु आपण जास्त कार्यक्षम होण्यासाठी आपला पुढाऱ्यांवर विश्वास पाहिजे. मुसलमानांपक्षां हिंदू–विशेषतः सुशिक्षित हिंदू–अत्यंत साशंकपणे वागतात. त्यांची मने लंबकासारखी असतात. असेच का करावयाचे, तसेच का नाही, त्याचेच का ऐकावयाचे, असले वायफळ प्रश्न काही न करणारे लोक विचारीत असतात. हे विचारांतच मरणारे लोक काहीही करू शकणार नाहीत. आमचा धर्मावर विश्वास नाही, पुढाऱ्यांवर नाही; शंकांवर मात्र विश्वास आहे. असल्या शंकेखोरांपेक्षा विचारास वाव न देणारे बेफाम लोकही अत्यंत श्रेयस्कर होत. एकाने म्हटले आहे की ' Heroism flees and never

reasons and therefore is always right' यात जरी अतिशयोक्ती असली तरी येथे जीवन आहे, जिवंतपणा आहे, धडाडी आहे, कर्तृत्व आहे. बिशन नारायण धार यांनी हिंदूंच्या या वृत्तीवर एक सुंदर लेख लिहिला होता. ते म्हणतात, 'The breakup of the sentiment of obedience to authority which is so manifest in the Hindu Society and is exercising disintegrating influence upon it has not proceeded quite so far among the Mahomedans, and so they have among them a solidarity of thought and sentiments which the Hindus do not possess. You will meet Hindus by the thousand who would not hesitate to express their revolt against Hinduism; but not one in a thousand among the Mahomedans who would speak disrespectfully of Islam or its founder and apostles. The most enlightened Mahomedans have a respect for the authority of their traditions which the Hindus do not have for theirs; and this reverence to authority has enabled the Mahomedan minority less wealthy and educated than the Hindus, to accept the leadership of Mr. Syed Ahmed and to co-operate with him in founding a college the like of which neither the millionaires of Bombay nor the landed magnets of Bengal with the rhetorical flood of twenty two congresses behind their back, have been able to produce.'

पुष्कळ वेळा अर्थ अनुकरण करणे हा वेडेपणा असला तरी आम्ही पुष्कळ तरुण अलीकडे जी शंकावृत्ती प्रदर्शित करिती ती खरी नसून, काही करावयाचे नाही ही जी भ्याडपणाची वृत्ती असते, तिचे समर्थन करण्यासाठी, मुद्दाम निर्माण केलेली असते. पटले म्हणजे तरी आपण आपल्या पुढाऱ्यांच्या सांगण्याप्रमाणे वागले पाहिजे. पटून सुद्धा काही न करण्यासाठींच शंका दाखविण्याचे धोरण टाकून देण्याची व सहकार्य करण्याची वेळ आता आली आहे. गोपाळरावांनी हीच भक्ती आपले गुरु रानडे यांविषयी दाखविली. रानडे जे म्हणतील त्याच्या विरुद्ध गोखले कधी जात नसत. आपणांपैकी बहुतेक सर्व चंचलमती असतात. राजवाडे म्हणतात : 'पांढरपेशांचा वर्ग फार फसव्या आहे. हे लोक बोल-

तात एक व करतात एक. ह्यांचे जे मत आज दिसते त्याप्रमाणेच ते उद्या चालतील असा नेम नाहीं. इंग्रजी शिक्षण वाईट म्हणणार हेच आणि सरकारी शाळेत आपली पोरे पाठविणारही हेच; देशी माल वापरा म्हणून सांगणार हेच आणि परदेशी माल त्याच घटकेस विकत घेणारही हेच; इंग्रजी नौकरीला गुलामगिरी म्हणणार हेच व ती दररोज व आजन्म करणारही हेच. असला हा लोचट वर्ग आहे.' राजवाडे यांचे हे यथार्थ म्हणणे जर आपण अजूनही खोटे करून दाखविणार नाही तर अद्यापिही आपणांस आशा नाही. या लोकांमुळे पुढारी मानल्या गेलेल्या माणसाला पाठिंबा मिळत नाही. कायदे–कौन्सिलमध्ये गोखले काही धमकी-वजा बोलले किंवा इंग्लंडमध्ये बोलले, तर आपल्या प्रतिनिधीचा शब्द यथार्थ करून दाखविणारी संस्था अगर व्यक्ती एक तरी सापडेल काय ? म्हणूनच टाउनशेंडसारखे लोक म्हणतात, 'We shall never be anything but rulers.' अजून तरी ही चंचलवृत्ती, ही दास्यत्वाची खोड आपण टाकून दिली पाहिजे. पुढाऱ्यांस फसविता कामा नये. त्यांचेच उदाहरण पुढे ठेवून त्यांच्या मागोमाग कामाचा गाडा ओढण्यास, शक्य ते सर्व प्रयत्न केले तरच आता तरणोपाय आहे.

गोखले आणि टिळक यांच्याकडे आपण गुणैक व ग्राह्यैक दृष्टीने पाहू. या दोघांसही एकमेकांची किंमत कळत होती. परंतु राजकारण म्हणजे असेच आहे की तेथे खटके व विरोध ही यावयाचीच. राजकारणात पन्नास साठ वर्षे घालविलेल्या व मुरलेल्या ग्लॅडस्टन या महामुत्सद्द्याने राजकारणामुळे कसे प्रसंग ओढवतात याचे फार उत्कृष्ट वर्णन केले आहे. तो म्हणतो :— 'The vicissitudes of politics, the changes of position, the changes of alliance, the sharp transitions from cooperation to antagonism, the inevitable contact with revolting, displays of self-seeking and self-love; more than all these, perhaps the constant habit of forecasting future and shaping all its contingencies beforehand, which is eminently the merit and intellectual virtue of the politician; all these tend to make him and commonly do make him suspicious even of his best friead. This suspicion may be found to exist in con-

junction with regard, with esteem, nay, with affection
तेव्हा राजकारणात पडल्यामुळे जरी गोखले व टिळक यांमध्ये विरो
आला तरी परस्परांच्या मनात परस्परांविषयी खरा आदर असे. आगरक
म्हणत, ' माझ्याविषयी सर्वात जास्त प्रेमळपणे रडतील तर
टिळकच. ' टिळकांविषयी आगरकरांस जसे वाटे तसेच टिळकां
आगरकरांविषयी वाटे. टिळक हे स्वभावानुसार प्रखर मारा करीत
परंतु आपण या टीकेच्या माऱ्यातून सुटावे अशीही इच्छा त्यांनी कधी केल
नाही. टिळक मंडालेस गेल्यावर गोखल्यांवर जी अश्लील टीका मेळ्यांमधू
व वर्तमानपत्रांतून झाली ती टिळक असते तर खात्रीने होती ना. थोर पुरुषांन
होणारा नाहक छळ कोणास संतापविणार नाही ? कोणास विव्हळ करणा
नाही ? महाजनी म्हणतात,' गोपाळराव गोखले यांचे चरित्र तापल्या सळई
आमच्या हृदयावर उठविलेले आहे.' आणि ते खरे आहे;आम्हीही हे म्हणण्या
भागीदार आहो.परंतु टिळकांच्या मनात विरुद्ध पक्षाविषयी (hatred) द्वेष अ
हे म्हणणे मात्र आम्हांस कसेसेच वाटते. मोर्ले साहेब म्हणतात :– ' It
difficult to trace the cause of a dispute between statesmen
आपण वाटेल ते कुतर्क करतो. विरुद्ध पक्षीयांचा द्वेष वाटण्याचे टिळकांस काही
कारण नव्हते. प्रतिस्पर्ध्यांस ते विरोध करीत पण विरोध म्हणजे द्वेष नव्हे
आगरकर, रानडे, गोखले यांचा टिळक द्वेष करीत असे म्हणणे म्हणजे म्हण
णाऱ्याने स्वतःच्याच मनाचा अत्यंत संकुचितपणा प्रकट करण्याप्रमाणे होय.
कधीच द्वेष करीत नसत. उलट त्यांना फार आदर वाटे. गोखले तर टिळकांहू
लहान. परंतु आगरकर बरोबरीचे, आगरकरांवर टिळकांनी किती कठो
टीका केल्या आहेत. परंतु एकमेकांची हृदये तेच जाणत. आपण मात्र आपल्य
कुत्सित व लघू मनाने त्यांच्यावर कुत्सितत्वाचा आरोप करतो हे अत्यं
अश्लाघ्य होय. तेव्हा दोघांचे मार्ग भिन्न व मते भिन्न असली, एकमेकांनी एक
मेकांस विरोध केला असला तरी आपण ते विसरणे जरूर आहे. ते विरो
आता कशाला ? प्रत्येकाचे कार्य देशाच्या उद्धारासाठी जनतेच्या अभ्युदयासाठ
होते. 'आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ॥' त्याप्रमाणे हे त्यां
कार्य शेवटी देशहिताच्या सागरालाच जाऊन मिळणार. रानड्यांनी ए
ठिकाणी सुंदर तऱ्हेने लिहिले आहे :–' आकाशातील पाऊस ज्या प्रकारच

जमिनीवर पडतो त्या जमिनीचा त्या प्रवाहास रंग येतो. तांबड्या जमिनीवरचा प्रवाह तांबूस दिसेल; काळीवरील काळा; पांढऱ्या भूमीवरील पांढरा. परंतु हे भिन्न भिन्न दिसणारे तिन्ही प्रवाह काही काळ गेला म्हणजे, त्यांच्यातील गदळ खाली बसून, शांत व स्वच्छ दिसतात आणि तिन्ही सागराला जाऊन भेटतात. तेव्हा प्रत्येकाच्या कार्याची भिन्नता दिसली तरी ती भिन्नता स्वभावाच्या विकारामुळे आलेली आहे. स्वभाव दूर केला म्हणजे भिन्न व बेरंगी प्रवाह शुद्ध देशसेवेच्या निर्मल जलाने भरून वाहत आहेत असेच दिसेल. तेव्हा आपण हे वादविवाद उकरण्यात काही हशील नाही. एकमेकांचे उत्पन्न हल्ली किती आहे हे पाहणे व अशा प्रकारचे क्षुल्लक वाद माजविणे वेडेपणाचे आहे. ‘ Home-rule is my birth-right and I will have it. ’ या वाक्यात अहंमन्यतेची छटा आहे असा शोध लावणे म्हणजे मूर्खपणा होय. उलट सर्व देश आत्मत्वाने स्वतःच्या ठिकाणी पाहून, सर्व भारतवर्ष आपल्या तोंडून वदत आहे असेच टिळकांस वाटले असेल. नेता हा जनतेचे मत बोलतो, स्वतःचे नाही. विराट् जनता त्याच्या विचारात व बोलण्यात प्रतिबिंबित झालेली असते, हे असले क्षुल्लक व विचारहीन लेखक विसरतात याचे वाईट वाटते. यात मनाचा खोलपणा नाही, आणि वृत्तीची गंभीरताही नाही. फुलाचा सुगंध आणि त्याचे सौंदर्य निरनिराळे करता येत नाही. सौंदर्य आणि सुगंध दोन्ही पाहिजेत. त्याप्रमाणे प्रत्येकाच्या कामगिरीमुळे दुसऱ्याच्या कामगिरीस महत्त्व आले. प्रकृतिभेदामुळेच— गोखल्यांमध्ये पार्लमेंटमध्ये चमकू शकतील असे गुण असल्यामुळे ते पार्लमेंटात चमकले. परंतु चिरोल म्हणतो :—‘ From the Deccan, as we have already seen in his relations with the Indian National Congress, his influence was projected far and wide. His house was a place of pilgrimage from all parts of India. His prestige as a Brahmin of the Brahmins and a pillar of orthodoxy, in spite of the latitude of the views which he sometimes expressed in regard to the depressed castes, his reputation for profound learning in the philosophies both of the West and of the East, his trenchant style, his indefatigable activity, the glamour of his philanthropy, his accessibility to high and low, his

many acts of genuine kindliness, the personal magnetism without any great physical advantages he exerted upon most of those who came in contact with him, and especially upon the young, combined to equip him more fully than any other Indian politician for the leadership of a revolutionary movement.' या गुणामुळे टिळक हे सर्वसाधारण जनतेचे नेते झाले. आपणांस देशाच्या या उच्च दर्जाच्या पुढाऱ्यांमध्ये खालीवर असे क्रम लावण्याची जरुरी नाही. दोघेही आपआपल्या परीनें श्रेष्ठ आहेत; पूज्यतम आहेत, इटलीचे उद्धारक व ललामभूत झालेले गॅरिबाल्डी, मॅझिनी, काव्हूर या त्रिवर्गास उद्देशून एका ग्रंथकाराने जे उद्गार काढले आहेत ते उद्गार येथेही लागू पडतील. ते असे— 'Possessed of widely diverse gifts, dissimilar in temper and generally opposed in policy, but equal in abenegation of all selfish aims, equal in devotion to a noble cause, equal in the steadfast courage with which it was pursued, each will have his proper niche in the temple of Italian unity: for each contributed most precious and invaluable gifts to the building of that imperishable fame.'

# सामाजिक व धार्मिक मते

सामाजिक बाबतीत गोखले रानड्यांचे व आगरकरांचे अनुयायी होते, आगरकरांच्या सुधारकात ते इंग्रजी मजकूर लिहीत असत. जातिभेद नसावा. पुनर्विवाह व्हावे, अस्पृश्यता नाहीशी करावी असे त्यांचे म्हणणे असे. भारतसेवक समाजातील सभासदाने 'मी अस्पृश्यता नाहीशी करीन, पंथ व जात मानणार नाही, अशी शपथ घ्यावी लागते. हा भारतसेवक समाज राजकीय कार्याकरिता तर आहेच. कारण त्यायोगे परंपरा राखली जाते. परंतु सामाजिक बाबतीतच समाज जास्त कार्य करतो. दुष्काळपीडितांस मदत करणे, रोगाच्या साथी आल्या तर स्वयंसेवक-पथके उभारणे, आरोग्याची व्यवस्था करण्यास झटणे, शिक्षण व धंदेशिक्षण या बाबी समाजाच्या कार्यक्षेत्रात येतात. गोखल्यांस स्वतः या बाबतीत काम करावयास फावले नाही, परंतु त्यांच्या अनुयायांनी या गोष्टी केल्या पाहिजेत व ते करीतही आहेत.

स्त्रियांस शिक्षण देण्यासाठी त्यांची अनुकूलता होती. स्त्रियांनी राजकारणातही पडावे असे त्यांचे मत असावे असे त्यांनी सरोजिनीबाईस जे सांगितले त्यावरून दिसते.

समाजातील तंटेबखेडे नाहीसे व्हावे म्हणून मुसलमान बंधू व हिंदू यात एकोपा पाहिजे. सय्यद अहंमद, मीरअल्ली यांसारख्या संकुचित दृष्टीच्या पुढाऱ्यांच्या उपदेशामुळे मुसलमान सरकारच्या तोंडाकडे पाहत. आणि हिंदूंकडे क्षुद्र बुद्धीने व वाकडया नजरेने पाहत. हा दृष्टिकोन बदलण्याचे काम गोखल्यांनी १९०७ च्या दौऱ्यात बरेच केले. पुढे ना. आगाखान यांनी मॉस्लेम लीग

स्थापली. ते व गोखले मित्र होते. यामुळे आगाखान, सरोजिनी, गोखले वगैरेंनी ऐक्य होण्यास एकमेकांस सवलती देऊ करून योग्य ती परिस्थिती उत्पन्न केली. गोखल्यांच्या मृत्युसमयी दुःखप्रदर्शन करणाऱ्या एका सभेत ना. आगाखान म्हणाले, 'हिंदुस्तानला एकराष्ट्रीयत्व येणे शक्य नाही असे कित्येक म्हणतात; पण ना. गोखले हे एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेचे मूर्तस्वरूप होते व त्यांनी घालून दिलेल्या मार्गाने देशकार्य करीत राहणे हेच त्यांचे उत्कृष्ट स्मारक होय.' मॉर्डन रिव्ह्यू मृत्युलेखात म्हणतो :— 'India is a land of Particularisms. Mr. Gokhale was one of the few Indians who rose entirely and altogether above them' गोखल्यांस हिंदु-मुसलमानांच्या ऐक्यासाठी किती कळवळ वाटे, आणि त्यांचे मन त्याकरिता कसे तिळातिळ तुटे हे मागे दिलेच आहे. टिळकांनी शिवाजी-उत्सव व श्रीगजाननोत्सव सुरू करून हिंदु-मुसलमानांत वितुष्ट आणले असे कित्येक म्हणतात त्यासंबंधी विवेचन आम्ही मागे केलेच आहे. जर हे दोन्ही समाज तुल्यबल झाले तर भांडणे होणार नाहीत असे टिळकांचे म्हणणे असे व ते अक्षरशः आणि तत्त्वतःही खरे आहे. अस्पृश्यतेचाही व्यवहारात अंमल नाहीसा करावयास ते तयारच होते. मात्र केवळ भोजनपान एकत्र करण म्हणजे अस्पृश्यता दूर करणे नव्हे असे त्यांचे मत होते. भोजनपानाचे दुसरे पुष्कळ अज्ञात असे परिणाम होत असतात. 'आहारशुद्धः सत्त्वशुद्धिः' असे तत्त्व आहे. परंतु सामाजिक कार्य करताना मात्र अस्पृश्यता आड येऊ देता कामा नये. गणपत्युत्सवात अस्पृश्यांचाही गजानन यावा. त्यांनीही मेळे काढावे; मिरवणुकीत, उत्सवात भाग घ्यावा, यास टिळकांची संमती असे. फक्त कायदे करून ही सामाजिक शिथिलता दूर करणे त्यांस नको होते. राजकीय बाबतीत सरकारच्या जड शृंखलांनी बद्ध आहो तेवढे पुरे; परंतु सामाजिक बाबतीत तरी सरकारचा हात नको, सरकारच्या कायद्यांनी निगडित होणे नको. ती कामे लोकांनीच समंजसपणे केली पाहिजेत, असे टिळक म्हणत व आम्हांसही तेच इष्ट वाटते. जो देशभक्त आहे तो राजकीय, सामाजिक सर्व सुधारणेस अनुकूल असणारच. आगाखान म्हणतात—"To be an Indian patriot and not to be a social reformer is a contradiction in terms.' रानडेही असेच म्हणत, आणि ते यथार्थच आहे.

धार्मिक बाबतीत गोपाळराव हे अज्ञेयवादी होते. रानड्यांची धार्मिक वृत्ती, ईश्वराविषयी अत्यंत भक्ती व निस्सीम प्रेम, त्यांची ती एक प्रकारची आतुरता गोखल्यांत नव्हती. तरी पण त्यांच्यामध्ये एक प्रकारचा गूढपणा होता. सरोजिनीबाई म्हणते :–'He had also an almost romantic curiosity towards the larger aspects of life and death and destiny and a quick apprehension of the mysterious forces that govern the main springs of human feeling and experience,' आध्यात्मिक भावना त्यांस होती. नैतिक भावनांनी त्यांचे आयुष्य-त्यांचा जीवनक्रम आक्रमिला होता. ईश्वराविषयी त्यास अज्ञातता होती. परंतु नैतिक कल्पनात व त्या आचरणात आणण्यात ते अग्रेसर होते. याच नीतिमत्तेचा त्यांनी समाजातही प्रसार केला; आणि राजकारणातही नीतिमत्ता असली पाहिजे असे त्यांचे मत असे व त्यासाठी ते मनःपूर्वक झटले. माझ्या मनावर दादाभाई, रानडे व गांधी या तीन व्यक्तींच्या चारित्र्याचा आध्यात्मिकरीत्या परिणाम झाला असे ते म्हणत. अर्थात्च त्यांची नीतिमत्ता सखोल होती. वामनराव जोशी यांनी आपल्या धर्म व तत्त्वज्ञान या ग्रंथात अशा मनुष्यासही धार्मिक मनुष्य म्हटले आहे. ज्या माणसाला असे एक ध्येय असते की त्यासाठी तो प्राणही देईल, ज्याकरिताच तो जगतो, व ज्यामुळे त्याला आयुष्य सार्थकी लागले असे वाटते, तो मनुष्य धार्मिकच समजला पाहिजे. अशा दृष्टीने गोपाळराव हे धार्मिक कोटीतले, अत्यंत आणीबाणीच्या वेळीही नीतीनेच वागणारे, शत्रूशी वागताना देखील सत्याचाच मार्ग अवलंबिणारे असे नीतिरत थोर पुरुष होते यात शंका नाही. म्हणूनच पुष्कळ लोक त्यांस ' A saintly Politician ' असे म्हणत. परंतु अज्ञेयवादी गोखले हळूहळू परमेश्वरावर विश्वास ठेवणारे आतून होत होते. १९०६ किंवा १९०७ मध्ये एकदा इंडियन सोशल रिफॉर्मरचे संपादक कलकत्त्यास गोखल्यांच्या बिऱ्हाडी त्यांस भेटावयास गेले होते. त्यांच्या टेबलावर एक पेपर-वेट होते. त्याच्यावर ' God is love ', ईश्वर प्रेमस्वरूप आहे ' असे लिहिलेले होते. गोखले अज्ञेयवादी आहेत हे संपादकास माहीत असल्यामुळे ते गोपाळरावांस म्हणाले, ' हे काय ? ' ' शेवटी मी या विचाराचा झालो आहे ' असे गोपाळराव म्हणाले. ( That is what he

had come to believe ). मुंबईस आल्यावर या संपादकांनी गु. डॉ. भाण्डारकर यांच्याजवळ ही गोष्ट काढिली. तेव्हा भाण्डारकर म्हणाले, ' रानडे मजजवळ म्हणाले होते की, गोखल्यांच्या ईश्वरविषयक विचारात फरक पडला आहे आणि ते तसे जाहीरही करणार आहेत. परंतु त्यांनी आपल्या या बदललेल्या विचारांचा कोठे जाहीर रीतीने उल्लेख केला नाही. १९०२ पासून जेव्हा ते कलकत्त्याच्या कौन्सिलच्या बैठकीस जाऊ लागले तेव्हा तिकडील ब्राह्म समाजाच्या मतांचा त्यांच्यावर फार परिणाम झाला. याच सुमारास ते विवेकानंदांचे वगैरे ग्रंथ वाचीत होते. २६ जुलै १९०२ मध्ये इंडियन सोशल रिफॉर्मरमध्ये विवेकानंदांवर एक लेख आला होता. तो गोखल्यांस फार आवडला. ते लिहितात :—' I wanted to write and tell you sometime ago, that I read your article on Vivekanand with great pleasure. During my stay in Calcutta I came to understand his aims and aspirations much better than before and you exactly expressed my feelings in your article.' गोखल्यांचा व ब्राह्मसमाजातील घरंदाज घराण्यातील पुरुषांचा सतत दहा वर्षे परिचय झाला आणि त्यांच्या धार्मिक विचारांत क्रांती झाली असे म्हणावयास हरकत नाही.

# गोखल्यांचा स्वभाव व इतर गुण

प्रत्येकाच्या स्वभावात काही ना काही तरी वैशिष्ट्य असते. सद्गुणांचा पुतळा एक परमेश्वरच असून अपूर्ण राहण्यातच मौज व माणूसपणा आहे. ज्या मनुष्यात गुण व दोष यांचे संमिश्रण असते तो जनतेस फार आवडतो. चंद्र हा कलंकामुळे जास्तच खुलतो. गोखल्यांच्या स्वभावात अशीच मौज आहे. त्यांचा मुख्य अवगुण म्हटला म्हणजे तापटपणा, हट्टीपणा. त्यांच्या विरुद्ध काही झाले की ते संतापत. रानड्यांच्या उदाहरणाने त्यांनी स्वतःचा दुर्गुण घालविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; परंतु थोड्याबहुत प्रमाणाने तो टिकलाच. त्यांच्या एखाद्या नोकराने जर सोसायटीचे काम वेळच्या वेळी केले नाही तर ते संतापावयाचे आणि त्यास रागे भरावयाचे. परंतु मागून त्यांचे त्यांनाच वाईट वाटे. आपण त्यास फार बोललो असे वाटून ते त्या गड्यास हाक मारीत आणि म्हणत, 'अरे, काम वेळच्या वेळी करावे; टपालासारखे काम महत्त्वाचे असते. ते तू केले नाहीस म्हणून मी रागे भरलो, परंतु असे करू नको व मनात फार वाईट वाटू देऊ नको.' अभ्यंकरांनी हाच अवगुण सांगितला आहे. गोखल्यांस शांती नव्हती. टीकेच्या व खळबळीच्या वर तरंगणारी ज्यांची मने असतात असे टिळक-आगरकरच ही शांतता ठेवू जाणोत. इतरांस ते शक्य नसते. वाच्छांनी आपल्या आठवणीत हाच दुर्गुण सांगितला आहे. वादविवादात स्वतःचेच म्हणणे खरे असे त्यांस वाटावयाचे व ते हमरीतुमरीवर यावयाचे, चिडावयाचे. परंतु मागून ते आपली चूक कबूल करीत. पुष्कळ लोकांस आपली चूक कळली तरी ती कबूल करण्यात कमीपणा वाटतो. परंतु गोखल्यांस असे वाटत नसे आणि खरोखरच **स्वतःची चूक कबूल करण्यास मनाचे फारच मोठे धैर्य**

लागते. गोखल्यांत आणि त्यांच्या शिष्यांत–गांधींमध्ये–हा गुण उत्कटत्वाने वास करीत आहे. वाच्छा म्हणतात–' He would seize an idea on the impulse of the moment and try to hug it till he found later on by experience that it was a wrong one. If in nine cases the impulse was ingenuous, in the tenth it was altogether wrong and ridiculous leading him into embarrasment. This faculty greatly developed in him as he progressed. Indeed, I should say it became confirmed. At our inner circle, when we happened to meet together for the discussion of a burning question, we had to pull him up, and be it said to his credit he would soon correct himself though not without a preliminary struggle. ' या दुर्गुणाप्रमाणेच हट्टीपणा, एखाद्या गोष्टीविषयी अढी त्यांच्या मनात असे. हट्टीपणाबरोबरच त्यांच्या अंगी उतावळेपणाही होता. एखादी गोष्ट मनात आली, की ती ताबडतोब अमलात आली पाहिजे असे त्यांस वाटे. एखाद्या गोष्टीची शंका आली, की लगेच ते दुसऱ्याला कळवावयाचे. पुण्याच्या काँग्रेसच्या वेळी त्यांनी वाच्छांस अशीच तार केली. टिळकांबरोबरच्या शेवटच्या वादविवादात, टिळकांविषयी शंका घेऊन लगेच त्यांनी भूपेंद्रनाथ बसूंस तार केली. या उतावीळपणानेच गोखल्यांस इंग्लंडमध्ये झालेल्या प्रकाराबद्दल क्षमा मागावी लागली.

गोखल्यांचा सरळपणा तर इतका होता, की तो गुणाची मर्यादा ओलांडून अवगुण झाला असे म्हटले पाहिजे :–' Goodness has a limit, which if passed somehow seems to make men cowardly. ' अत्यंत सरळपणासुळेच बोथांस ' वचन द्याच ' असे गोखल्यांस जोराने ठासून सांगता आले नाही. कोणत्याही गुणाला मर्यादा असते. त्या मर्यादेपलीकडे तो अवगुण होतो. या सरळपणास भोळसरपणा हे नाव प्राप्त होते. जगातील निरनिराळ्या व्यक्तींबरोबर कसे वागावे हे गोखल्यांसारख्या साध्यासीध्या माणसास कसे समजणार ? आणि राजकारणी पुरुषास तर याच गुणाची प्रामुख्याने जरुरी असते. नाना प्रकृतींच्या पुरुषांजवळ त्यास विचार–विनिमय करावा लागतो. अनेकांची अंतरे उलगडावी लागतात. हा गुण गोखल्यांत नव्हता. मोर्ले

साहेब स्टेट सेक्रेटरी झाल्याबरोबर गोखले मनात मांडे खाऊ लागले. परंतु मानवी स्वभावाचे सूक्ष्म ज्ञान असलेल्या टिळकांनी ताबडतोब मोर्ले यांचे सत्य-स्वरूप त्यांच्या तोंडावरील तत्त्वज्ञानाचा बुरखा दूर करून जनतेस दाखविले. राजकारणात बिस्मार्कसारखे, मॅचिव्हिलीसारखे, लॉईड जॉर्जसारखे कार-स्थानी पुरुष असतात. अशा लोकांबरोबर त्यांच्या तोलाचा असा कारस्थानी नाना फडणीसच लागतो. आणि टिळकच या गुणांत अग्रेसर होते. गोपाळ-राव साम्राज्यातील मुत्सद्दी झाले तरी त्यांची प्रतिभा तेथे स्वतंत्रपणे चमकू शकली नाही. कारण ते केवळ मिळते घ्यावयाचे; येवढे तरी द्या असे म्हणावयाचे. तेव्हा जरी या सरळपणाची जरुरी योग्य त्या प्रमाणात असली तरी तो राजकारणात अनेकदा दुर्गुणच ठरतो. गोखल्यांच्या बाब-तीत तसेच झाले. गोखल्यांचे अंतःकरण मृदू असे. घरात कोणी आजारी वगैरे पडले तर त्यांचा जीव खालीवर व्हावयाचा. त्यांच्या अंतःकरणाला दुसऱ्याने केलेली टीका फार झोंबे. ‘ Forgive I must but forget I cannot. ’ असे ते म्हणत. आपलेच दात आणि आपलेच ओठ तेव्हा रागावून काय करावयाचे ? परंतु व्रण बुजत नसत. समाजाच्या रमणरगाड्यात व राज-कारणाच्या रंगणात रात्रंदिवस असणाऱ्या माणसाने या बाबतीत कठोर असले पाहिजे. टिळक जात्याच कठोर. त्यांस टीकेचे काही भय नसे. दुसरा आपल्या-वर कितीही प्रखर टीका करो, तेही उलट टीका करून त्यास सळो का पळो करीत. त्यांच्या मनावर या टीकेचा टोचणारा परिणाम होत नसे. त्यामुळे क्षमा करणे, विसरणे हा प्रश्नच त्यांच्यापुढे नसे. ‘ तो अजून मी केलेली टीका विसरला नाही ? ’ असे टिळक मोठ्या आश्चर्याने म्हणावयाचे. ते या बाबतीत इतरांस आपणासारखे समजत. निदान कार्यकर्ते लोक तरी असेच पाहिजेत असे त्यांस वाटे. परंतु गोखले मऊ मनाचे, हळुवार हृदयाचे होते. त्यांचे अंतःकरण फार कोमल होते; त्यांस घाव सहन होत नसे. यामुळे पुष्कळदा ते खचत. या गोष्टीने त्यांच्या मनावर फार परिणाम होऊन शरीरासही हा परिणाम जाणवला असला पाहिजे आणि त्यांचा मृत्यू दहापाच वर्षे अलीकडे ओढवला असेल. महाजनी लिहितात, ‘ गोखल्यांचे हृदय अत्यंत कोमल होते याचा प्रत्यय मला नेहमी येई. एका इंग्रजी तत्त्ववेत्त्याच्या म्हणण्याप्रमाणे जेथे संवेदना तीव्र तेथे या दुःखमय संसारात

असुख जास्तच वाटण्यास यावयाचे.' गोखल्यांच्या हळुवार मनामुळे कोण-त्याही प्रकारची कठोरता त्यांस सहन होत नसे. अर्थात् मनात दुःख होऊन त्यांस खिन्नता येई. परंतु ते ती दाबण्याचा प्रयत्न करीत आणि यामुळे त्यांच्या मनावर व शरीरावर ताण बसे. या बाबतीत आगरकर, मेथा हे कठोर होते. ते डगमगत नसत. ठोशास ठोसा ते लगावीत. खिन्न होऊन जात नसत. कौटुंबिक बाबतीत हाच मनाचा कोमलपणा त्यांच्यात होता. महाजनी लिहितात: 'मनाचा मऊपणा आगरकरात क्वचित् प्रसंगीच–आप्तसुहृदांच्या सहवासात मात्र–दृग्गोचर होत असे. ज्याने जनतेच्या वेड्या समजुतीवर कोरडे ओढण्याचे व्रत पत्करिले त्यास लोकांच्या पोटात शिरून सहृदयतेने काटा थोडाच काढता येणार? परंतु गोखल्यांची गोष्ट निराळी होती. डेक्कन सोसायटीस मिळताना भावाचे मन कसे दुखवू असे त्यांस झाले.' वाच्छा म्हणतात की, 'इंग्लंडमध्ये आम्ही दोघे एकत्र बसून पुष्कळ घरगुती गोष्टी बोलत असू. मधूनमधून आमच्या डोळ्यांत अश्रुबिंदूही चमकत.' या गोष्टीवरून गोपाळरावांचे मन दिसून येईल. तेही होताहोईतो दुसऱ्याचे मन दुखवीत नसत. 'Treat others as you want to be treated by them,' हे त्यांस पक्के माहीत होते. या त्यांच्या मनाच्या कोवळिकेचा पुढे फार उत्कर्ष झाला. पशुपक्ष्यांसही होत असलेली यातना त्यांस पाहवत नसे. **एकदा गाडीचे चाक लागून एक कुत्रा दुखावला तर ताबडतोब आपला शिपाई पाठवून त्या कुत्र्यास त्यांनी दवाखान्यात पाठविले.** अशी दया त्यांच्यात होती. त्यांचा पोषाख मोठा ठाकठिकीचा असे. १८९७ आणि १९०५ च्या वेळेस इंग्लंडात ते पुष्कळदा तांबडे पागोटे घालीत. परंतु १९१३–१४ च्या सुमारास ते इंग्लंडमध्ये बहुतेक युरोपियनांप्रमाणेच वागत. सरोजिनीबाईस याचे आश्चर्य वाटले. ते मोठे मिळूनमिसळून वागणारे होते. इंग्लंडमध्ये कधी गाण्यास, कधी नाटकास ते आपल्या मित्रांबरोबर जात. त्याप्रमाणेच निरनिराळे खेळ खेळण्याचाही त्यांस नाद असे. **प्रत्येक बाबतीत आपण कुशल असावे असे त्यांस लहानपणापासून वाटे. एकदा तर ते बारा तास पत्ते खेळत बसले होते.** आपण जिंकू असे त्यांस वाटे. क्रिकेटचा त्यांस नाद होता. सुधारकामध्ये 'क्रिकेट'वर वगैरे त्यांनी लेख लिहिले होते.

एकदा एका बोटीत ते तिकडचा एक नवीन विलायती खेळ मोठ्या उत्सुकतेने शिकत होते. एकाने त्यास विचारले-' तो खेळ खेळण्यात आपण येवढे का दंग झाला आहा ? ' ते म्हणाले, ' आम्ही प्रत्येक खेळात तुमच्या तोडीचे आहो; **कोणत्याही गोष्टीत हिंदी मनुष्य मागे पडत नाही हे आम्ही दाखवून दिले पाहिजे.**' अशा बारीकसारीक गोष्टी सुद्धा आपण देशाच्या दृष्टीने कराव्या. रामतीर्थ म्हणत, ' माझा श्वासोच्छ्वास सुद्धा देशासाठीच आहे.' असो. खेळणेबिळणे त्यांस आवडत असे. कपड्यात नोक-झोक नसला तरी देश तसा वेश ते करीत. कपड्याची घडी, इस्तरी बिघडू नये म्हणून ते फार जपत. दक्षिण आफ्रिकेत महात्मा गांधी त्यांच्या कपड्यालत्त्यांविषयी विशेष काळजी घेत. परंतु एकंदरीत ते साधेच होते. त्यांचा पोषाख सभ्यतेसाठी असे; दिमाखासाठी नसे. त्यांस कसलेही व्यसन नव्हते. १८९७ पूर्वी ते चहा सुद्धा पीत नसत. इंग्लंडहून आल्यावर मात्र ते चहा घेऊ लागले. विडी, सुपारी वगैरेचे तर त्यांस वारेही नव्हते. विडीच्या धुराचा वास त्यांस अगदी सहन व्हावयाचा नाही. त्यांच्या घरातील कोणा माणसाने विडी वगैरे ओढली असता, त्यांस जर गोपाळरावांनी बोलाविले, तर तो वेलदोडा, लवंग, काही तरी खाऊन मग पुढे जावयाचा. एकदा दत्तोपंत वेलणकरांस काही हिशेब पाहण्यासाठी गोपाळरावांजवळ जाण्याची वेळ आली. त्यांनी विडी ओढली होती. त्यांच्या खिशांत लवंगा व वेलदोडे असावयाचेच. ते वेलचीचे दाणे खाऊन गोपाळरावांपासून जरा दूरच बसले. ' असे इकडे जवळ बसा, लांब बसून कसे चालेल ?' दत्तोपंत हळूच पुढे सरकले. विडीचा वास खपला नाही. ' तुम्ही विडी ओढली वाटते ?' गोपाळरावांच्या समोर खोटे बोलण्याची प्राज्ञाच नसे. 'होय' असे दत्तोपंत म्हणाले. " आता तुमचे वयच आहे म्हणा ओढण्याचे ! " येवढेच ते म्हणाले.

पुण्यास असले तरी ते सर्वदा सोसायटीतील आपल्या बैठकीच्या जागी असावयाचे. जेवणखाण सर्व तेथेच. फक्त दिवाळीच्या दिवशी आपल्या मित्रमंडळीसह घरी जाऊन फराळ करावयाचे. इतके त्यांचे सोसायटीवर प्रेम असे. सोसायटीविषयी किंवा तिच्या उदात्त हेतूविषयी कोणी थट्टा केल्यास त्यांस आवडत नसे. एकदा नेव्हिन्सन् जेव्हा पुण्यास आला होता, तेव्हा

त्यास व इतर मित्रमंडळीस गोखल्यांनी सोसायटीत फराळास बोलाविले. केळीची पाने वगैरे सर्व देशी थाट होता. नंतर विडे वगैरे झाले. गप्पागोष्टी निघता निघता 'इंग्लंड व हिंदुस्तान यांचा संबंध परमेश्वराने आणला आहे'—आणि गोखल्यांच्या सोसायटीच्या ध्येयपत्रिकेतील 'Inscrutable Dispensation' या शब्दांविषयी वाद निघाला. सर्वजण हंसले; परंतु गोपाळरावांस हंसू आले नाही. त्यांच्या तोंडावर गांभीर्य व विचारसौंदर्य हीच प्रतिबिंबित झालेली होती. ज्या गोष्टीवर आपली आत्यंतिक श्रद्धा असते, तिची हेटाळणी, वाटाघाट कोणी केल्यास आपणांस राग येतो. परंतु गोखले आपल्या मनोविकारांवर दाब ठेवण्यास शिकले होते.

गोपाळरावांचा स्वभाव नादी होता. एखादी गोष्ट मनात आली की काही दिवस ते तिचाच पिच्छा पुरवावयाचे. एकदा लॅटिन शिकावयाचे मनात आले तेव्हा त्यांनी त्या विषयाची पुस्तके मागाविली. परंतु काही दिवसांनी त्यांना त्या पुस्तकांची आठवणही राहिली नाही व पुस्तके धूळ खात पडली. १९०० नंतर जेव्हा त्यांची द्वितीय पत्नी परलोकवासी झाली, रानडेही गेले. आणि १८९७ चे शल्य अजून टोचतच होते, अशा मनाच्या अत्यंत अशान्त स्थितीत, त्यांच्या काही मित्रांनी त्यांस गाणे शिकण्यास विनंती केली. गाणे ही एक दैवी कला आहे; हा पंचम वेद आहे; दुःखी जगाचा, त्रासाचा, उद्विग्नतेचा विसर पाडून निर्विकल्प अशा आनंदसागरात पोहावयास लावणारी ही गायन कला धन्य होय! गाण्याच्या आलापाने विलापाचे परिवर्तन होते; हृदय हलके होते; मन मोकळे होते. गोपाळरावांस हे म्हणणे पटले आणि त्या वेळचे प्रसिद्ध गाणारे बाळकोबा नाटेकर यांस त्यांनी आपणांस गायन शिकविण्यासाठी ठेविले. लगेच सांगली मिरजहून तंबोरे, तबले, सतारी यांचा साग्र संच जमविला. परंतु शेवटी बाळकोबा म्हणाले, "तुम्ही जन्मभर शिकलां तरी तुम्हांला गाणे येणार नाही." हा अव्यापारेषु व्यापार होता. कारण गाणे ही ईश्वरी देणगी आहे. प्रत्येक मनुष्य कोणत्या तरी विशिष्ट कार्यार्थ निपजलेला असतो. सर्वत्र सारखे प्राविण्य मिळविणारा असा गटेसारखा एखादाच महापंडित निघतो. व्याख्याने वगैरे देताना जरी गोपाळरावांचा आवाज परिणामकारी असला तरी गाण्यात काही जमेना. शेवटी त्यांनी हा नाद सोडून दिला.

न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिरल्यानंतर त्यांस क्रिकेटचा तर फारच नाद लागला. भिडे म्हणून एक मुलगा उत्तम चेंडू फेकणारा होता. 'जितके वेळा मला 'आउट' करशील, तितके आणे तुला देईन' अशी पैज लावून गोखले खेळावयाचे.

१९०७-८ च्या सुमारास त्यांस योगाचाही अभ्यास करावयाची हुक्की आली. पुण्यात त्या वेळेस कोणी एक आयंगार दवाखाना घालून होमिओपथीचा व्यवसाय करीत होता. त्याच्याजवळ गोखले योगाचा अभ्यास करण्यास जात. त्यांनी हे कोणास कळविले नव्हते. परंतु पुढे हे सर्व उघडकीस आले. गोखल्यांनी तो नाद सोडला. ते म्हणाले, 'मी ध्यानधारणा करू लागलो, की इतर सर्व ध्याने बाजूस राहून 'Visions of Blue books and Government resolutions' माझ्यापुढे दत्त म्हणून उभे राहतात.

गोपाळरावांस ज्योतिषाचा किंवा ग्रह वगैरेवरून भविष्ये वर्तविण्याचा बराच नाद असे. खाली धारवाडकडे राहणारे 'शंकरभट ज्योतिषी' हे त्यांस नेहमी भविष्ये वर्तवून पाठवीत. त्यांनी १९११ मध्ये एक भविष्य केले होते. त्यात गोपाळराव जास्तीत जास्त १९३२ पर्यंत जगतील असे होते. १९१४-१५ मध्ये प्रकृतीस धोका आहे; १९१४ पासून पुढे देशास जास्त चांगले दिवस येतील; त्यांचा विलायतेत बोलबाला होईल वगैरे भविष्य त्यांनी केले होते. गोखलेही कधी कधी स्वतः हे ग्रहगणित वर्तवीत असत. परंतु त्यामुळे त्यांनी प्रयत्नात कधी कसूर केली नाही. हा एक त्यांस नाद होता इतकेच.

हे सारे नाद गोपाळरावांस होते, परंतु घरी हिशेब वगैरे मात्र ते कधी पाहावयाचे नाहीत. हे पैसे घ्या, आणि करा काय ते, असे सांगावयाचे. खिशातून एखादे वेळेस पैसे मोजून ठेवलेले असलेच आणि कमी झाले असे आढळले तर क्वचित् चवकशी करावयाचे. एखादे वेळेस मात्र लहर लागली तर तोंडाने सर्व हिशोब जमवावयाचे आणि मग मात्र तो पैच्याही अपूर्णांकापर्यंत जमवावयाचा. थोर लोकांस कोणतीच गोष्ट क्षुल्लक वाटत नसते. जे कांही करावयाचे ते सर्व ते मनापासून करतात.

शिष्टाचारास गोखले फार प्राधान्य देत. ते प्रथम इंग्लंडमध्ये गेले, तेव्हा या गोष्टीसाठी फार जपावयाचे. एकदा एका होडीत चढताना वाच्छांनी

टोपी काढली नाही म्हणून गोखले रागावले. ‘ तुम्ही टोपी काढली नाही ! ’ असे ते म्हणाले. म्हणूनच परकी लोकांबरोबर वागताना ते त्यांच्याप्रमाणे वागत. **बायकांस वगैरे पत्रे पाठवावयाची झाली तर इंग्लंडात किंवा युरोपांत ‘ टाइप ’ करून पाठवीत नाहीत.** तो अशिष्टाचार मानला जातो. **कोणा स्त्रीस पत्र पाठवावयाचे असेल, तर ते हस्तलिखितच असावे लागते.** गोखलेही सरोजिनीबाई, बेझंट वगैरेंस स्वहस्ताने पत्रे लिहीत. एकदा आजारी असताना त्यांना बेझंटबाईस पत्र लिहावयाचे होते, पण त्यांच्याने सर्व लिहवेना. तेव्हा त्यांनी ते ‘ टाइप ’ करावयास सांगितले; परंतु वरती लिहिले की ‘ हे पत्र टाइप करून पाठवीत आहे, त्याची क्षमा असावी. ’ जग हे बहुरंगी आहे; तेथे पुष्कळ गोष्टी जरी आपणांस पसंत नसल्या, अस्वाभाविक दिसल्या, तरी शिष्टाचार, रूढी म्हणून त्या मानाव्या लागतात. लोकविरुद्ध आचरू नये असे आपले शंकराचार्य सुद्धा सांगत आहेत.

मानमरातबाचा त्यांस तिटकारा असे. कर्झन यांनी दिलेला सी. आय. ई. हा किताब गोखल्यांनी आपल्या नावावर आलेला बद्रूपणा जावा व इंग्लंड-मध्ये उजळमाथ्याने आपणास काम करता यावे म्हणून स्वीकारला. परंतु जेव्हा हार्डिंजसाहेबांनी त्यांस के. सी आय. ई. हा किताब द्यावा असे स्टेट सेक्रेटरीस सुचविले, त्या वेळेस त्यांनी तो किताब साभार परत केला. त्या वेळेस ते रॉयल कमिशनचे सभासद होते. सरकारने पदवी देऊन आपणांस मिंधे करून घेतले असे लोक कदाचित् म्हणतील या भीतीने व आता त्यांस सर्वत्र मान्यता मिळाली असल्याने जरूरच नसल्यामुळे त्यांनी हा किताब स्वीकारला नाही. शिवाय रॉयल कमिशनवर असता सभासदांस तनखा मिळावयाचा. अर्थात् गोखले सरकारचे पगारदार होणार. यामुळे कौन्सिलांत त्यांस लोकप्रतिनिधी कसे राहता येईल, असा कौन्सिलात प्रश्न निघाला. ताबडतोब गोखल्यांनी जाहीर केले की ‘ मला पगाराची पर्वा नाही; मी काही पैशासाठी सुजलो नाही; मी तनख्याशिवाय काम करतो. ’ आणि अशा प्रकारे त्यांनी लोकसेवेचा कौन्सिलातील मार्ग स्वार्थत्यागपूर्वक स्वीकारला. देशासाठी फर्ग्युसन कॉलेज सोडल्यापासून आपल्या पुस्तका-बद्दल मिळणाऱ्या वेतनावरच त्यांनी स्वतःचा व स्वतःच्या कुटुंबाचा

गुजराणा केला. अर्थशास्त्रावर त्यांस एक उत्तम पुस्तक लिहावयाचे होते, परंतु देशसेवा करता करता आसन्नमरण झालेल्या या कसलेल्या अर्थशास्त्रज्ञास पुस्तक लिहावयास फावले नाही. यामुळे त्याचे जगात नाव गाजले असते ते राहिले ! हा एक प्रकारचा स्वार्थत्यागच नाही काय ! टिळकांचेही असेच झाले. ते एकदा अमृतबझार पत्रिकेच्या संपादकांजवळ म्हणाले, "मला दोन मुली आहेत आणि पित्याप्रमाणे मानलेल्या माझ्या वडील बंधूंचे सर्व कुटुंब माझ्यावर अवलंबून आहे." नंतर कंठ भरून येऊन ते म्हणाले, 'त्यांची मी आजपर्यंत काहीच तजवीज केली नाही, ही काळजी मला रात्रंदिवस चैन पडू देत नाही.' अशा रीतीने घरच्या चिंता वगैरे डोळ्यांआड करून या स्वार्थत्यागी वीराने मरेपावेतो देशाचीच चिंता वाहिली. चिंता सरली नाही, परंतु आयुष्य मात्र संपून गेले.

आपल्या मित्रांविषयी सुद्धा ते पुढे यावे असे गोखल्यांस वाटे. हरिभाऊ आपटे यांस मुंबईच्या कौन्सिलांत निवडून येण्यासाठी उभे राहण्यास त्यांनीच आग्रह केला. हरिभाऊ निवडून येऊ शकले नाहीत तेव्हा त्यांस फार वाईट वाटले. स्वपक्षातीलच नव्हे तर परपक्षातील लोकांबद्दलही त्यांस आपलेपणा वाटे. त्यांच्याही गुणांचे चीज व्हावे, त्यांच्या गुणांच्या वाढीस, कर्तबगारीस अवसर मिळावा असे त्यांस फार फार वाटे. '**कोठेही स्पृहणीय गुण दिसला की, त्याविषयी आदरबुद्धी त्यांच्या मनात उत्पन्न होत असे.** या बुद्धीने खऱ्या शिष्टांच्या, खऱ्या संभावितांच्या पंक्तीस त्यांस अग्रस्थान मिळून ते प्रतिपक्ष्याच्याही आदरास पात्र झाले.' टिळकांमध्येही हा गुण होता. गोपाळराव देवधर, भांडारकर वगैरेंनी आपल्या ईश्वरी देण्याचा कसा उपयोग केला हे ते वारंवार सांगत. गोखल्यांविषयी त्यांनी किती सुंदर व उदार उद्गार काढले ! नेहमीच्या झटापटीत ते गुण बाजूस ठेवीत. परंतु अंतरी दैवी देण्याविषयी आदर कोण दर्शविणार नाही ? परतु टिळकांविषयी सर्वदा वाकड्या नजरेनेच पाहणारांस हे कसे दिसावे ! नरसोपंत केळकर कौन्सिलला उभे राहण्यास अयोग्य आहेत असे फर्मान सरकारने त्यांच्या विरुद्ध काढले. परंतु या बाबतीत योग्य न्याय मिळावा म्हणून गोखल्यांनीच खटपट केली. दे. सावरकरांसारख्यासही त्यांनी योग्य उपदेश केला होता. परंतु भावनांच्या तीव्रतेने त्या तरुण बहाद्दरास

तो पटला नाही. त्यांत दोष कोणाचाच नाही ! प्रत्येक जण आपआपल्या मनोदेवतेस साक्ष ठेवून वागला यातच प्रत्येकाचा मोठेपणा आहे. ग. व्यं. जोशी हे सुरतच्या राष्ट्रीय सभेनंतर राष्ट्रीय पक्षाचे झाले. नंतर टिळक कैदेत गेले. जोशीही पुढे वारले. शेवटी त्यांचे सर्व लेख छापून काढण्याचे, गोखल्यांनीच मनावर घेतले. खरे पाहिले तर गोखल्यांनी या पुरुषाजवळ अर्थशास्त्राचा व आकडेशास्त्राचा अभ्यास केलेला. गोखल्यांस वेल्बी कमिशनच्या वेळेस किंवा कौन्सिलात जोशी यांनी पुरविलेल्या माहितीचा फारच उपयोग झाला होता. **एकेपरी त्यांनी गुरुऋण फेडले. परंतु ज्या पक्षास जोशी मिळाले त्या पक्षातील लोकांनी या पुस्तकाच्या पाठविलेल्या व्ही. पी. सुद्धा परत केल्या हे मात्र क्षम्य नाही. टिळक असते तर असे खचित होऊ देते ना.** दुसऱ्याविषयी गोखले किती जपत हे सुरतच्या राष्ट्रीय सभेच्या वेळीही दिसून आले. ज्या वेळेस टिळक छातीवर हात ठेवून हिमालयाप्रमाणे धैर्याने उभे होते. त्या वेळेस एका मवाळपक्षीय गृहस्थास त्यांची मूर्ती पाहवेना. तो टिळकांच्या अंगावर चालून जाऊ लागला. त्या वेळेस गोखल्यांनी ताडकन् उडी मारून त्या गृहस्थापासून टिळकांचे संरक्षण केले. दुसऱ्याविषयी त्यांस किती आपलेपणा वाटे हे या गोष्टीवरून दिसून येते. यास मनाचा मोठेपणा लागतो. आणि तो गोखल्यांच्या जवळ भरपूर होता. टिळकांविषयी तर त्यांस आदर वाटतच असला पाहिजे. कारण त्यांच्याच स्फूर्तीने ते डेक्कन सोसायटीत शिरले होते.

गोखल्यांना वडील माणसाबद्दल विलक्षण आदर वाटे. रानड्यांबद्दल तर त्यांस किती आदर वाटे हे शब्दांनी सांगता येणे शक्यच नाही. रानड्यांची एक पगडी त्यांनी आपल्या कपाटात ठेवली होती. व तिचे मोठ्या भक्तिभावाने ते दर्शन घेत. रानड्यांचे चरित्र आपण लिहिले नाही म्हणून त्यांस फार वाईट वाटे व वहिनीबाईंची ते नेहमी क्षमा मागत. My real joy is, that my true place is at his feet ’ असेच उद्गार त्यांनी निरंतर मनांत काढले असतील. आपण आजारी आहो हे दादाभाईंच्याजवळ कसे सांगावे असे त्यांस वाटे. एकदा गोखले आजारी असल्यामुळे डॉ. भाण्डारकर त्यांस भेटावयास आले. गोपाळराव म्हणाले, ‘मी तुमच्याकडे यावयाचे. तुम्ही मजकडे का येता ?’ ‘तुम्ही आजारी आहां म्हणून मी येतो; बरे झाल्यावर

मग तुम्हीच मजकडे या.' असे भाण्डारकरांनी त्यांचे समाधान करावे. मेथांविषयी त्यांस असेच वाटे. कुटुंबांतही आईबापांविषयी त्यांची भक्ती मोठी आदर्शभूत होती. परंतु या गुणाचे पर्यवसान पुढे निराळ्या प्रकारात झाले असावे. जसे आपण गुरुजनांना किंवा आपल्याहून अनुभवी पुढाऱ्यांस मानतो, तसेच आपणासही लोकांनी मानावे असे त्यांस वाटू लागले असावे असे दिसते. त्यांच्या मित्रमंडळीत व अनुयायांत तर त्यांच्या शब्दास विलक्षण किंमत असे. डॉ. परांजपे लिहितात :—'His word was law, his advice most welcome and his smallest wish a peremptory order.' मनुष्य जसा दुसऱ्याजवळ वागत आला, त्याचप्रमाणे इतरांना आपल्याजवळ वागावे असे त्यांस वाटू लागते. गोखल्यांचे पुढे पुढे असे होई की जर कोणी त्यांचा सल्ला विचारावयास गेला तर त्याने त्यांचे म्हणणे ऐकलेच पाहिजे. त्याच्यावर शंका घेणे मोठे कठिण असे. त्याचप्रमाणे अगदी शेतकऱ्यापासून सर्वांस जसा टिळकांचा दरवाजा खुला असे तसे गोखल्यांचे नसे. सुशिक्षित, मोठ्या विचारी लोकांचेच त्यांच्याकडे येणे जाणे असे. ते इतरेजनांस जरा अधिकारानेच सर्व सांगावयाचे. हा एक प्रकारचा अवगुण होय. आपणास आता अनुभव आहे, दुसऱ्यास शिकविण्याचा थोडा हक्क आहे, असे त्यांस साहजिकच वाटे; त्यांत अहंकाराची छटा मुळीच नव्हती. त्याच्यात अहंकार नव्हता असे गांधी म्हणतात :—'I was by the side of that saintly politician to the end of his life and I found no ego in him. I ask you if there is no ego in you. If he wanted to shine, he wanted to shine in the political field of his country; he did so not in order that he might gain public applause but in order that his country may gain. He developed every particular faculty in him not in order to win the praise of the world for himself but in order that his country may gain; he did not seek public fame, but they were showered upon him, they were thrust upon him; he wanted that his country may gain and that was his great inspiration.

या उताऱ्यावरून त्यांच्या अंगांत अहंकार नव्हता असे दिसते. परंतु तो गांधीं-सारख्या थोर पुरुषांस दिसला नसला तरी पुष्कळांस दिसत असे, असे पुष्कळ लोक अनुभविल्याचे सांगतात. मोठ्या लोकांची दृष्टी चांगल्याकडेच असते. कारण सर्वगुणसंपन्न कोण असतो ? जीवन म्हणजे काळ्या पांढऱ्या तंतूंचा पट आहे; आणि असे आहे म्हणूनच त्यास शोभा आहे. आणखी अशी गोष्ट असते की मोठ्या माणसांच्या मोठेपणाबरोबर, त्यांचे दोषही जग मोठे करून दाखविते. चंद्राच्या सुंदर व रमणीय प्रकाशवैभवाने त्याच्यावरचे डागही दिसतात. ताऱ्यांचे तेज अल्प म्हणून, डागही दिसत नाहीत. गटे याचा चरित्रकार लीव्हेस म्हणतो, " The Faults of a celebrated man are apt to carry an undue emphasis. They are thrown into stronger relief by the very splendour of his fame. His glory immortalises his shame." असे असले तरी आपण गुणांकडेच दृष्टी वळविणे हे आपल्या हिताचे आहे. आणि पुष्कळ वेळा असेही असण्याचा संभव असतो की काही गोष्टी आपण समजतो तशा नसतात. कदाचित् आपलीच चुकी होत असेल. गोखल्यांमध्ये थोडा अहंकार होता, असे म्हणावयाची धिटाई आपण कशास करावी ? 'It is never well to put ungenerous constructions when others, equally plausible and more honourable are ready.' त्यांच्या अंगी अहंकार होता असे म्हणण्याऐवजी स्वतःच्या मार्गाची त्यांस इतकी खात्री वाटत असे, असेच आपण म्हणावे.

त्यांच्या सर्व आयुष्यात स्वार्थत्याग हा सद्गुण सूर्यप्रकाशासारखा तळपत आहे. 'The one pure, sacred and efficacious virtue, sacrifice, the halo that surrounds and sanctifies the human soul.' अशा प्रकारचा स्वार्थत्याग विरळा ! त्यांनी गरिबीला आपखुशीने कवटाळले. शेवाळातून जसे कमळ आपले डोके वर काढते त्याप्रमाणे जाती, पंथ, भेदभाव, स्वहित यांच्या चिखलातून, या शेवाळातून हे सुंदर पुष्प देशास दरवळून सोडते झाले. परंतु त्यांना नेहमीच चांगले दिवस लाभले नाहीत ! 'Every gleam of sunshine in his life was chased by a gloomy shadow that undermined his constitution and hastend his end .' त्यांच्या अंतःकरणात एक प्रकारचा उदासीनपणा

होता. १८९७ साली जेव्हा त्यांच्यावर गहजब उडाला आणि त्यांनी क्षमा मागितली, तेव्हा त्यांनी आपले मित्र रा. वासुदेवराव आपटे यांस विचारले, 'माझे करणे आपणास कसे वाटले?' 'देशाची अब्रू दवडणारे, अपमानास्पद वाटले.' गोखल्यांना त्यांचे हे उत्तर ऐकून वाईट वाटले. आपल्या करण्याने देशाची हानी झाली? 'अरेरे,' ते ताबडतोब म्हणाले, "But a day will come when I shall cover my country with glory by way of compensation for the wrong I am alleged to have done and then critics of your type, who are now running me to death, will be converted into my admirers.' हे ध्येय सतत पुढे ठेवून या थोर पुरुषाने आपले नाव दिगंत केले यांत संशय नाही. परंतु हे सर्व झाले तरी त्यांच्या मनास पूर्ण शांतता लाभली नाही. त्यांच्या स्वतःच्या महाराष्ट्रात तरी त्यांस फार सन्मान मिळाला नाही. परंतु जे खरे असते ते केव्हा तरी खरे ठरणारच. त्यांच्या मार्गांची, त्यांच्या मतांची, त्यांच्या उणिवांची जरी टवाळी झाली तरी त्यांच्यात असलेले सत्य थोडेच लपणार आहे? 'Minds may doubt and hearts may fail when called to face new modes of thoughts or points of view. But the time must come when what is false in all things will fade and what is true will no more seem strange.' हे इलिंगवर्थचे वाक्य किती खरे आहे? टिळक व गोखले दोघांहीमधील सत्य जर आपण नीट पाहू तर आपणांस आता दिसेल. गोखल्यांस त्यांच्या उभ्या आयुष्यात फारसे सुखवाद मिळाले नाहीत. ते इंग्लंडमध्ये म्हणालेच होते की 'Public life in India, has many discouragements and but few rewards.' आणि अखेर तेच खरे ठरले. परंतु गोखल्यांनी चिकाटी हा आपला गुण सोडला नाही. कौन्सिलमध्ये तेच तेच मागताना ते लाजले नाहीत की, कचरले नाहीत. कार्लाइलने म्हटले आहे की, 'The characteristic of heroism is persistency.' देशसेवा करीत असताना—

> 'निन्दन्तु नीति–निपुणा यदि वा स्तुवन्तु।
> लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम् ॥
> अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा ।
> न्याय्यात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ॥'

या धीर-व्रताप्रमाणे ते वागले. लोकांनी निंदा केली तरी ते तळतळले नाहीत. आपले म्हणणे सत्य असेल तर ते आज ना उद्या लोकांस पटेल असे ते हृदयास संबोधीत. कॉल्डेनविषयी ब्राइट म्हणतो 'He loved his people too well to be afraid of their frown.' हेच गोखल्यांविषयी म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. **स्वार्थत्याग व लोकांकडून गौरव न होणे याच दोन गोष्टींनी गोपाळरावांची कामगिरी फार शोभते.**

> "Measure thy life by loss instead of gain
> Not by the wine drunk but the wine poured forth
> For love's strength standeth in love's sacrifice
> And who so suffers most, hath most to give."

ही हॅमिल्टनची उक्ती येथे यथार्थ लागू पडते.

गोखल्यांच्या गुणांमधला सरळपणा, सर्वत्र नीतीने वागणे, हे गुण गांधींना जास्त स्पष्टपणे दिसले असतील. त्यांच्याच जोडीला, अस्पृश्योद्धार व हिंदु-मुसलमान यांचे ऐक्य, या प्रश्नांवर गोखल्यांचा विशेष कटाक्ष होता. गांधींची तर ती जीवनतत्त्वेच होऊन बसली आहेत. गोखल्यांमधील या गुणांमुळेच ते गांधींचे गुरू झाले; गांधींचे अंतःकरण त्यांच्याकडे ओढले गेले. ही गुरु-शिष्यांची जोडी अपूर्व आहे. त्यांच्या सद्‌गुणांकडे आपण पहावे; त्यांचे आपण मनन करावे; हे पुरुष म्हणजे पर्वताप्रमाणे असतात; आपण त्यांच्याकडे उंच उंच वर वर पहात राहावे. दृष्टी भागते; परंतु शक्य ते करण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे. विशेषतः आपण व्यापक दृष्टीचे झाले पाहिजे. मोठ्या वर्तुळात फिरणे आता आपणांस जरूर आहे. आपल्या सभोवतालची परिस्थिती कशी आहे ?— 'Where the passions of greed and hatred are allowed to roam unchecked having for their allies deceitful diplomacy and a widespread propaganda of falsehood, where the soul remains caged and the self batters upon the decaying flesh of its victims.' या परिस्थितीत आपण गुरफटलो असलो, तरी आत्मिक व नैतिक सामर्थ्याने, प्रेमाने व प्रामाणिकपणाने ही स्थिती बदलण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे. अंगी

सद्‌गुणांचे बीजारोपण करावे. ते सद्‌गुण प्रत्यक्ष व्यवहारात आले पाहिजेत. ‘ The supreme end of our personality is to express itself in its creations. ’ कवि काव्ये निर्माण करतील. तत्त्वज्ञ नवीन तत्त्वे प्रसवेल. आपण ती तत्त्वे आपल्या कृतींत, आचरणात आणावयास नको काय ? हे सामर्थ्य आपल्या अंगी येण्यास या पुरुषांचे उदाहरण नित्य डोळ्यांपुढे ठेवावे. ही माणसे कशी असतात ? —

‘ Great hearts, strong minds, true faith and willing hands.
Men whom the lust of office cannot kill
Men whom the spoils of office cannot buy
Men who possess opinions and a will,
Men who have honour, men who will not lie. ”

मोठ्या लोकांप्रमाणे आपण सर्वच मोठे झालो तर त्यांचे महत्त्व काय उरले ? परंतु सर्वांस तसे होता आले नाही तरी शक्य तो प्रयत्न करणे हे तरी प्रत्येकाचे कर्तव्य आहे की नाही ? ‘ क्षुद्र माणसांच्या प्रगल्भ विचारांनी राष्ट्रे तयार होतात. ’ विचार प्रगल्भ होण्यास थोरांच्या चरित्रांचे अध्ययन करावे, मनन करावे व तदनुसार कृती करण्यास लागावे म्हणजे आपल्या राष्ट्राची उन्नती होण्यास काय विलंब ?

# कै. ना. गोपाळ कृष्ण गोखले

## यांची

## जन्म–लग्न–कुंडली.




**जन्म**—बुधवार, वैशाख कृष्ण नवमी, शके १७८८,
ता. ९ मे सन १८६६ रोजी सूर्यास्ताचे सुमारास.

**मृत्यू**—शुक्रवार, फाल्गुन शुक्ल पंचमी, शके १८३६.
तारीख १९ फेब्रुवारी सन १९१५.

## APPENDIX I.

### TO GOKHALE'S MEMORY

### THE RIGHT HON. E. S. MONTAGU, M. P.

The news of Mr. Gokhale's death has come with an inevitable sense of shock, even to those of us who had feared for some months past that there was grave reason for anxiety about his health. We have lost the outstanding figure in the great transition stage of modern India; a man whose abilities brought him to the forefront, and whose sense of right forced him into controversies of which we have not yet seen the end. But at this moment the dominant feeling among all who were brought into contact with him, is I think, that the value of a life and personality such as his—a record of single-minded devotion to an unselfish ideal and of ceaseless labour in its service over an almost unlimited field of activity—stand above and apart from all controversy. It is with this aspect before my mind that I welcome the opportunity, as one among many of his admirers, of paying my tribute to his memory and of recalling the impressions on which in my own case it is built up.

One of the many remarkable characteristics of Mr. Gokhale was the degree to which he was able to combine enthusiasm for reform with a patient industry not too often found in close association with the first quality. But he never allowed his idealism and his infinite capacity for taking pains to interfere with one another; rather, they both served as a joint inspiration to the work he set before him. The result was that, whether one agreed or disagreed with him, he gave a sense of practicalness in his dealings which seemed

to sweep away half the difficulties at the outset. Like all men gifted with the spirit of reform, he was always on the alert to unearth and state the problems which others would be content to leave half-hidden beneath the weight of administrative machinery; but it would never have occcurred to him to rest satisfied with the bare statement of the problem. The vital point in his view was to arrive at the solution, and to that end he would bring to bear all the resources of his fertile mind and all the great influence of his personality. If any illustration of his way of setting to work were needed, we turn most naturally, perhaps, to his visit to South Africa, the effects of which, in view of what has since happened, may well be said to be incalculable.

It is almost inevitable—and perhaps it is right—that in thinking of our great men of public affairs we recall the atmosphere of their ideals and their personality, rather than the underlying fact of their sheer intellectual power. Yet in Mr. Gokhale's case this fact claims special recognition, if only because it was so often veiled beneath the modesty and sincerity of his nature. His grasp of things, both in essentials and in details, was not the least valuable of the assets which he brought to the service of his country. It is not too much to say that his annual contribution to the debate on the Budget proposals in India, to quote only one example, was one of the outstanding features of the proceedings of the Viceroy's Council, and was eagerly awaited even by those who could not see eye to eye with him in his criticisms. That a man should interest himself in the complexities of Indian economics and finance is in itself a tribute to his powers of mind; that he should master them, and should display his mastery at an age at which few people would care even to study them cursorily, was a sign of a ripening intellect and a serious endeavour which served to

lay the sure foundations of Mr. Gokhale's work. And with all his comprehensiveness of judgement and mental clarity he never dropped into the academic fallacy of contempt. He impressed one as being among the most candid and unassuming of men and he was equally ready to give or to take advice where it seemed most serviceable. His mind possessed the qualities ascribed to statesmanship without ever losing the fire of its enthusiasms or its warm human interests. We feel that his loss touches deeply not only India but the Empire and the whole world of men whose thoughts move in harmony whether they know it or not, with the spirit of the brotherhood of "The Servants of India."

## MR. CHARLES ROBERTS, M. P.

I can but offer my sincerest condolences to all the friends of Mr. Gokhale who are mourning his loss. I knew him only slightly, though I am glad to have had some conversations with him, just before he left this country a month or so ago. No one could fail to be struck by the force and insight, the comprehensive grasp and the practical moderation of his mind, and his early death is widely felt to be a disaster not only in India, but in England.

## MR. G. RAMSAY MACDONALD, M. P.

I am glad to be able to express through the columns of *India* my grief at the death of my friend and colleague. In him India had a faithful and devoted son. He belonged to that race of Indians who retained that calm dignity of mind and spirit which comes from an unassailable belief in their own race and its destiny.

He knew the West, its powers and its kingdoms. No one paid a more wholehearted homage to its attainments. But he knew the East too. The breath of the life of his

mother India was his own breath of life. Jealously he guarded her reputation, faithfully he strove to remove her defects. Where she had fallen, he sought to uplift her: where she had triumphed, he sought to praise her.

I have set for many days with him on the Royal Commission, and of the many interests of that Commission his personality and methods have been in the forefront. His knowledge, his resource, his nimbleness, his persistence, his authority, have been a source of endless wonder to me. And he will never sign the report.

Sadly I parted from him when he went away, for I knew that the chances were that we should never meet again. May his resting place remain in the affectionate hearts of his people. He would desire no ohter shrine. May his work inspire those who have to step in and fill the places he has left vacant. He would have prayed for no better resurrection.

## SIR HERBERT ROBERTS, BART., M. P.

The news of the death of Mr. Gokhale had for some time a sense of the approaching end, came to me as a painful Shock. Ever since I began to take an interest in Indian affairs in Parliament—now more than twenty years ago—I had looked upon Mr. Gokhale as the representative of what was best and noblest in the life and thought of India, as a sure guide upon Indian matters, and as a most sincere and loyal friend. He was destined to take a leading part in developments throughout a memorable and critical period in the history of the Indian people, and as I look back over the years during which Mr. Gokhle consecrated his life to India one or two outstanding facts dominate the situation.

First, Mr. Gokhale was a man of rare intellectual gifts. His work as a member of the Viceroy's Council disclosed a

mind able not only to unravel intricate financial problems, but also to grasp the larger aspects of general policy. Again his knowledge of the conditions and needs of India, of her real life and spirit, was probably unique. Add to this the influence of a personality of exceptional charm, absolute simplicity and self-surrender, combined with qualities of undaunted courage and determination at any cost to act in accordance with the principles which dominated his whole career.

Mr. Gokhale was the recognised leader of educated India in the great effort, along constitutional lines, to secure for India a further measure of self-government, and to him, first and foremost, I think is due the manifest progress in this direction of the last ten years. He won the confidence and respect of succeeding Viceroys in India and of Secretaries of State at home, and I venture to affirm that few more remarkable instances can be found of the power of one striking personality upon the development of an Imperial issue of first magnitude than that of the great man whose loss we sorrowfully mourn to-day. Assuredly, though dead he will yet speak in the coming new and better day of India.

## MIRZA ABBAS ALI BAIG, C. S. I.

Mr. G. K. Gokhale's sad death is an irreparable national calamity. In him India has lost one of her greatest sons and the foremost of her public men. As a political leader he was unsurpassed in the hold he had acquired on the affectionate esteem and confidence of his countrymen. This was the result of a rare combination of noble qualities. The purity of his life and the sincerity of his motives were as transparent as a crystal. His lofty aims and ideals were entirely free from the taint of ill will towards any community

or creed. The charm of his manner, his gentle disposition, his high character, his persuasive eloquence, his winning candour, his modesty, his simplicity, and his selflessness, furnished a fitting background to his commanding talents, which were unsparingly and unceasingly devoted to the service of his country and countrymen, whom he loved with all the fervour of his warm nature. His examination of the moral foundations of society and of the political forces underlying the various systems of Government had convinced him that the rise of depressed nations was in direct proportion to the number of self-sacrificing patriots amongst them. Hence the " Servants of India Society ", which Mr. Gokhale established. His own life exemplified the noblest spirit of self-sacrifice in advancing the public welfare. His streneous life wheter it was passed in the obscurity of the student's sanctum or in the serenity of the professor's lecture room, or in the agitated atmosphere of social and political controversy, or in the brilliant light of the Imperial Council Chamber or the public platform, was rich in its fruitful results, and in its closing stages was an asset of the highest value to the Empire. It was an inspiring spectacle to see this high-souled patriot hurrying to South Africa to bring about some amelioration in the lot of the Indians there, while the relentless grip of death was already tightening around him. It was most pathetic to see him working laboriously on the Royal Public Services Commission, when he knew that his life was fast ebbing way.

## DR. V. H. RUTHERFORD.

Mr. Gokhale was not a Mazzini, nor a William Tell, nor a William Wallace, and yet his name will be honourably mentioned in the history of Indian nationalim. A diplomatist to his finger-tips, he knew how to play on the na-

tional lyre without offending the official ear. His advocacy of freedom and his country's rights never brought him into violent conflict with the British hierarchy, and the honour conferred upon some of his com-patriots of banishment without charge or trial never fell to his lot; nor did he ever languish, like the Irish leaders, in British gaols as a political suspet. In sharp contradistinction to the programme of physical force paraded in Ulster and approved by one political party in Great Britain, Mr. Gokhale's policy for India was one of peaceful penetration. The first fruits of his efforts were the Morley reforms, but whether he was responsible for their mildness or not, Lord Morley alone can say. A little more of the Western spirit of militancy would have made Mr. Gokhale a really formidable leader like Parnell or Kossuth, but born and bred in the mephitic atmosphere of subjection and alien overrule one cannot but admire the way in which he overcame his surroundings and accomplished good work for his country. India's loyal sons will follow in his train until India's soul is satisfied and her freedom attained.

## LORD HARDINGE

In my personal relations with Mr. Gokhale, I have always regarded him not merely as an important member of the Council, but also as a friend. On more than one occasion he has given me advice, which I found to be both sound and useful and I may mention that in the South African Emigration question, he rendered me most loyal and helpful assistance.

He has now left us and we shall feel the void he has created, for one may truly say that it will be almost impossible to fill his place in Indian public life.

## LORD MESTON

My own impressions of Mr. Gokhale derived from close association were, firstly, his extraordinary capacity for work; secondly, his splendid parts combined to great industry; thirdly, his stern devotion to duty; and fourthly, his profound and detailed knowledge of subjects. He knew all about the subject that he took up : a rare gift among politicians, carried to a very high degree by Mr. Gokhale. There was a curious fastidiousness about Mr. Gokhale; he had an amount of impatience of Sluggards. He was the first orator of his time in India. He was fastidious in the political weapons he employed and never resorted to anything mean and underhand, in what had been called the game, a tortuous game of politics. Mr. Gokhale had both intellectual and physical courage : the highest courage. He had contempt for meanness and injustice, a burning love of country and great belief in destiny.

## H. A. L. FISHER.

In talent and character, he was extraordinary, combining in a singular degree the visionary qualities of the Indian life. Even in India, where saints are not uncommon, Gokhale's saintliness shone with a peculiar lustre, for not only was he utterly disinterested in his pursuits of patriot ends, carring nothing for wealth and station, but his rare spiritual intensity was united to a subtlety of mind, a quite grasp of detail, and a gift for action, qualities that are not usually associated with the devotional temperament of the East.

That he was a great orator, I can well believe, for his use of English was exact and brilliant and entirely free from the redundancy and magniloquence which is sometimes

imputed to Indian eloquence. Though his training was mathematical, he was well read in modern historical and political literature... Yet neither in learning, nor in the conduct of affairs had he any touch of pedantry.

In the general commerce of life there could be no more gracious or easy companion. But though he could adapt his conversation to circumstances and have a pretty gift of delicate humour, he always contrived to make you feel that he was living in an atmosphere of his own.

In politics he might be described as a mid-Victorian radical, owing intellctual allegiance to J. S. Mill, but also largely influenced by Mazzini, whom he resembled in moral intensity and fervour. He made no secret of his ambitions for India. Believing in Parliamentary institutions, he desired to see India become a self-governing member of the British Empire after the model of Canada or Australia.

Critics have urged that he was vain of applause - an allegation brought against all orators ; and he was also hypersensitive and of a combustible temper, these qualities which also belong to the soul of an orator, were never so developed as to make him intractable. His friends will long remember him with affectionate regret as one of the best and noblest of men, an honour to India in whose service he laboured and to Great Britain, from whose thinkers and poets, he derived no small part of his inspiration.

## H. W. NEVINSON.

Certainly, Gokhale was a Congressman. But in him there was nothing of the froth and fume of the legendary ' Congress-wallah '. If eloquence is, as Lord Curzon eloquently

assured a Calcutta audience, the besetting sin of Indians, Gokhale had none of it. He had no rhetoric. He cared nothing for impassioned language and magnificent periods. I have never heard a calmer or more self-restrained speaker. His was the eloquence of perfect knowledge, of entire devotion to his cause, and utter regardless of self or any other consideration. What he said of Ranade, was true of himself ; " It was as though the first person singular did not exist in his vocabulary ". But, however quitet his speech, the courage of unyielding conviction and of that regardlessness of self or fortune or applause was always felt behind it. It needs some bravery to continue insisting on the same cause year after year with hardly any apparent result. Courage underlying a sweet reasonableness was the characteristic of the man and of his speaking. It made him a speaker of singualr attraction and lucidity. But he was never satisfied with words. He knew how easily reformers are beguiled into believing that when speeches have been made, something has been accomplished. He knew that speeches accomplished nothing unless action follows and with this knowledge he founded the " Servants of India. " Courage, self-assertion and discipline in public life were the qualities which he found wanting and which he hoped to develop through the Congress and such missionary means as his Order of Servants. He knew it would be a slow work. He recognised the obstacles on the side of the Government and on the side of his own people.

## SIR VISVESVARYA

I had known Mr. Gokhale for 25 years as one who placed healthy and decisive limitations to his ambition. He had a balanced intellect and studied both sides of the subject too well to take extreme views. He regarded the late Mr.

le as his 'guru' and both were of opinion that was too little of activity and too little of work done empted by the people of this country in the midst of revailing langour and lassitude. These two streneous ers have left behind them enduring examples to the generations. Latterly Mr. Gokhale had acquired an iational reputation. Indians in every country were l to point to him as an example of their countrymen could rise to the level of the best in any country.

## JUSTICE TAYABJI

khale was one of the rarest beings produced by any try or time, one who went through life with unsurpassed licity and modesty, whose presence inspired love and , whose life was so pure, whose character was so lfish that no one can refer to him except with respectful ration, whose intellect was so clear that those who dis-ed with him had the utmost difficulty in justifying their ion, and sometimes failed perhaps in convincing even iselves, who when he stood forth as the representative ie vast country, whether at the foot of the throne of the eror, or in the midst of men in power, or in an unsym-etic self-governing colony, in the midst of men sanguine ie correctness of views, whose error he was sent to de-strate, commanded by his personality, unadorned by rnal symbols of authority, a deference not unlike that ch may be claimed by kings, and inspired in minds of expectant countrymen a serene confidence that he would accorded a place worthy of this country wherever he t — even in that assemblage of which it is said :—

"There is

One great Society above on earth
The noble living and the noble dead"

## MAZRUL HAQUE

The dominating trait of Gokhale's character was the intense love for his country. Nothing came or could come between him and his love for the motherland. I have never seen in my life, and I am pretty well acquainted with most of the leading and prominent men of India, one who was so devoid of narrow sectarianism of every kind as Mr. Gokhale was. In his eyes Hindoos and Mahomedans, Marathas and Bengalis were absolutely equal. Naturally he was proud of being a Maratha Brahmin but he was prouder still of being an Indian.

Mr. Gokhale was pre-eminently a man of peace and compromise, not the peace which is secured at all price and the compromise which entails sacrifice of principles. He was never aggressive and would not fight willingly; but when the occasion arose and he had no other course left to him there was no better fighter than Mr. Gokhale. It was a sight for the Gods to see as he dealt blows after blows—straight from the shoulder and discomfitted opponents officials and non-officials alike. His incisive criticisms of those official measurs which did not command his assent were of such a severe and crushing nature that the officials could hardly meet his arguments. His life is an object lesson for those of us who think that politics are a game at which anyone who could read and write , can play. Nothing can be farther from truth than this popular and utterly misconceived notion. Mr. Gokhale achieved the enviable height by assiduous and long apprenticeship.

## SIR SHIVASWAMI AYER

A life like Gokhale's is full of lessons to all, and to every public worker, every citizen. The pains that Mr. Gokhale

took to master his subjects, his culture, his wide outlook, his sound judgement, his sweet reasonableness, and his spirit of compromise, his avoidance of personal questions, his self-denial, his unwavering determination to do the right and his tenacity of purpose are all worthy of the highest imitation. It may not be given to all to possess Mr. Gokhale's abilities or constructive statesmanship, but it is open to every one to work for the public good in the spirit which animated him and with high ideals which guided him.

## PT. MADAN MOHAN MALVIYA.

We have many illustrious men during the last 100 years and I hope we shall have many more in the coming years. They will be men probably with equal intellectual qualifications, with equally earnest patriotism, with an equally earnet desire to serve the country, but a combination of the qualities which made Mr. Gokhale dear to the whole country is not easily to be looked for.

## PT. MOTILAL NEHRU.

He was a noble soul fired by a patriotism all consuming. A born leader of men, he never aspired to anything but the humblest servant of the motherland, in whose service he brought such devotion into play that it is now a matter of history. He lived up to the very high ideal which he set before himself and his countrymen and I cannot do better than to describe that ideal in his own inimitable language. In one of his speeches he said : " Public life must be spiritualised. Love of country must so fill the heart that all else shall appear as of little moment by its side. A fervent patriotism which rejoices at every opportunity of sacrifice for the motherland, a dauntless heart which refuses to be

turned back from its object by difficulty or danger, a deep faith in the purpose of Providence that nothing can shake equipped with these the worker must start on his mission and reverently seek the joy which comes of spending oneself in the service of the motherland." These were the noble words that he uttered and that was the ideal which he strictly followed in his life, and true to his words he literally, actually spent himself in the service of the motherland.

# सूची

]टीप — नावांपुढील अंक पृष्ठे दर्शवितात. ]

## पूर्वार्ध


अजितसिंह—१५६, १५७, १६५
अफगाणयुद्ध—१०९
अमरावती कॉंग्रेस—१०३
अमेरिका—२, ३
अमृतबझारपत्रिका—९२
अय्यर सुब्रम्हण्य, डॉ.—१७१
अलाहाबाद—१७१
अलीगड—१४०
अवरंगजेब—११७
अंबालाल सक्करलाल—१६७
आगरकर, प्रि.—१६, १७, २०, २१, २३, २५, २६, २७, ३०, ३१, ७२, ८५, ८७
आठवले के. के.—१५७
आपटे, प्रि.—१६, ३०
ऑफिशियल सीक्रेट्स ॲक्ट—९३
आयर्लंड—४२
आशियातील जागृती—१०७
इब्राहिम रहिमतुल्ला—८२
इंग्लंड—३, १०८, १०९, १११
इंग्लिशमन—९३, ९७
इंडिया (पत्र)—१०५, १५७, १६७
कर्झन, लॉर्ड—८९, ९१, ९२, ९५, ९७, १००, १०२, १०९, १११, ११३, ११७, ११८, १२२, १२६
कर्वे प्रो.—१८, ३१
कलकत्ता कॉंग्रेस—१२९, १३२
काशीबाई (गोखले)—८४
किचनेर, लॉर्ड—१२६, १४६
केसरी—१६, १९, २६ २९
केळकर प्रो०—२०, २३, ३१, ८७
कोल्हापूरप्रकरण—१७
कॉटन, सर—११०, ११४
कॉन्ग्रीव्ह मिसेस—६१
कॉलरिज—१०८
खरे दाजीसाहेब—७९
खापर्डे दादासाहेब—१६४
गोखले कृष्णराव—६, ७, ९
गोखले गोविंदराव—८, ९, १०
गोखले नामदार—चरित्रे ४, पूर्वज ५, ६, आई ६, ७, जन्म ७, अभ्यास १०, मानी व हिशेबी ११, १२, पाठशक्ती १४, नट १७, न्यू स्कूल १९, स्फूर्ती २१, लग्न २२

शिक्षक २३, डे. ए. सोसायटी फूट २६, २७, टिळकांशी तुलना २८, कॉलेज ३०, स्वभाव ३३, ४०, गुरु ३३, सार्वजनिक सभा ३४, लेखन ३५, कॉंग्रेस संबंध ३९, ४७, कॉंग्रेस पहिले भाषण ४१, चळवळीचे मार्ग ४२, रानडे व दादाभाई आदर ४५, ९९, मेथा अभिनंदन ४७, पुणे-कॉंग्रेस ४९, कमकुवतपणा ५१, नोकरशाहीशी आचरण ५२, यु. फेलो ५६, वेल्बी कमिशन ५९, ६४, दुखणे ६१, शिक्षण कॉंग्रेस ६६, म्याड व फसवे मित्र ६७, ६८, माफी ६९. इंग्लंडचे मत ७१, मृदू मन ७२, प्लेग कामगिरी ७३, कौन्सिल-प्रवेश ७४, रानडे-स्मारक ७६, म्युनिसिपल बिल ७७, लँड रेव्हिन्यू बिल ७८, वरिष्ठ कौन्सिल ८२, ८६, ध्येय ८३, अपत्ये ८४, पत्नी-विरह ८५, इतिहास विषय ८६, फर्ग्युसन कॉलेज ८७, पुणे म्युनि० ८९, अंदाजपत्रक भाषणे ९०, ९२, ९९, १४१-१४६, दिवाणीखाते गुप्त कारभार ९३, बंगाली लोकांबद्दल मत ९६, युनिव्हर्सिटी बिल ९७, मद्रास रा० सभा ९७, १००, सी. आय. ई, १०२, कायदे कौन्सिलाबद्दल मत १०४, शिष्टमंडळ (सन १९०४), १११ ११२, सरकारचे कर्तव्य ११४, स्वराज्य-व्याख्या ११४, कॉंग्रेस-अध्यक्ष ११६, ११७, असहकारिता ११८, बहिष्कार ११९, १२१, १३२, हक्क मागणी ११९, टिळकांचे आहारी १२१, मिंटोस सल्ला १२२, सुराज्यमागणी १२३, फुल्लरशाही १२५, मोर्लेच्या भेटी १२७, सेल्फ गव्हर्नमेंट १२९, राजकीय सुधारणा १२९, व्याख्यानांचा दौरा १३५, स्वराज्याची लायकी १३६, १३७, नैतिक सामर्थ्य १३७, वसाहतीचे स्वराज्य १३८, करबंदी १३८, मुसलमानांचे समाधान १३९, मिठाचा कर १४१, भारत-सेवक समाज १५१, १५३, १५५, सभाबंदी कायदा १६५, सुरत-कॉंग्रेस १६५-१६९

गोखले बापू-५

गोळे, प्रि०-२४

गांधी, म०-४५, १०९, १३७

ग्लॅडस्टन-४३, ५१, १२०

घोस अरविंद-१६०, १६४

घोस वीरेंद्र-१६०

घोस मोतीलाल—७०, १६९

घोस राशबिहारी-१३३, १६४-१६५, १६७, १६८

चिपळूणकर विष्णुशास्त्री-१५, १६

चिरोल-१०२, १२१, १५३

जपान–२, १०६, १०९, १२९
जसवंतराय–१५७
जेसुइट–१५२
जोशी ग. व्यं.–४०, ५९, ८७
झेव्हिअर–१५१
टिळक, लोकमान्य–यत्नोद्धार १४, न्यू स्कूल १६, संपादक १७, बुद्धिवैभव २०, २१, शिक्षक २३, कारागृह २५, राजीनामा, त्याचे खरे कारण २६, २७, मिथ्या हेवा २८, तत्त्वनिष्ठा २९, कोमल वृत्ती ३१, आगरकरप्रेम ३२, दादाभाई अभिनंदन ४४, पुणे-काँग्रेस ४७, ४८, ४९, लोकशिक्षण ५१, सार्वजनिक सभा ५१, मनाचा थोरपणा ५३, गणपती व शिवाजी उत्सवांचे कारण ५४, ५५, बहुमतास मान ५६, टीकाविषय ७२, गोखल्यांस मानपत्र ११५, मनुष्यस्वभावाची पारख १२१, गोखल्यांस खाकोटीत १२१, कलकत्ता-काँग्रेस १२९, स्वदेशी–बहिष्कार ठराव १३१, वसाहतीचे स्वराज्य १३८, सुरत प्रांतिक सभा १६३, सुरत राष्ट्रीय सभा १६३, १६६–१७१
टोगो, ॲ०–१३६
डिग्बी–४३
डेक्कन एज्युकेशन सोसायटी–२१, २४–२७, २९, ३०, ८३
डेक्कनसभा–५३
तेलंग, नामदार–१७
थोरो–१५८
थॉमस रॅले–९५, ९७
दत्त अश्विनीकुमार–१२४, १३२, १६९
दत्त भूपेंद्रनाथ–१६०
दादाभाई–४३, ४४, ६०, ६१, ६३, ७५, ८३, १००, १३०, १६७
देशमुख, डॉ० ११५
देशमुख लोकहितवादी–१७, ४३
धारप–२४
नवशक्ती–१६१
नागपूर–१३३, १६३
नामजोशी–१६, २४, २६, २९, ३०
नेव्हिन्सन–१५९, १६६
नेहरू, पंडित–१६३
न्यू इंग्लिश स्कूल–२४
पटवर्धन सीतारामपंत–१२
पन्ना–२९
परांजपे, प्रि०–२७, ६२
परेख गोकुळदास–७९
पायोनिअर–१४६
पाल बिपिनचंद्र–१३०, १३१, १५५
पिंडीदास–१५७
पुणे–४८, ६५, ६६
पेटिट बम्मनजी–८२
पंजाब १५६–१५९
पंजाबी– १५७
पॉल हर्बर्ट–४३

फर्ग्युसन कॉलेज–८५, ८६
फुल्लर, सर–१२२
बनारस काँग्रेस–११६, १२२
बसू भूपेंद्रनाथ–१३०
बहिष्कार–१११
बानर्जी गुरुदास–९५
बानर्जी डब्ल्यू. सी.–८६
बानर्जी सुरेंद्रनाथ–४९, १२४, १३०, १६८, १६९
बारिसाल–१२४
बेझंट–१५३
बंगाल–१११, ११२, ११३, ११८, १२६, १५९, १६०, १६४
ब्रॅडलॉ–३९
भाटवडेकर, सर–७६
भाटे, प्रो०–३२
भानू प्रो०–२४, २५
भारत–सेवक समाज–४५, १०५, १४८–१५०
भारवी–१६२
भिडे नाना–१७
भांडारकर, सर–६३, ७४
मद्रास टाइम्स–९८
मराठा–१६, १९
मलबारी शेट–५५, ६७
महाराष्ट्र–१६०
मालवीय, पंडित–१६३
मिलर, डॉ०–९५
मिंटो, लॉर्ड–११७, १२२, १२४, १२७, १३४, १५६
मुजुमदार अंबिकाचरण–१७१
मेथा फेरोजशहा–१७, ४४, ४६, ४७, ७८–८२, ८५, ९६, ११७, १३०, १५६, १६३, १६९
मोदी–१४८
मोर्ले, लॉर्ड–६२, १०७, १०८, १२०, १२१, १२५–१२८, १३४, १४१, १५८
मंडलिक, नामदार–१६०
म्हस्के गंगाराम भाऊ–७४
मॅक्किन, डॉ०–९५
मॅकेंझी मूर–७९
मॅझिनी–१६२
मॅनिंग मिसेस–१२८
मॉडर्न रिव्ह्यू–१५८, १७१
युगांतर–१६१, १६४
युनिव्हर्सिटी कमिशन–९५, ९६, ९७
रशिया–९१, १४४
राजवाडे वै. का.–३२
राजाराम कॉलेज–१७
राणीचा जाहीरनामा–१०९
रानडे न्यायमूर्ती–४, ६, १५, ३४, ३७, ३८, ४२, ४४, ४५, ४७, ४९, ५२, ५७, ६९, ७३, ७४, ७६, ८५, ८७, ९८–१००, १२०.
रामकृष्ण परमहंस–३६
रामतीर्थ, स्वामी–३१, १३६
रामदास, समर्थ–४५, १५२

रामदासी पंथ–१५२, १६०
रास्ते–५
रेडमंड–६२
लजपतराय, लाला–१३३, १५१, १५५, १६५, १६७, १७०
वच्छा, सर–४६, ४८, ५९, ६०, ६६, ६८
विजापुरकर, प्रो०–१४
विवेकानंद, स्वामी–१३६
वेडरबर्न–१०७
वेलणकर दत्तोपंत–१५१
वेस्टलंड–४६
वन्दे मातरम् (पत्र)–१६१
शिवाजी महाराज–५५
शेरिडन–६१
श्रियाळ–४
सय्यद अहमद, सर–९४, १५९
सलीमउल्ला–१५९, १६४
साठे आबासाहेब–३४
सातारा जिल्हा–७५
सार्वजनिक सभा–३४, ५२
सिमला कॉन्फरन्स–९५
सिव्हिल अँड मिलिटरी ग्याझेट–१५७
सुधारक–२६
सुरत–१६४, १६७, १६८, १६९
सेटलवाड, सर–९५
हार्डिंज, लॉर्ड–१३४
हंसराज–१५८
हिंदुस्तान रिव्ह्यू–१४७
ह्यूम–३७, ४५, ८३, १४८, १७०
हॅम्पडन–८६
हॅरिसन–१०९
व्हॅलिडेशन ॲक्ट–१०३
ज्ञानेश्वर–४

